# नवभारत

वर्ष २ रें ]  नोव्हेंबर १९४८  [ अंक २ रा

स्त्रियांचे प्रश्न व सामाजिक नियोजन . . डॉ. वा. वि. आठल्ये
कसणाऱ्याच्या हातीं जमीन . . . ॲना लुईज् स्ट्राँग
कवि खाडिलकर यांना श्रद्धांजलि . . श्री. त्र्यं. सी. कारखानीस
आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेची भूमिका श्री. गो. मा. कुलकर्णी
वारकरी-पंथ आणि महानुभाव-पंथ . . प्रा. गं. बा. सरदार
'कथक' नृत्य . . . . श्री. रोहिणी भाटे
पुणें विश्वविद्यालयाचा दर्जा . . . प्रा. के. रा. कानिटकर
टीकाकार टागोर . . . श्री. दा. गो. देशपांडे
काकासाहेब खाडिलकरांचें व्यक्तिमत्त्व . . प्रा. न. र. फाटक
अमेरिकेंतील अध्यक्षीय निवडणूक . . प्रा. स. वा. कोगेकर
अभ्युदयाच्या मार्गावर . . . डॉ. बा. मो. कानिटकर
विश्वमानवाचें चतुर्विधदर्शन (कविता) . . श्री. ना. ग. जोशी.

१ रुपया

अनुक्रमणिका









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

वर्ष दुसरें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर
१९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रो. वि. म. बेडेकर
का. संपादक


| | | |
|---|---|---|
| स्त्रियांचे प्रश्न व सामाजिक नियोजन | डॉ. वा. वि. आठल्ये | ८९ |
| खंत कशासाठीं? (कविता) | प्रा. बा. मो. कानिटकर | ९५ |
| कसणाऱ्याच्या हातीं जमीन | ॲना लुईज् स्ट्रॉंग (अनु. श्री. मो. शं. भडभडे) | ९६ |
| कवि खाडिलकर यांना एका कलोपासकाची श्रद्धांजलि | श्री. त्र्यं. सी. कारखानीस | १०६ |
| आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेची भूमिका | श्री. गो. मा. कुलकर्णी | ११० |
| विश्वमानवाचें चतुर्विधदर्शन (कविता) | श्री. ना. ग. जोशी | ११७ |
| वारकरी-पंथ आणि महानुभाव-पंथ | प्रा. गं. बा. सरदार | १२० |
| 'कथक' नृत्य : सौंदर्यशोध आणि आनंदबोध | श्री. रोहिणी भाटे | १३२ |
| पुणें विश्वविद्यालयाचा दर्जा | प्रा. के. रा. कानिटकर | १३९ |
| टीकाकार टागोर | श्री. दा. गो. देशपांडे | १४३ |
| काकासाहेब खाडिलकरांचें व्यक्तिमत्त्व | प्रा. न. र. फाटक | १४८ |
| अमेरिकेंतील अध्यक्षीय निवडणूक | प्रा. स. वा. कोगेकर | १५८ |
| अभ्युदयाच्या मार्गावर | डॉ. बा. मो. कानिटकर | १६६ |


वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक : श्री. र. ग. जोशी

मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पुणें २। प्रकाशनस्थळ : नवभारत कचेरी, २९१ शनिवार पुणें २






# ‘नवभारत’, नोव्हेंबर १९४८

## लेखक–परिचय

[या अंकांतील लेखकांपैकीं ज्या लेखकांचे लेख ‘नवभारतां’त या अंकासमवेत पहिल्या प्रथमच येत आहेत, त्यांचा थोडक्यांत परिचय खालीं दिला आहे. बाकीच्या लेखकांचे लेख ‘नवभारतां’त पूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा थोडक्यांत दिलेला परिचय वाचकांस विदित आहेच.—का. सं.]

**श्री. दा. गो देशपांडे** (हैदराबाद.) वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचे व्यासंगी अभ्यासक

**श्री. मो. शं. भडभडे** (पुणें) न्यू इंग्लीश स्कूल, पुणें, येथें संस्कृताध्यापक; “शशिकान्त पुनर्वसु” या टोपणनावानें प्रसिद्ध असलेले नाट्यछटालेखक व लघुकथा–लेखक.

**डॉ. बा. मो. कानिटकर** (पुणें) कांहीं काळ तत्वज्ञानाचे प्राध्यापक स. प. कॉ. पुणें. विविध विषयांचे अभ्यासू लेखक. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी शास्त्रीय ग्रंथमंडळाचे सहसंपादक.

**प्रा. न. र. फाटक** (मुंबई) यशस्वी पत्रकार व मार्मिक टीकाकार; महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष; “ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी” व “न्या. रानडे यांचें चरित्र” इ. ग्रंथांचें लेखक.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृति-पोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक–मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवन-विषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

अनुक्रमणिका

डॉ. वा. वि. आठल्ये

# स्त्रियांचे प्रश्न व सामाजिक नियोजन

हिंदुस्थानांतीलच काय, पण एकंदर जगांतील स्त्रिया अजूनहि कमीअधिक प्रमाणांत दास्यावस्थेंतच आहेत. त्यांच्या कांहीं हालचाली व त्यांचे वागण्याचे प्रकार पूर्वीपेक्षां अधिक मोकळेपणाचे दिसत असले तरी तेवढ्यावरून त्यांची दास्यावस्था संपली आहे असें इतरांनीं तर मानूं नयेच, पण स्वतः स्त्रियांनींहि मानूं नये. राजकारणांत जसे भुरळ पाडण्याचे व पडण्याचे प्रकार असतात तसे सामाजिक जीवनांतहि असतात. वास्तविक स्वातंत्र्य देणारा व घेणारा यांच्या मनोभूमिकेंतच प्रगतीचा खरा निकष असतो. खरी सुधारणा व्हावयाची ती तेथें व्हावयास पाहिजे. बाह्य चित्र परिस्थित्यनुरूप वेळोवेळीं भिन्न असूं शकतें व त्याला फारशी किंमतहि विचारी माणसें देत नाहींत.

## स्त्रियांच्या सामाजिक दर्ज्याची पूर्वपीठिका

आपण उदाहरण म्हणून स्त्रियांचा एक प्रश्न विचारांत घेऊं. स्त्रियांच्या प्रश्नांपैकीं विवाह हा एक महत्त्वाचा प्रश्न होय. त्याकडे बघण्याचा आजचा सामाजिक दृष्टिकोन कसा आहे? प्रच्छन्नपणें तो अद्यापि बहु–अंशीं आर्थिक व कामप्रधान आहे. बहु–अंशीं म्हणण्याचें कारण असें कीं जेथें अथवा ज्या समाजांत एकपत्नीकत्व प्रस्थापित झालेलें असतें तेथें तो कांहीं अंशीं निराळा असून स्त्रियांचा दर्जाहि त्या ठिकाणीं थोडा वाढलेला आढळतो. तथापि एकपत्नीकत्वाचीहि वाढ अद्यापि जगभर झालेली नाहीं आणि एकपत्नीकत्वाचें तत्त्व कितीहि न्याय्य व श्रेष्ठ असलें तरी जोंपर्यंत सामाजिक मनोभूमिकेंत बदल होणार नाहीं, तोंपर्यंत त्याच्या केवळ बाह्य प्रस्थापनेनें हा प्रश्न सुटणार नाहीं.

स्त्रियांच्या सामाजिक स्थानाचा इतिहास डोळ्यांपुढें आणला, तर ह्या मुद्द्यावर अधिक प्रकाश पडेल. अर्धमानव स्थितींत स्त्री स्वतंत्र माता होती; पुरुषाचें पितृत्व प्रस्थापित झालेलें नव्हतें. परंतु ह्या अवस्थेच्या पुढील अवस्थेंत म्हणजे विवाहपद्धतीच्या प्राथमिक अवस्थेंत स्त्री हें एक प्रवासांत ओझें वाहून नेण्याचें, कौटुंबिक जीवनांतील काबाडकष्ट पार पाडण्याचें व कुटुंबास शाकान्न पुरविण्याचें साधन मानलें जात असे. कांहीं समाजांमध्यें तर तिची ही उपयुक्तता वधूनिश्चयाच्या वेळची एक पात्रतेची बाब समजली गेली होती. शेतांत अथवा घरांत प्रामाणिकपणें राबणाऱ्या गड्याचा दर्जा त्या काळीं स्त्रियांना दिला जात होता. त्या काळीं युद्धांत काबीज झालेल्या स्त्रियांचा दर्जा तर केवळ गुलामासारखा होता. अशा स्त्रियांचा उपयोग पूरक स्त्रिया अथवा उपस्त्रिया म्हणून होत असे. पुरुष वरचेवर युद्धांत गुंतत असत व कुटुंबाचें रक्षण करीत असत. त्यामुळें त्यांच्या वृत्तींत वरचढपणा, आक्रमकता व क्रूरता निर्माण होऊन त्यांचा परिणाम म्हणून कुटुंबांतील स्त्रियांचें दास्य अधिकच वाढत गेलें.

युद्धयुगानंतरच्या शेतकीयुगांत, हें युग सापेक्षतया स्वास्थ्यास व प्रगतीस अनकूल होतें तरी, स्त्रिया पतींच्या नम्र दासीच राहिल्या, याची पूर्वपीठिका वर दिल्याप्रमाणें आहे. सर्व कष्ट त्यांनीं बिनतक्रार सोसावे व सर्व बाबतींत त्यांनीं पतींच्या मुठींत असावें हाच त्या परंपरेचा परिपाक होता.

## अंतर्मन दुखावल्याचे दुष्परिणाम

त्यांच्या ह्या असहाय वागणुकींना सात्त्विक सहनशीलता व प्रेमोद्भूत मुग्धता म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय. दास्यावस्थेचा व अगतिकत्वाचा



अनुक्रमणिका







विसर अपत्यप्रेमामुळें व्यवहारतः अथवा बाह्यतः पडतो हेंहि जरी खरें असलें, तरी अंतर्मन दुखावलें जात असतें हें कांहीं खोटें नाहीं. आणि मनाच्या खोल भागाचा बाह्य मनाशीं व त्यामार्फत शरीराशीं निकट संबंध असल्यामुळें स्त्रियांच्या मनांवर व शरीरांवर अंतर्मनांत सांठत गेलेल्या व्यथांचा व यातनांचा दुष्परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. ह्या दुष्परिणामाचीं भषिण दृश्यें आधुनिक समाजांतहि कांहीं कमी पाहावयास सांपडत नाहींत. ४० वर्षांपूर्वीचें एका शिक्षित तरुणीचें दुःखद चित्र हा लेख लिहीत असतांना माझ्या डोळ्यांपुढें उभें राहत आहे. तिचें माहेरचें नांव देवस्थळी व सासरचें पुरोहित होतें. ती शिकलेली होती हाच तिचा दोष ! अन्यथा ती सर्वतोपरी चांगली होती. पण ह्या दोषामुळें ती सासरच्या जुन्या पद्धतीच्या वडील मंडळींना अत्यंत अप्रिय होती. जुन्या दृष्टीच्या त्या वडीलधाऱ्या मंडळींनीं तिला अहोरात्र छळण्याचा कार्यक्रम चालू ठेवला होता. लग्न होऊन दोन वर्षेंच त्या वेळेस झालेलीं असतील. त्या छळामुळें ती प्रतिदिवशीं मनानें व शरीरानें खंगत गेली. स्फुंदन, औदासीन्य, अन्नत्याग, शारीरिक कृशता व पुढें पुढें झटके, असें तिचें करुणास्पद चित्र होतें. शेवटीं त्या झटक्यामध्येंच तिचा अंत झाला ! अशीं चित्रें–दुःखाच्या कमीअधिक तीव्रतेचीं–अनंत आहेत. आणि तीं समाजांत जोंपर्यंत चालू राहतील तोंपर्यंत स्त्रियांचें मन तसेंच शरीर नैसर्गिक उन्नतावस्थेला कसें जाऊन पोहोंचेल ?

## स्त्रियांविषयीं कांहीं अपसिद्धांत

पुरुषांच्या व स्त्रियांच्या विकासांमध्यें जें महदंतर दिसून येतें त्याचें मुख्य कारण स्त्रियांच्या न्याय्य दर्जाची समाजाकडून होणारी अवहेलना हेंच होय. स्त्रियांच्या ठिकाणीं स्वाभाविक असणाऱ्या शारीरिक कोमलतेचा व सापेक्ष निर्बलतेचा फायदा घेऊन पुरुषवर्ग आजपर्यंत त्यांच्यावर सत्ता गाजवीत आला आहे व उपर्युक्त नैसर्गिक भेदांचें अवास्तव स्तोम माजवून स्त्रियांना पुरुषांबरोबर कधींहि सामाजिक दृष्ट्या समानतेनें राहावयास सांपडणार नाहीं, असा सिद्धांत मांडण्यासहि कांहीं विद्वान् पुरुष मार्गेपुढें पाहत नाहींत ! ह्या विद्वानांच्या समानतेच्या कल्पनेचा निकष बहु–अंशीं शारीरिक बलच असतो. वास्तविक सामाजिक समतेची न्याय्य कल्पना "बळी तो कान पिळी" ह्या पाशवी निकषावर उभारलेली नसून अंतःकरणाच्या व कर्तव्यबुद्धीच्या मूल्यावर आधारलेली आहे. आणि ह्या दृष्टीनें पाहतां स्त्रियांच्या ठिकाणीं अंतःकरणाचे गुण व कर्तव्यबुद्धीची तीव्रता पुरुषांपेक्षां यत्किंचितहि कमी नसतात–नव्हे, कांकणभर अधिकच असतात. म्हणून वरील सिद्धांत हा अपसिद्धांतच ठरतो. तथापि हा अपसिद्धांत अनेकांच्या अंतःकरणांत अज्ञानानें व उन्मत्ततेनें दृढ होऊन बसलेला आहे. त्याचें निर्मूलन करणें हें सुधारकांचें एक महत्त्वाचें कर्तव्य होय. ही आंतरिक सुधारणा होईपर्यंत केवळ बाह्य सुधारणांनीं स्त्रियांचे प्रश्न सुटणार नाहींत.

## समताविषयक विचारांची मंद गति

काळाच्या ओघांत स्त्रियांच्या सामाजिक स्थानाविषयींच्या कल्पनांमध्यें कांहींच फरक झालेला नाहीं असें मात्र नाहीं; पण जो होत आहे तो कंटाळवाण्या व असमर्थनीय ठरेल इतक्या मंद गतीनें होत आहे. आर्थिक उपयुक्ततेमुळें तरी त्यांना सामाजिक समता प्राप्त व्हावयास पाहिजे होती. पण समतेऐवजीं थोडासा मानसन्मान त्यांना मिळूं लागला. पुढें सामुदायिक कष्टावस्था संपून समाजांत आराम–संपन्न वर्ग निर्माण होऊं लागल्यावर या वर्गांतील कांहीं पुरुषांना आपल्या स्त्रिया सुंदर व कलानिपुण असाव्या असें वाटूं लागलें; आरामाच्या मागोमाग पावलें टाकीत येणाऱ्या ह्या नैसर्गिक इच्छा होत. त्यांमुळें सौंदर्यसंपन्न व कलाभिज्ञ स्त्रियांना इतर स्त्रियांच्या मानानें कांहीं महत्त्व तशीच सत्ता कुटुंबांत व समाजांत प्राप्त होऊं लागली. ज्या स्त्रियांमध्यें एतत्सदृश अन्य कारणांनीं अधिक कर्तृत्व असें, त्यांचें तें कर्तृत्व समाजांत रूढ असलेल्या बहुपत्नीकत्वाला साहजिकच अधिक विरोधक ठरत असे व त्यांना समतेचें कांहीं सुख लाभत असे. अर्थातच इतर स्त्रियांच्या ठिकाणीं मानाच्या व सुखाच्या कितीहि न्याय्य आकांक्षा असल्या तरी, त्या त्यांच्या अंतर्मनांत दडपल्या जात असत व ज्यांच्या वांट्याला सौंदर्यामुळें अथवा कलानिपुणतेमुळें सापेक्षतया








सुखस्थिति येई, त्यांची ती सुस्थिति इतर कुटुंबांतील स्त्रियांना ध्येय होऊन बसत असे.

प्रागतिक आर्यवंशीयांमध्यें ह्या ध्येयाचा लवकर पुरस्कार झाला. स्त्रियांना मान देणें हें कौटुंबिक व सामाजिक संस्कृतीचें प्रमाण मानलें जाऊं लागलें; आणि त्यामुळें स्त्रियांकडे केवळ आर्थिक व कामुक दृष्टीनें पाहण्याची वृत्ति कांहीं अंशीं कमी होऊं लागली.

येणेंप्रमाणें काळाच्या ओघांत मंद गतीनें स्त्रियांच्या वांट्याला कांहीं मान, कांहीं सुख व कांहीं समता या गोष्टी जरी येऊं लागल्या होत्या तरी अठरावें शतक उगवेपर्यंत एतद्विषयक विशेष स्वरूपाची सुधारणा झालेली इतिहासावरून दिसून येत नाहीं. कांहीं अपवादात्मक स्त्रिया व्यक्तिशः सामाजिक उच्च पदवीला पोहोंचल्याचें निरनिराळ्या देशांच्या इतिहासांमध्यें आढळून येतें. तथापि स्त्रीवर्ग ह्या नात्यानें अथवा सामुदायिक रीत्या, स्त्रियांचें पाऊल पुढें पडत असल्याचें त्या काळापर्यंत प्रत्ययास येत नाहीं. तोंपर्यंत स्त्रियांकडे सर्वसामान्यतः पाहण्याची दृष्टि जुनीच होती असें म्हटलें तरी चालेल. पण अठराव्या शतकांत फ्रान्समध्यें झालेल्या राज्यक्रांतींत मानवामानवांतील समतेकरतां घडलेल्या आंदोलनांचे पडसाद स्त्रियांच्याहि समतेवर उठल्याशिवाय राहिले नाहींत. येथून पुढें स्त्रियांच्या हक्कांना व्यापक प्रमाणांत वाचा फुटत गेली असें मानावयास कांहीं हरकत नाहीं.

### स्त्रियांच्या न्याय्य हक्कांचा विचार

स्त्रियांच्या न्याय्य हक्कांची कल्पना त्यांच्या मागण्यांतूनच व्यक्त होते. त्यांच्या प्रमुख मागण्या खालील आहेतः—

१. उच्च शिक्षणाची तरतूद

२. जरूरीप्रमाणें अर्थोत्पादक जीवनांत स्वतंत्रपणें शिरण्याची मुभा

३. विवाहांत निवडीचा पूर्ण हक्क

४. संकुचित कौटुंबिक क्षेत्रांतून मोठ्या सामाजिक जीवनांत प्रवेश करण्यास सवड

५. स्वतःच्या मुलांवर व मत्तेवर पुरुषांच्या बरोबरीनें नियंत्रण

६. लैंगिक जीवनावर ताबा ठेवून स्वाभिमानरक्षण

७. अगतिकत्व येईल तेव्हां घटस्फोटाची सोय.

ह्या हक्कांची जाणीव समाजाला जरी होऊं लागली असली, बाह्यतः ते प्रस्थापित होण्याच्या मार्गास लागले आहेत असें जरी वाटत असलें आणि व्यक्तिशः कांहीं विचारवंत व सहृदय पुरुष जरी तत्प्रस्थापनेकरतां कळकळीनें झटत असले तरी सर्वसामान्यतः ह्या प्रश्नाकडे बघण्याचा समाजाचा दृष्टिकोन फारसा निवळलेला नाहीं; ह्या मागण्यांना मोठ्या प्रमाणांत विरोध आहे. स्त्रिया स्वातंत्र्यास पात्र नाहींत व त्यांचा कारस्थानी स्वभाव परमेश्वरालाहि उमगावयाचा नाहीं, ही पुरुषांची समजूत अद्यापिहि मधून मधून व्यक्त होतच असते. गेल्या दोन महायुद्धांनीं व मानवी जीवनांतील अनेक लहानमोठ्या पुरातन व आधुनिक प्रसंगांनीं पुरुषांची स्वातंत्र्याचा सदुपयोग करण्याची अपात्रता, त्यांची तृष्णा व त्यांचा पाताळयंत्री स्वभाव आणि त्यांच्या स्वार्थांत असलेलें अखिल मानवजातीच्या दुःखाचें मूळ या बाबी सिद्ध केल्या असतांहि पुरुष–वर्गानें स्त्रीवर्गाबद्दल वरील विपरीत समजूत उराशीं बाळगावी ह्याचें दुःख वाटतें.

तथापि वर म्हटल्याप्रमाणें थोडे असले तरी कांहीं पुरुष स्त्रियांची न्याय्य बाजू उचलून धरण्यास पुढें येत आहेत हें नमूद करावयास हवें. स्त्रीजीवनांत कांहीं अल्पस्वल्प सुधारणा होत आली असेल तर तिचें श्रेय अशा पुरुषांना व आपल्या हक्कप्रस्थापनेकरतां वाढत्या प्रमाणांत बद्धपरिकर होत असणाऱ्या स्त्रियांनाच आहे. ऐतिहासिक दृष्ट्या समाजांत पुरुष–वर्गास वर्चस्व प्राप्त होत गेलेलें असल्यामुळें स्त्री–विषयक सुधारणांना त्याचा विरोध होणें स्वाभाविकच होतें.

स्त्रियांच्या ज्या प्रमुख मागण्या वर निर्दिष्ट केल्या आहेत, त्यांच्या न्याय्यतेबद्दल कांहीं विचारवंतांमध्यें एकवाक्यता होत असून त्यांपैकीं कांहीं मागण्या परिस्थिति पुऱ्या करीत आहे. उदाहरणार्थ, उच्च शिक्षण घेणाऱ्या, सामाजिक कार्यांत पडणाऱ्या, जरूरीप्रमाणें नोकरींत अथवा धंद्यांत शिरणाऱ्या कांहीं स्त्रिया पाहावयास सांपडतात. कांहीं विवाहहि स्त्रियांच्या निवडीनें होत आहेत. न्याय्य घटस्फोटाची कायद्यानें सोय केली आहे व इतर मागण्यां-








बाबतहि कायदे होतील. ह्याप्रमाणें परिस्थितीची व कायद्याची अनुकूलता दिसत असली तरी तेवढ्याव-रून लोकमत खरोखरीच अनुकूल बनलें आहे असा त्याचा अर्थ होत नाहीं. परिस्थितीनें होणाऱ्या सुधारणांचें श्रेय लोकमतास नाहीं हें कांहीं विशद करून सांगण्यांची आवश्यकता नाहीं. पण लोकांनीं निवडलेल्या विधिमंडळांतून होणाऱ्या कायद्यांचेंहि श्रेय लोकमतास नाहीं हें विधान कांहींना तरी आश्चर्यकारक वाटेल. आजचीं विधिमंडळें लोकशाहीच्या चौकटीत बसविलीं आहेत हें नाकबूल करतां येणार नाहीं; परंतु तीं लोकमतांतून निर्माण झालेलीं नाहींत हेंहि विसरतां येणार नाहीं. विधिमंडळें लोकशाहीचीं खरोखरी निदर्शक असण्यास व खरी लोकशाही यशस्वी होण्यास लोकांना स्वतःच्या हक्कांचें ज्ञान, तसेंच ते हक्क वापरण्याचें शिक्षण चांगलें मिळावें लागतें. त्या अवस्थेंतून आपली जनता अद्यापि गेलेली नाहीं. इतर प्रश्नांप्रमाणें स्त्रियांच्या प्रश्नांबाबतहि जनतेची सदसद्विवेकबुद्धि अद्यापि जागृत व्हावयाची आहे. ती जागृत झाली म्हणजे प्रस्तुत प्रश्न सुटण्याच्या मार्गास खरोखरी लागला असें म्हणावयास हरकत राहणार नाहीं.

## हक्कांबरोबर कर्तव्यांचाहि विचार आवश्यक

स्त्रियांच्या हक्कांचा विचार करतांना त्यांच्या कर्तव्यांचाहि विचार करणें अवश्य आहे. पुरुषवर्गाकडून होणाऱ्या चळवळींना पुष्कळ वेळां "केवळ हक्कांकरतां हक्क" असें स्वरूप प्राप्त झालेलें पाहावयास सांपडतें. तोच दोष स्त्रियांच्या चळवळींतहि उत्पन्न होण्याचा संभव आहे. तो पुरुषांच्या चळवळींत जसा नसावा तसा स्त्रियांच्या चळवळींतहि नसला पाहिजे. हक्कांचा जन्म जीवनपूर्ततेकरतां आहे आणि ती पूर्तता हक्कांना कर्तव्यांची जोड मिळूनच होत असते. आज समाजांत ज्या थोड्या वर्गांच्या वांट्याला आरामसंपन्नता आलेली आहे त्या आरामसंपन्न वर्गांतील स्त्रिया, कांहीं अपवाद सोडतां, भोगानिमग्न, सौष्ठवासक्त आणि आत्मकौतुकरत असलेल्या आढळतात. हे दोष गेले पाहिजेत. त्याचप्रमाणें नैसर्गिक लैंगिक वृत्ति नियंत्रित करून उच्च सांस्कृतिक जीवन व्यतीत करणें हें पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांचेंहि ध्येय असावें. स्वास्थ्य आणि सुख लाभलेल्या स्त्रियांकडून हें ध्येय इष्ट तितकें अनुसरलें जात नाहीं. आरामामुळें मिळालेल्या संधीचा उपयोग पुरुषांनीं व स्त्रियांनीं सांस्कृतिक उन्नतीकडेच केला पाहिजे. लैंगिक वृत्ति वस्तुतः वावगी नाहीं; ती स्वाभाविक आहे व वंशरक्षणार्थ जरूरहि आहे. ती स्त्रियांमध्यें सुंदरता व सुबकता आणि पुरुषांमध्यें उत्साह व महत्त्वाकांक्षा निर्माण करते. पण तिलाहि निर्बंध घातले पाहिजेत. ती उपजतवृत्ति असली तरी तिचा व विवेकबुद्धीचा समन्वय घालतां येतो व तो घातला पाहिजे. ह्या उपजतवृत्तीला व्यक्तीच्या लहरीप्रमाणें कामलोलुपतेचें स्वरूप येऊं देऊं नये; अर्थात् विवेकातिरेकानें तिच्या स्वाभाविकतेचा संकोचहि होऊं देऊं नये. मानवी अनुभव व शास्त्रशुद्ध मीमांसा यांना अनुसरून तिच्या बाबतींत धोरण आंखणें शक्य आहे. ह्या दृष्टीनें धर्म व भौतिकशास्त्रें यांचें ऐक्य घडविलें पाहिजे. ह्या दोहोंपैकीं केवळ एकास यश येणार नाहीं. प्रत्येक व्यक्तीस, मग ती पुरुष असो वा स्त्री असो, एतद्विषयक नैतिक जबाबदारी समजावून सांगावी. ज्या व्यक्ती आधींच अवनत झालेल्या असतील त्यांना नियंत्रण व शिक्षा ह्यांच्या साह्यानें सुधारण्याचा प्रयत्न करावा; अर्थात् कायद्याचें साह्य जीवनांतील स्वाभाविकतेला विरोधक मात्र नसलें पाहिजे.

स्त्रियांनीं कौटुंबिक कष्टांना मात्र कंटाळतां उपयोगी नाहीं. ज्या अर्थीं कुटुंबांतील प्रत्येक घटकानें कष्ट केले पाहिजेत, त्या अर्थीं स्त्रियांनींहि ते केलेच पाहिजेत. पण त्यांच्या कष्टांना हमालीचें, पडचाकरीचें किंवा दास्याचें स्वरूप येऊं नये. स्वयंस्फूर्तीनें, खुषीनें व स्वामित्वाच्या भावनेनें ते झाले पाहिजेत. आणि त्यांतून ज्यांना ज्यांना आराम व स्वस्थता लाभतील त्यांनीं त्यांनीं ती एक उन्नतीची संधि आहे असेंच मानलें पाहिजे. आराम व स्वास्थ्य हीं विलासी जीवनाचीं साधनें नव्हेत ह्याची नित्य जाणीव त्यांनीं ठेवावी.

## सामाजिक नियोजनाची आवश्यकता

हक्क आणि कर्तव्यें ह्यांचा समन्वय करून स्त्रियांच्या सर्व चळवळींमध्यें योजनात्मकता निर्माण केली पाहिजे. कोणत्याहि ध्येयाच्या निश्चितीनंतर योजनानिश्चिति



अनुक्रमणिका








न केली गेल्यास एकंदर कार्यास अव्यवस्थित स्वरूप प्राप्त होत जातें व ध्येयपूर्तीस अकारण दीर्घ काल लागतो. ज्या योजना निश्चित करावयाच्या त्यांचें स्वरूप अत्यंत शास्त्रीय, नैतिक, हार्दिक व दूरदर्शी असलें पाहिजे. त्यांचे तात्कालिक व भविष्यकालीन परिणाम ध्यानांत घेऊन वाटेंत आड येणाऱ्या अडचणींना तोंड देण्याची तयारी ठेवली पाहिजे. आणि एकदां कार्याची आंखणी केल्यावर त्यांत आपल्या सर्व निर्मायक शक्ती ओतल्या पाहिजेत.

प्रारंभीं उदाहरण म्हणून घेतलेला विवाहाचा प्रश्नच योजनात्मकतेच्या दृष्टीनें आपण विचारांत घेऊं. विवाहांत निवडीचा हक्क पाहिजे ही एक स्त्रियांची मागणी असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा व समाजास नित्य हाताळावा लागणारा असा असूनहि अद्यापि समाधानकारक रीतीनें सोडविला गेलेला नाहीं. राजकीय स्वातंत्र्याच्या व त्याबरोबरच व्यक्तिस्वातंत्र्याच्याहि कल्पना पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांच्याहि अंतःकरणांत फोंफावल्या आहेत. त्या नैसर्गिक आहेत व न्याय्यहि आहेत. त्यांना कोणी आडवूं म्हणेल तर तें अशक्य व अयोग्य आहे. निसर्गाचे नियम, मानवांचा दीर्घ अनुभव व त्यांतून जन्मास येणारीं उच्च सांस्कृतिक ध्येयें ह्या सर्वांचा विचार करून स्त्रियांच्या विवाहविषयक आकांक्षेला योग्य अवसर करून दिला पाहिजे. एकीकडून पाश्चात्यांची अनिर्बंध निवडपद्धति हिंदी स्त्रियांचें मन आकर्षीत आहे, तर दुसरीकडून निवडस्वातंत्र्याचा जवळजवळ संपूर्ण अभाव असलेली आपली जुनी रूढि त्यांचे पाय मागें खेंचीत आहे. ह्या रस्सीखेचींत स्त्रियांचें मन कसें कोलमडून पडत आहे आणि त्यांच्या त्या कोलमडण्याचा व भांबावण्याचा समाजांतील हीन वृत्तींचीं माणसें कसा दुरुपयोग करीत आहेत, हें आपण जाणतों. परंतु हें जाणूनहि आपण स्त्रियांच्या विवाहविषयक आकांक्षेला योग्य अवसर करून देण्याचे कष्ट करीत नाहीं कीं योग्य योजनाहि आंखीत नाहीं. अविवाहित मुलींमध्येंहि—आणि अंशतः विवाहित स्त्रियांमध्येंहि—मनोमालिन्य वाढत आहे हें दुर्दैवानें कबूल करणें भाग आहे. याचा दोष कामुक, अश्लील व अनेक रीतींनीं हीन अशा वाङ्मयाकडे, अनीतिप्रवर्तक नाटक–सिनेमांकडे आणि वाममार्गाचें जाळें सभोंवार पसरणाऱ्या समाजकंटकांकडे जसा जातो, तसाच तो स्त्रियांच्या विवाहविषयक नवाकांक्षेला अनुकूल परंतु नीतीचें व संस्कृतीचें अधिष्ठान असलेलें वातावरण आपण निर्माण करून देत नाहीं, ह्या आपल्या उदासीन वृत्तीकडे अथवा योजनाशून्यतेकडेहि येतो.

### विवाहविषयक सामाजिक नियोजन

वैवाहिक निवड चांगली होण्यास दोन प्रमुख गोष्टींची जरूरी असते. एक योग्य वय व दुसरी एकत्र येण्याची सामाजिक संधि. आज कायद्यानें चौदा वर्षांवरील मुलीचें लग्न होऊं शकतें. उद्यां ही वयोमर्यादा वाढून सोळा वर्षांवर नेली गेली तरी सोळा वर्षांच्या मुलींत आपलें हिताहित ध्यानांत घेऊन वराची निवड करण्याची पात्रता असते असें म्हणतां येईल काय? या प्रश्नाला 'नाहीं' असेंच उत्तर द्यावें लागेल. ह्या वयांत मुलांनाहि आपलें हिताहित समजत नाहीं. ह्या वयांत मुलींकडून होणारी निवड चुकीची ठरण्याचाच अधिक संभव असतो आणि ही चूक निस्तारणें सोपें नसतें. अगतिकत्व झालें असतांना घटस्फोटाची सोय कायद्यानें केलेली असली व ती योग्यहि असली तरी घटस्फोट करणें व पुनः संसाराची नवी घडी नीट बसविणें यांत किती अडचणीचे, गुंतागुंतीचे व हृदय व्याकुळ करणारे प्रश्न उद्भवतात हीं मुलींनीं, पालकांनीं व समाजनियंत्यांनीं विचार करण्यासारखी बाब आहे. त्या दृष्टीनें मुलींचें निवडस्वातंत्र्य राखून अधिकांत अधिक हित करील अशीच योजना आंखली गेली पाहिजे. वयांत येण्याची मर्यादा एकवीस वर्षें धरल्यास मी असें सुचवीन कीं, चौदाव्या वर्षापासून एकविसाव्या वर्षापर्यंतच्या वयांत लग्न करावयाचें झाल्यास अंतिम निवडीचा हक्क मुलीकडे राखून त्या निवडीस मातापित्यांची अथवा इतर पालक असल्यास त्यांची कायदेशीर संमति घेऊनच ती निवड कायम व्हावी. आईबाप किंवा इतर पालक योग्य संमति देण्यास अपात्र आहेत असें मुलीला प्रामाणिकपणें वाटल्यास, तिनें वयांत येईपर्यंत आपली निवड स्थगित करावी.







आपलें अधिकांत अधिक हित व्हावें असें मनापासून इच्छिणाऱ्या मुलीस असा संयम दाखविणें अशक्य नाहीं व वैवाहिक जीवन एकंदरींत सुखावह होण्याच्या दृष्टीनें सर्व मुलींनीं असा संयम दाखवावाहि. वयांत आल्यावरहि त्यांनीं होतां होईल तों आपली निवड आपल्या हितकर्त्यांच्या संमतीनेंच कायम करावी; पण त्या संमतीस अर्थातच कायद्याचें बंधन राहणार नाहीं. ह्या सूचनेचा हेतु स्त्रियांचें निवडस्वातंत्र्य राखून त्यांना मातापित्यांच्या अथवा पालकांच्या अनुभवाचा, प्रेमाचा व सहानुभूतीचाहि फायदा मिळावा हा आहे.

दुसरी बाब म्हणजे एकत्र येण्याच्या योग्य सामाजिक संधीची होय. अशा संधीच्या अभावीं जवळच्या आप्तेष्टांतून म्हणजे संकुचित क्षेत्रांतून, किंवा तसें न जमल्यास दूरच्या अपरिचितांतून किंवा मुलगी अज्ञानानें पण हट्टानें एकाद्या विशिष्ट पुरुषाकडे कल दाखवीत असल्यास अपत्यप्रेमामुळें त्याला संमति मिळून अहितकारक विवाह कसे घडत असतात हें सर्वांना माहीतच आहे. म्हणून चांगली निवड करतां यावी ह्या हेतूनें मुलींना व मुलांना एकत्र येण्याची योग्य सामाजिक संधि लाभली पाहिजे. सहशिक्षणानें ही लाभते असें मला वाटत नाहीं. शाळांकॉलेजांमध्यें एकत्र येण्यानें क्वचित् बरी निवड होत नसेल असें मला म्हणावयाचें नाहीं. तथापि तेथील एकत्र येणें एकंदरींत अनिर्बंधतेचें असतें आणि योग्य वैवाहिक निवडीच्या दृष्टीनें त्याचा उपयोग न होतां, लैंगिक विचारांचाच अंतःकरणांत कोलाहल माजून विद्येपासून चित्त विचलित होण्यास, विविध उपद्व्याप घडण्यास व त्याचा परिपाक नैतिक अधःपतनांत होण्यास मात्र त्यामुळें सवड मिळते. शाळांकॉलेजांच्या चालकांपैकीं जे सामाजिक हिताहिताचा खोल विचार करूं इच्छितात व स्पष्ट बोलूं शकतात, ते सहशिक्षणाचे दुष्परिणाम नाकबूल करीत नाहींत. ही एकत्र येण्याची संधि आईबापांच्या अथवा पालकांच्या देखरेखीखालींच मिळावयास पाहिजे आणि त्याकरितां समान संस्कृतीच्या लोकांचे क्लब स्थापन झाले पाहिजेत. अशा क्लबांमध्यें स्त्री–पुरुषांनीं उघड्या जागेंत व योग्य मर्यादा राखून एकत्र यावें असा सामाजिक संकेत निर्माण केला पाहिजे. ह्याशिवाय लग्न–मुंजी, स्नेहसंमेलनें इत्यादि प्रसंगीं सुसंस्कृत स्त्री–पुरुष एकत्र येऊन त्यांचे व त्यांच्या मुलांमुलींचे योग्य मर्यादा न सुटतां ज्यायोगें परिचय घडून येतील अशा सामाजिक योजना केल्या पाहिजेत. ह्या योजना सामाजिक संघटना तर घडवून आणतीलच, पण जरूर तेव्हां वैवाहिक निवडीच्या दृष्टीनेंहि उपयुक्त ठरतील. आजच्या आपल्या सामाजिक जीवनांत एकत्र येण्याचे प्रसंग नसतात असें नाहीं; पण त्या प्रसंगांतून इष्ट त्या त्या गोष्टी घडवून आणणाऱ्या योजना व संकेत आपल्या डोळ्यांपुढें नाहींत. एकत्र येण्याच्या जुन्या रीतींमध्यें सुधारणा करून व आवश्यक त्या नव्या रीती निर्माण करून हा महत्त्वाचा प्रश्न समाजानें वेळेवर सोडविला पाहिजे. असें आपण न करूं तर संस्कृतीविषयींची आपली आस्था पोकळ ठरेल व आपला समाज केवळ प्रवाहपतित होऊन काळाच्या ओघांत नामशेष होईल. आपला समाज विश्वाच्या भांड्यांत वितळत आहे. त्या द्रवणांतून समाजाची सुंदर मूर्ति निर्माण होऊं द्यावयाची का त्यानें पंचमहाभूतांमध्यें विलीन (नाहींसें) होऊन जावयाचें ह्याचा विचार दूरदृष्टि असणाऱ्या लोकांनीं केला पाहिजे. प्रागतिकांनीं अथवा समाजसुधारकांनीं आपण थोडे आहों ह्याची क्षिति बाळगूं नये. जगांतील निदान आजपर्यंतच्या तरी सर्व मोठ्या सुधारणा थोड्या व्यक्तींकडूनच झाल्या आहेत. स्त्रियांच्या उन्नतीविषयींच्या सुधारणाहि आणखी कांहीं काळ तरी थोड्या व्यक्तीच घडवून आणतील.

### उच्च नीतिमत्तेचें व सौंदर्याचें मन्दिर

स्त्रियांच्या सर्व प्रश्नांचा ऊहापोह करणें ह्या लेखांत अशक्यच आहे; पण त्यांच्या विवाहविषयक प्रश्नाचाहि अधिक विस्तार स्थलसंकोचास्तव करतां येत नाहीं. त्याच्या फक्त मध्यवर्ती कल्पनेला स्पर्श केला आहे. परंतु ह्या लेखानें प्रस्तुत प्रश्नाचें गांभीर्य व त्याची निकड वाचकांच्या निदर्शनास आल्याशिवाय राहणार नाहींत असें वाटतें. आपल्या समाजांतील विचारवंत हा व इतर प्रश्न चांगल्या रीतीनें सोडवूं शकले तर त्यांचीं गोड फळें समाजास चाखावयास सांपडतील व समाजांत एतद्विषयक उच्च








## स्त्रियांचे प्रश्न व सामाजिक नियोजन

संस्कृति आपणांस निर्माण करतां आल्यास आपला समाज सध्यांच्या संक्रमणावस्थेंत सर्व जगाला आदर्श होईल. उच्च संस्कृतीच्या समाजांत प्रणय व विवाह ह्यांमध्यें स्नेह व अद्भुतप्रियता ह्यांवर भर दिला जातो. एका समाजशास्त्रज्ञानें म्हटल्याप्रमाणें विवाहाचा पाया नैसर्गिक कामवृत्तींत असला तरी त्यावर उच्च नीतिमत्तेचें व सौष्ठव–भावनांचें सुंदर मंदिर निर्माण करतां येतें. आणि आपल्या सम्यक् प्रयत्नांनीं समाजाचा मनोविकास योग्य दिशेनें होत गेला म्हणजे व्याभिचार विचारांत देखील त्याज्य मानला जाईल. मग कामवासना आपणांवर स्वामित्व न गाजवितां आपली दासी होईल. मग स्त्रियांचें मन भोगांतून व विलासांतून मुक्त होऊन आपले पती व आपलीं मुलें यांचा मानसिक व सांस्कृतिक दर्जा कसा वृद्धिंगत होत जाईल याकडे त्या लक्ष देऊं लागतील व तत्प्रीत्यर्थ आपल्या शक्ती वेंचतील आणि तो वाढावा म्हणून आग्रह धरतील.

मानवी जीवनांत आणि मानवी सुधारणेंत स्त्रियांचें स्थान केवढें मोठें आहे, हें सर्वांना माहीतच आहे. त्यांना सामाजिक समता प्राप्त व्हावी व त्यांचा दर्जा वाढावा ह्याकरतां आवश्यक असे प्रयत्न करणें हें प्रत्येक राष्ट्रहितेच्छूचें कर्तव्य आहे. आपल्या इकडे पूर्वी आर्यधर्मीयांनीं व युरोपांत रोमन कायद्यांनीं व प्रारंभींच्या ख्रिश्चनधर्मीयांनीं आपआपल्या काळांत स्त्रियांना समाजांत बरोबरीचें स्थान देण्याचा प्रयत्न केला होता. तोच प्रयत्न सध्यांच्या गरजांना अनुसरून व निश्चित योजना आंखून आपण पुनः करावयाचा आहे.

---

## खंत कशासाठीं ?

कशाला खंत करावी तरी ?॥ धृ ०॥

| | | |
|---|---|---|
| अफाट जग भोंवतीं पसरलें, | अनंत कामें शिरीं | ॥ १ ॥ |
| परतेची अवकळा संपली | स्वतंत्र ध्वज हो वरी | ॥ २ ॥ |
| अनिल संचरे स्वैर नभांतरिं | विहंग विहरे तरी | ॥ ३ ॥ |
| नील नभा घन झांकुनि धरिती | चपला चमके सरीं | ॥ ४ ॥ |
| प्रतिदिनिं झिजतो नभीं चंद्रमा | अल्प न द्युति हो परी | ॥ ५ ॥ |
| काळ्या दरडी अडवुनि धरिती | जलौघ पळतो परी | ॥ ६ ॥ |
| यश–हिरवळ वाळली अपयशें | कौतुक विरलें जरी | ॥ ७ ॥ |
| कर्तव्यें किति खडतर असलीं | प्रवास करुंही तरी | ॥ ८ ॥ |
| पराजयाच्या अंधारामधिं | आशा–ज्योती खरी | ॥ ९ ॥ |
| दीपावलिची प्रभा पसरली | मौज लुटा क्षणभरी | ॥ १० ॥ |
| भगवंताची शिकवण अठवूं | पळवूं निराशा दुरी | ॥ ११ ॥ |

—प्रा. बा. मो. कानिटकर








**ॲना लुईज् स्ट्राँग** ( अनुवादक : श्री. मो. शं. भडभडे )

# कसणाऱ्याच्या हातीं जमीन

[ चीन हा हिंदुस्थानचा शेजारी. अनेक दृष्टींनीं चीन आणि हिंदुस्थान या दोन देशांमधील परिस्थितींत सारखेपणा आहे. तेव्हां चीनमध्यें यासंबंधांत जे प्रयोग चालू आहेत किंवा झाले आहेत त्यांची माहिती केवळ मनोरंजकच नव्हे तर उद्बोधकहि होईल. या दृष्टीनें चीनमधील एका भागांत म्हणजे कम्युनिस्ट-भागांत जमिनीचा प्रश्न कसा सोडविला गेला त्याची माहिती देण्याचा या लेखाचा उद्देश आहे.

कम्युनिस्टांनीं जमिनीचा प्रश्न फेरवांटणी करून, अगदीं तडकाफडकीं, म्हणजे सुमारें एका वर्षांत सोडविला. इतक्या त्वरेनें तो सोडविण्याजोगें त्या प्रश्नांत काय होतें ? देशामध्यें कोणत्याहि दिशेनें प्रगति करायची असल्यास तिच्या मुळाशीं 'जमीन कसणाऱ्याची' हें तत्त्व नसेल तर इतर उपाय व्यर्थ आहेत हें कम्युनिस्टांनीं ध्यानांत घेतलें आणि चीनच्या आपल्या ताब्यांतील भागांत जमिनीची फेरवांटणी त्यांनीं ( कम्युनिस्ट असूनहि ) अगदीं शांततेच्या मार्गानीं घडवून आणली. ती कश्या रीतीनें घडवून आणली, कसणाऱ्याच्या हातीं जमीन यायला पाहिजे म्हणजे ती किती यायला पाहिजे, यासंबंधांत त्यांनीं काय धोरण ठेवलें होतें, ही शांतता-पूर्ण क्रांति स्वतः किसानांनींच मुख्यतः कशी घडवून आणली व तिच्यांत कम्युनिस्ट-पक्षाचा किती वांटा होता, याविषयींची तपशीलवार आणि मनोवेधक माहिती वाचकांना लेखांतच सांपडणार आहे.

या लेखांतील मजकूर **ॲना लुईज् स्ट्राँग या बाईच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या** Dawn out of China **या पुस्तकांतील** " Land to the Tiller " **या प्रकरणांतून** घेतला आहे. ही बाई नामांकित अमेरिकन लेखिका आणि पत्रपंडिता असून जमिनीच्या फेरवांटणीचा कार्यक्रम चालू असतांनाच ती चीनमध्यें होती. तिनें त्या वेळीं पुष्कळ गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत आणि जश्या पाहिल्या तश्याच लिहिल्या आहेत. १९४७च्या फेब्रुवारीच्या सुमारास तिनें चीन सोडला, त्याच्या आधीं एक वर्षाहून अधिक काळ तिनें कम्युनिस्ट-चीनमध्यें घालविला आणि त्याची राजधानी येनान या गांवीं जवळजवळ सात महिने ती होती. माओ-त्से-टुंग, चू-ते आदि बहुतेक सर्व कम्युनिस्ट-पुढाऱ्यांशीं तिनें अनेक विषयांवर चर्चा केली, त्यांच्यापुढें शंका मांडल्या व समाधान करून घेतलें.

चीन सोडण्याच्या आधीं एके दिवशीं येनानमधल्या एका प्रमुख लष्करी अधिकाऱ्याशीं बोलतांना तिनें शेवटीं उद्गार काढले, " येनानमध्यें तुम्ही बारा वर्षें प्रयोगशाळेतल्याप्रमाणें प्रयोग करीत आहां. अत्यंत बिकट परिस्थितींत तुम्हीं काम केलें आहे. तुमची राजवट ( कीं लोकवट ? ) उत्तर चीन, मांचूरिया इत्यादि मोठ्या भूभागांत चालू आहे चौदा कोट लोक तुमच्या पाठीशीं आहेत. इतक्या सगळ्यांना चांगकैशेकला दडपून टाकणें कसें शक्य आहे ? तेव्हां तुम्ही हा जो एक जीवनाचा पट रचीत आहां तो टिकून राहणार आहे याविषयीं मला शंका वाटत नाहीं. त्याबरोबरच तुम्ही साऱ्या आशिया खंडालाहि मार्गदर्शन करीत आहां असें मला वाटतें. गरिबी, अज्ञान, जुलूम यासंबंधींच्या सर्व आशियांतील समस्या तुमच्यासारख्याच आहेत आणि म्हणूनच आशियाला युरोपकडून अमेरिकेपासून किंवा रशियापासून जेवढें शिकण्यासारखें असेल त्यापेक्षां किती तरी अधिक तुम्ही जे लढे लढलां, तुम्हांला जे विजय मिळाले, तुमच्या पदरीं जीं अपयशें आलीं, त्या सर्वांपासून शिकतां येण्यासारखें आहे.... ......"

आणि याच दृष्टीनें स्ट्राँगबाईनीं वर्णिलेला जमिनीच्या फेरवांटणीचा प्रश्न मराठी वाचकांना परिचित करून देणें इष्ट वाटतें. सगळी माहिती मीं स्ट्राँगबाईच्याच शब्दांत सांगितली आहे.

सर्व प्रश्नांवरील माहिती वाचण्याचें औत्सुक्य असणाऱ्यांनीं मूळ इंग्रजी पुस्तकच वाचणें आवश्यक आहे.

—अनुवादक.]






# कसणाऱ्याच्या हातीं जमीन

एकदां माओत्सेतुंग यांना मीं प्रश्न केला, "अंतिम विजयाबद्दल तुम्हांला मुळींच संशय वाटत नाहीं काय?" त्यावर त्यांनीं सैन्यबळासंबंधांत अवाक्षर देखील न काढतां मला उत्तर दिलें, "जमिनीच्या फेरवांटणीचा कार्यक्रम ज्या प्रमाणांत आम्ही पार पाडूं शकूं त्यावर आमचा विजय अवलंबून राहील. चांग कै शेकच्या पदरीं शेवटीं अपयश येणार यांत शंकाच नाहीं. कारण, त्याचें धोरण शेतकरी–वर्गाच्या विरोधी आहे. जमिनीचा प्रश्न आम्हीं चांगला सोडविला तर आमचा विजय ठरलेलाच आहे."

इसवी सनाच्या २१व्या सालीं वांग मांग या प्रगतिप्रिय सम्राटाचें राज्य चालू होतें तेव्हांपासून तों डॉ. सन्यत्सेन यांच्या आधुनिक काळापर्यंत अनेक प्रागतिक राजकारणी नेत्यांनीं कसणाऱ्याच्या हातीं जमीन कशी येईल व राहील ही समस्या अनेक प्रकारांनीं सोडविण्याचा प्रयत्न केला. १९२४ सालच्या कॉंग्रेसमध्यें कुओमिंटांग–पक्षानें आपल्या कार्यक्रमांत कसणाऱ्याची जमीन हें तत्त्व घातलें आणि त्यामुळें किसानांचें प्रचंड पाठबळ मिळून त्या पक्षाला मोठें यश मिळालें. त्यानंतरच्या काळांत चांग कै शेकनें किसान–संघटनांना दडपलें, त्याचप्रमाणें जमीनदारांना आपले खेड्यांतील हस्तक बनविलें, तरी कसणाऱ्याची जमीन हें तत्त्व अधिकृतपणें धाब्यावर बसविण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं.

याउलट कोणत्याहि गोष्टीला, मग ती आर्थिक उन्नति असो, लोकशाही सरकार असो, लष्करी सामर्थ्याचा प्रश्न असो, फार कशाला, शाळांची संख्या फोंफावायला हवी असो, 'कसणाऱ्याची जमीन' या तत्त्वाचें अधिष्ठान असल्यावांचून यश येणार नाहीं, हें चिनी कम्युनिस्टांनीं पूर्णपणें ओळखलें होतें. दोन हजार वर्षें राजेलोकांच्या पदरीं अपयश आलें, पण कम्युनिस्ट यशस्वी झाले, यांतलें इंगित हेंच आहे. त्यांनीं नुसते कायदे पास केले नाहींत किंवा पत्रकें वाटलीं नाहींत, तर आपल्या हातीं जमीन असली पाहिजे ही प्रेरणा त्यांनीं किसानांच्या मनांत निर्माण केली आणि म्हणून त्यांना यश आलें.

प्रत्येक कार्यकर्त्याला हें समजावून देण्यांत येतें: "शेतकऱ्यांना जमीन तुम्ही देत नाहीं आहां. कम्युनिस्ट थोडे, त्यांच्या हातीं जमिनी देण्याघेण्याचें सामर्थ्य नाहीं. हें सारें काम शेतकऱ्यांचें आहे आणि त्यांनींच तें संघटित रीत्या केलें तर तें यशस्वी होईल. जमीनदाराकडे एक शेतकरी गेला आणि त्यानें जमीन मागितली किंवा खंड कमी करायला सांगितलें तर कांहीं उपयोग व्हायचा नाहीं; दहा पांच गेले तरी उपयोग व्हायचा नाहीं; पण सगळा गांवच्या गांव जेव्हां एकमुखानें मागणी करील आणि ती करतांना आपण ती कशासाठीं करतों आहों हें ध्यानांत घेऊन करील तेव्हां मात्र जमीनदाराचें कांहीं एक चालायचें नाहीं.

जमीनदारीचें प्रमाण चीनमध्यें किती आहे याचे आंकडे उपलब्ध नाहींत. जमिनीची फेरवांटणी करतांना प्रत्येक खेड्यानें आंकडे ठेवलेले आहेत, पण ते गोळा करण्याचें काम अद्याप झालेलें नाहीं. मी ज्या अनेक खेड्यांतून हिंडलें तेथें आठ ते दहा आणे जमीन फेरवांटणी होण्याआधीं जमीनदाराच्या मालकीची असे. खंड धान्यरूपानें घेत आणि त्याचें प्रमाण नुसत्या जमिनीच्या वापराबद्दल पन्नास ते साठ टक्के आणि मालकानें अवजारें–बियाणें पुरविल्यास सत्तर किंवा अधिक टक्के असे.

जमिनीची फेरवांटणी हा लक्षावधि शेतकऱ्यांच्या जीवनमरणाचा प्रश्न होता. त्यांनीं ती केली ती जीवन सुधारण्यासाठीं नव्हे तर तें मिळविण्यासाठीं. उत्तर शेन्सी आणि कान्सू प्रांतांतील १९२९–३० सालच्या दुष्काळांत तीस ते साठ लाख लोक प्राणांस मुकले. दुसऱ्या एका प्रांतांत शंभरांतले ६२ तर तिसऱ्यांत शें. ७५ लोक मेले. ही प्राणहानि व्यर्थ होती. कंठाशीं प्राण येऊन लोक टांचा घांसून मरत होते आणि नफेबाज जमीनदारांचीं उखळें पांढरीं होत होतीं. तीन दिवसांचें अन्न दिलें, कीं वीस एकर जमीन हंसत हातांत येत होती.

कुटुंबेंच्या कुटुंबें धुळीस मिळत, पोरीबाळींना दासी म्हणून विकण्याची पाळी येई. अशा परिस्थितींत तिच्या बुडाशीं असलेल्या हक्कांचें किंवा नियमांचें पावित्र्य जनतेच्या दृष्टीपुढें कितीसें टिकणार? लोक बंड करून उठत आणि जमीनदार आपल्या पदरच्या सशस्त्र पुंडांकरवीं त्यांना दडपीत.








जपानी युद्धाच्या काळीं जमीनदारीचें स्वरूप अधिकच भीषण झालें. जपानव्याप्त प्रदेशांत सामान्यतः बडे जमीनदार त्यांचे हस्तक बनले. ते धान्यरूपानें तर कर वसूल करीतच, पण त्याबरोबरच वरून ठरलेल्या सक्तीच्या श्रमाचीहि किसानांच्याकडून कसून वसुली करूं लागले. अन्नधान्याचें वांटप त्यांच्याच हातीं, तेव्हां प्रत्येक व्यवहारांतल्या त्यांच्या नफेबाजीला अगदीं ऊत आला! खेडूत त्यांना जपान्यांपेक्षांहि दुष्ट मानूं लागले. कधींकधीं लपलेल्या देशभक्तांनाहि पकडून जपान्यांच्या हवालीं करावें आणि त्यांच्या जमिनी लंब्या कराव्या हा प्रकार चालू झाला. शांटुंग प्रांतांत जमिनीची फेरवांटणी चालू असतांना एक विलक्षण गोष्ट उघडकीस आली: तेथील एका जमीनदारानें असल्या रीतीनें आपल्या जमिनींत हजारों एकरांची भर टाकली होती; येवढेंच नव्हे तर मध्ययुगांत जमीनदाराला आपल्या एकाद्या कुळाची नवपरिणीत वधू आवडली तर तिच्याबरोबर पहिली रात्र घालविण्याचा हक्क त्याला असे. ती रूढीहि त्यानें पुनः प्रस्थापित केली होती.

मात्र सगळेच जमीनदार सरसकट नतद्रष्ट नव्हते. त्यांतले कांहीं समंजसहि होते. कांहीं जमीनदार तर कम्युनिस्ट–पक्षांतहि होते. परंतु एकंदरींत जमीनदारीचा खाक्याच असा कांहीं होता, कीं त्यांत जबर खंड, मध्ययुगीन पद्धतीचे कर, हुकूमशाही अधिकार व त्यांचा दुष्ट वापर यांचें थैमान चाले. प्रांताची उन्नतावस्था अशा स्थितींत कोठून होणार? लाखों लोक जेथें भुकेनें मरत, तेथें लोकशाही, शिक्षण, प्रगति या शब्दांचा वापर म्हणजे टवाळी करण्यासारखें होतें.

गेल्या वीस वर्षांमध्यें जमीन कसणाऱ्याच्या हातीं यावी यासाठीं कम्युनिस्टांनीं तीन निरनिराळ्या पद्धतींचा अवलंब करून पाहिला आहे.

जपानी युद्धाआधीं यादवी चालू होती त्या काळांत जमीन चक्क हिसकावून घेण्याचें धोरण चालू होतें. परंतु युद्ध चालू असतांना कुओमिंटांगबरोबर जपानविरोधी संयुक्त आघाडी निर्माण होण्यास सोपें जावें म्हणून त्यांनीं ही पद्धति सोडून दिली आणि तिच्याऐवजीं कुओमिंटांग–सरकारनें केलेले किसानांच्या हिताचे कायदे केवळ दप्तरींच पडून राहिले होते, ते अंमलांत आणण्याची खटपट सुरू केली. यांमध्यें खंड कमी करून घेणें आणि शेतकऱ्यांना जमिनी विकत मिळवून देणें यांचा अंतर्भाव होत होता. खंड कमी करून घेणें ही गोष्ट सोपी नव्हती. कायद्यांना स्वतःला कांहीं सामर्थ्य नसतें. जमीनदारांनीं जेथें शतकानुशतकें राज्य भोगलें तेथें त्यांना विरोध करण्याचा धीर किसानांना कोठून येणार? जेथें किसानसंघ स्थापन होई तेथें खंड कमी करून घेण्याचें काम सोपें होई. कायद्यानें आयत्या उत्पन्नावरील कराचा दर अधिक असे. कमी खंडाबरोबर या वाढत्या कराचा बोजा जमीनदारांवर पडला कीं त्यांना जमीनदारी चालू ठेवणें तोट्याचें होई व ते जमिनी विकण्यास तयार होऊं लागत. यानंतर किसानसंघांनीं या जमिनी सहकारी तत्त्वावर कर्जें देऊन रास्त भावानें किसानांना मिळण्याची सोय करून दिली. अशा रीतीनें कसणाऱ्याची जमीन या कार्यक्रमाला गति मिळाली. कम्युनिस्ट–कुओमिंटांगची संयुक्त राजवट जपानी युद्ध संपल्यानंतरहि चालू राहिली असती, तर हीच रीत पुढें चालू ठेवण्याचा कम्युनिस्टांचा विचार होता.

पण मग पुनः यादवी युद्ध पेटलें आणि त्यामुळें नवीन उपायांचा अवलंब करावा लागला. कित्येक ठिकाणीं किसानांनीं स्वयंस्फूर्तीनेंच नवीन उपायांचा अवलंब केला.

त्यांनीं मोठ्या जमीनदारांना अटक केली. ज्यांनीं जपानी हस्तक बनून देशद्रोह केला होता, त्यांची जनतेच्या पंचांपुढें चौकशी झाली आणि देशद्रोह करून लुबाडलेल्या साऱ्या जमिनी सरळ जप्त करण्यांत आल्या. ज्यांनीं कमी खंडाचे कायदे धुडकावून लावले होते, त्यांच्याविरुद्ध "हिशेब चुकता" करण्याची चळवळ सुरू करण्यांत आली. त्याचप्रमाणें जमिनी 'देणगी' म्हणून देण्यास किंवा रास्त किंमतीला विकण्यास जमीनदारांना त्यांनीं प्रवृत्त केलें.

जमिनीची फेरवांटणी करण्याचा कार्यक्रम जोरानें हातीं घेण्याचा निर्णय कम्युनिस्ट–पक्षाच्या मध्यवर्ती समितीनें १९४६ सालच्या मे महिन्यांत घेतला. यासंबंधांत माओत्सेटुंग रिपोर्ट तयार करीत असतांना त्याला कित्येक जपानमुक्त भागांतून शेत-

# कसणाऱ्याच्या हातीं जमीन

कऱ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें कोठपर्यंत मजल मारली आहे तें कळून आलें आणि त्यामुळेंच हा जमिनीचा प्रश्न पूर्णपणें सोडवून सरंजामशाहीचा नायनाट करण्याची वेळ येऊन ठेपली असल्याचें ध्यानांत येऊन मध्यवर्ती समितीनें तसा निर्णय घेतला.

एकदां हा निर्णय घेतल्यानंतर मात्र या प्रश्नाला कम्युनिस्ट–पक्षानें अग्रस्थान दिलें. यादवीयुद्ध चालू असतांना देखील मांचूरियांत जनरल लिन् पियाओनें आपले १२००० कसलेले सैन्याधिकारी आणि राजनैतिक कार्यकर्ते प्रत्यक्ष त्या भागांत कचाकचीची लढाई चालू नव्हती म्हणून आणि केवळ दैनंदिन लष्करी कार्यक्रम चालू ठेवण्यापेक्षां हें काम अधिक निकडीचें आहे या विचारानें हा प्रश्न सोडविण्यास मदत करण्यासाठीं पाठविले. कालगान शहरांतील प्रमुख लेखकांनींहि या कार्यक्रमास हातभार लावण्यासाठीं चीनच्या सर्व उत्तर भागांत पायीं प्रवास केला.

या कार्यक्रमाचा हेतु देशांत नंदनवन निर्माण करण्याचा अर्थातच नव्हता. सरंजामशाही नष्ट करून "नव्या भांडवलशाही"च्या आधारानें उत्पादनवाढ घडवून आणणें हा हेतु त्याच्या बुडाशीं होता. प्रत्येकाच्या ताब्यांतील जमिनीचें क्षेत्रफळ कांटेकोरपणानें सारखें असावें असा आग्रह केव्हांच धरण्यांत आला नाहीं. प्रमुख धोरण हें होतें कीं फेरवांटणी अश्या रीतीनें व्हावी, कीं कसणाऱ्यांपैकीं शक्य तितक्या अधिक किसानांना आपल्या जीवनाला पुरेल येवढें धान्य मिळावें. अधिकांत् अधिक किसान "मध्यम शेतकरी" बनावे.

येनानमधील संशोधन खात्यांतील लियाओ लूयेन यानें गरीब, मध्यम आणि गबर शेतकरी म्हणजे काय तें मला समजावून दिलें : आपल्या कुटुंबाचें पोषण करतां येईल किंवा क्वचित् प्रसंगीं विकण्याजोगें जादा धान्यहि ज्याच्याजवळ राहील तो मध्यम शेतकरी. ज्याच्याजवळ जमीनच नाहीं किंवा असली तरी ती इतकी थोडी, कीं कर्ज काढून दुसऱ्याची जमीन खंडानें कसल्याशिवाय ज्याचा निभाव लागणें शक्य नाहीं तो गरीब शेतकरी. उलट जो आपल्या जमिनिवर शेतमजूर राबवितो आणि ज्याच्याजवळ बाजारांत विकण्याजोगें पुष्कळ धान्य राहतें तो गबर शेतकरी. जास्तींत जास्त शेतकऱ्यांना "मध्यम" वर्गांत आणून व त्यांची गुलामीची किंवा उपासमारीची भीति नष्ट करून त्यांना विवंचनेपासून अलिप्त करतां आलें तरच पुढें समृद्धीसाठीं प्रयत्न करतां येईल ही कल्पना या कार्यक्रमाच्या बुडाशीं होती.

कसणाऱ्याच्या हातीं जमीन यावी म्हणून कम्युनिस्टांनीं या वेळीं जे उपाय योजिले त्यांची संख्या सुमारें दहा–बारा भरेल. लियाओ लुयेननें माझ्या विनंतीवरून पुढील यादी तयार केली:—

१ जपानी व त्यांचें हस्तक यांच्या ताब्यांतील जमिनी काढून घेणें,

२ दुष्ट श्रीमंतांनीं किसानांकडून बेकायदेशीर रीत्या बळकावलेल्या जमिनी काढून घेणें,

३ कर चुकविण्यासाठीं जमीनदारांनीं कागदोपत्रापासून लपवून ठेवलेल्या "अंधारांतल्या जमिनी" काढून घेणें,

४ पूर्वीच्या राजेरजवाड्यांच्या जमिनी जप्त करणें,

५ सरकारी जमिनी वांटून देणें,

६ कर्जावरील जबर व्याजाच्या बदली सावकारांनीं बळकावलेल्या किंवा दुष्काळाच्या दिवसांत नाडलेल्या शेतकऱ्यांकडून त्यांनीं बळकावलेल्या जमिनी परत करविणें,

७ खंडाच्या बाबतींत फसवाफसवी करणाऱ्या जमीनदाराच्या दुष्टपणाचा "हिशेब चुकता" करणें,

८ फुकट श्रम करून घेतल्याबद्दलचा किंवा शरीराला अपाय केला असल्यास त्याबद्दलचा "हिशेब चुकता" करणें,

९ जमीन देणगी म्हणून देण्याची चळवळ उभारून गबर जमीनदारांना जमिनी देणगी म्हणून देण्यास प्रवृत्त करणें,

१० जमिनी खंडानें लावणें फायद्याचें नाहीं असें आढळून येऊन जे जमीनदार आपल्या जमिनी रास्त किंमतीला विकण्यास तयार होतील त्यांच्या जमिनी घेण्यास शेतकऱ्यांना शेतकरीसंघांनीं कर्जें देणें,

११ सरकारनें कर्जरोखे देऊन जमिनी विकत घेऊन परत त्या शेतकऱ्यांना विकणें.








फेरवांटणीचा हा कार्यक्रम मुख्यतः किसान-संघांनींच पार पाडला. स्वतः जमीन कसणाऱ्या कोणाहि शेतकऱ्याला इच्छेनुसार या संघाचा सदस्य होतां येई. कम्युनिस्ट-सैन्यांतील आणि शिक्षण-क्षेत्रांतील कार्यकर्ते किसानांना मदत करीत, कार्यप्रवण करीत, पण कोणत्या पद्धती वापरणें शक्य आहे किंवा कायदे कोणते आहेत हें एकदां समजावून दिल्यावर कोणत्या जमिनींवर तावा मिळवायचा, तो कोणत्या मार्गांनीं मिळवायचा किंवा त्यांची वांटणी कोणांमध्यें आणि कशी करायची याचा निर्णय घेणें सर्वस्वीं स्थानिक शेतकऱ्यांच्याच हातीं असे. विशिष्ट जमनिदाराकडून जमीन देणगी म्हणून मिळविणें किंवा "हिशेब चुकता" करणें याचा प्रचारहि शक्य असल्यास ते करीत. पण मालकी बदलण्याचे किंवा विकत घेण्याचे सर्व व्यवहार रीतसर सरकारी अधिकाऱ्याकरवींच होत.

कांहीं जमिनी जमीनदारांनीं देणगीच्या रूपानें दिल्या. उदाहरणार्थ, चाहार प्रांतांतील वरिष्ठ न्यायालयाचा प्रमुख स्वतः जमीनदार आणि कम्युनिस्ट होता. त्यानें २३ ऑगस्ट १९४६ रोजीं भरलेल्या मोठ्या सभेंत आपल्या कुटुंबाला मशागत करतां येईल येवढी जमीन ठेवून बाकीची सर्व जमीन जमीन नसणाऱ्या शेतकऱ्यांना देऊन टाकली! जे कम्युनिस्ट होते त्यांच्या बाबतींत ही गोष्ट अपेक्षितच होती. पण इतरांनींहि इतक्या ठळकपणानें नाहीं तरी देणग्या दिल्या. मांचूरियांतील एका कार्यकर्त्याच्या मतें बहुतेक "ऐच्छिक देणग्या" तितक्याश्या ऐच्छिक नव्हत्या. परंतु एकंदरींत जमीनदारांनीं ओळखलें कीं आपण सलोख्यानें घेतलें तरच त्या मानानें अधिक जमीन आपल्या हातीं शिल्लक राहूं शकेल; उलट "हिशेब चुकता" करण्याच्या चावटींत आपण सांपडलों तर भलतेंच व्हायचें. त्यांची ही अटकळ चूक नव्हती.

या चळवळीच्या वेळीं कांहीं जमीनदारांनीं खरी दानशूरता दाखविली. त्यांमध्यें आन वेन चिन या वृद्ध जमीनदाराची अवश्य गणना व्हायला हवी. स्वारी घरंदाज कुळांतील असून पुरी उंच होती व बघतांच त्याच्याबद्दल आदराची भावना निर्माण होई. तो एका दगडी प्रासादांत राही. तो प्रासाद एका टेकडीवर होता आणि त्यावरून कोठूनहि कोठेंहि दृष्टि टाकली कीं रम्य देखावा दृष्टीस पडे. त्या वाड्यांत कोरीव काम केलेल्या अनेक हस्तिदंती सुबक वस्तू, पंचधातूंचे सुंदर पुतळे, वंशपरंपरागत जुनीं सुंदर तैलचित्रें, असा सारा नमुनेदार मामला होता. अनेक लटांबावटळींतून त्याच्या हातची 'येनान सीमाप्रांतां'तील पुष्कळशी जमीन गेली होती. परंतु 'देणगी'च्या चळवळीच्या वेळीं वृद्ध आनवावानें पुढाकार घेतला आणि जाहीर केलें, "माझ्याजवळची दीडशें एकर जमीन मी देणगी म्हणून देतों. माझ्याजवळ अद्याप माझ्या मुलांना मशागत करतां येईल इतकी जमीन शिल्लक राहते आहे, तेव्हां कांहीं हरकत नाहीं."

त्यानें आणखीहि पुढें म्हटलें, "या भागांत कम्युनिस्ट आले तेव्हां मी त्यांच्याविरुद्ध होतों—किंबहुना एका कम्युनिस्ट-विरोधी समितीचा सभासदहि होतों. अद्यापहि मीं कम्युनिस्ट नाहीं आणि कधीं होईनसें वाटतहि नाहीं. तथापि त्यांच्या जमीनसुधारणेच्या धोरणाशीं मी सहमत आहें. श्रीमंतांच्या हातीं डोळे ठरणार नाहींत येवढी अवाढव्य जमीन आणि गरिबांना साधा पंचा वाळत घालण्यापुरताहि तुकडा नाहीं! खंडवसुलीवर माझा प्रपंच चालू होता, तेव्हां मी खोऱ्यानें पैसे ओढीत होतों; पण रात्रीं मला शांत झोप येत नसे. सारखी दरोडेखोरांची भीति वाटे. आतां माझ्या कुळांना सुखाचे दिवस आलेले मी पाहतों तेव्हां मला अभिमान वाटतो आणि मी मनाशीं म्हणतों, आपल्या देशाला संपन्न आणि बलशाली करण्याच्या प्रयत्नांत आपलाहि वांटा आहे." गांवांतील कम्युनिस्टांसकट सर्व लोकांना आनवावाचें हृदय समजलें आणि निवडणुकीच्या वेळीं त्याला त्यांनीं एका महत्त्वाच्या पदावर निवडून दिलें.

हू ट्रन त्सू नांवाच्या एका खेड्यामध्यें "हिशेब चुकता" करण्यावेळची एक सभा पाहण्यास मी गेलों होतों. त्या सभेंत शेतावरचें काम संपवून रात्रीं लोक जमलेले होते. खेड्यांतील उंचसखल गल्लीनें अंधारांतून जात असतां दूरवर पडसाद उमटवीत ऐकूं येणाऱ्या आरडण्या-ओरडण्याच्या आवाजानें











तिचा माग काढीत आम्ही सभास्थानीं जाऊन पोंचलों. जिच्या सभोंवतालीं अनेक खोपटांच्या मातीच्या भिंती होत्या आणि मध्यभागीं थोडीशी मोकळी बखळ होती, अश्या जागेंत सुमारें पांचशें ते सहाशें किसान नेहमींचे विटके निळे कपडे घालून जमलेले होते. सभोंवार 'पाय आंवळलेल्या' बायका गटागटानें रेंगाळत हिंडत होत्या. पुढच्या रांगेंत तरुण वयाचे सुमारें वीसजण दंडावर तांबड्या पट्ट्या बांधून बसलेले होते. हे युवक-संघाचे लोक असून घोषणा ओरडण्यांत पुढाकार घेत होते.

माझ्याबरोबर कालगानच्या किसानसंघाचा एक प्रतिनिधि आला होता. त्यानें मला माहिती दिली: या खेड्यामध्यें थोड्याच दिवसांपूर्वी किसानसंघ स्थापन झाला आहे. नुकतीच सुमारें पंधरा दिवसांपूर्वी दहावारा शेतकऱ्यांनीं आजूबाजूच्या खेड्यांमधून झालेल्या जमिनींच्या फेरवांटणीसंबंधांत चर्चा केली. त्यांचा विचार झाला, कीं आपल्या येथेंहि कांहीं नाठाळ जमीनदार आहेत त्यांना ठीक केलें पाहिजे. आणखी वीस एक शेतकऱ्यांशीं त्यांनीं याबाबत अधिक सल्ला-मसलती केल्या आणि कालगान शहराच्या किसानसंघापाशीं त्यांनीं तांत्रिक सल्ल्याची मागणी केली. ही सभा त्याचाच परिणाम होती. माझ्या बरोबरच्या प्रतिनिधीनें प्रत्यक्ष सभेंत भाग घेतला नाहीं; परंतु आम्ही सभेंत बसलों होतों आणि चालू असलेल्या कामकाजाची माहिती तो मला पुरवीत होता. सभापतीचें काम स्थानिक शेतकरीच पाळीपाळीनें करीत होते.

जमलेल्या शेतकऱ्यांच्या समोर सहा माणसांना उभें करण्यांत आले होतें. दिव्याचा प्रकाश त्यांच्या तोंडावर पडला होता. त्यांतल्या एकाचें नांव 'माय चिआओ पू' होतें. जपानी काळांत तो एका 'चू'-चा ( अठरा खेड्यांच्या विभागाचा ) प्रमुख अधिकारी होता. त्याची मुद्रा कठोर आणि वर्चस्वी होती. विशिष्ट शहरी अधिकाऱ्याची प्रतिमा होती ती. मध्यम वयाचा एक कृशसा शेतकरी त्याच्याशीं तावातावानें बोलत जाब विचारीत होता : "आणि हें सांग, रेल्वेरस्त्याच्या अंगाची समाईक जमीन कोणीं बळकावली ? कोणीं ? तूंच कीं नाहीं ?" जमिनीचा हा पट्टा तीस फूट रुंद आणि एक मैल लांब होता.

"मीं ती जागा 'चू'साठींच घेतली होती." मायनें सांगितलें.

सगळीकडून खोंचक हास्याचे फवारे उडाले! "'चू' म्हणजे दुसरं कोण ? तूंच! तूंच आम्हांला फुकटांत राबवून घेतलंस नि वर आमचं पीकहि लुबाडलंस!"

"तूंच! तूंच बळकावलंस पीक!" लाल पट्टे बांधलेले युवक ओरडले.

"पण "चू"साठीं कांहीं खर्च तरी करायला नको?" माय म्हणाला.

"खर्च म्हणे खर्च! जपान्यांच्याकरतां सक्तीनं कामं करून घेण्यासाठीं मजूर पकडून आणणाऱ्या तुझ्या गुंडांना लांच द्यायची होती, तोच कीं नाहीं खर्च ?"

मायच्या शेजारीं उभे होते ते त्याचे हस्तक गुंडच होते. ते बजावूं लागले, "मायनं आम्हांला फारच थोडा वांटा दिला! बहुतेक सगळं त्यानंच गिळंकृत केलं!" त्यांच्यामध्यें अशा प्रकारें एकमेकांवर दोष ढकलण्याची मग चढाओढच सुरू झाली आणि जमलेल्या लोकांची करमणूक होऊं लागली.

नंतर जमलेल्या लोकांमधून एक दाढीवाला माणूस पावलें टाकीत पुढें आला आणि मायच्या अगदीं जवळ जाऊन नजरेला नजर भिडवीत तीव्रपणें बोलूं लागला, "जपान्यांनीं प्रत्येक घरागणिक सक्तीच्या मजुरीसाठीं एकच माणूस घेऊन यायला सांगितलं असतांना आपलं घर चुकवून माझे दोन मुलगे कोणीं ओढून नेले ? बोल! कोणीं नेले ?"

एक क्षणभर स्तब्धता. आणि माय उत्तरला, "होय मींच!"

"माझ्या एका मुलानं तुझ्याबद्दल काम केलं! टाक त्याचे पैसे!"

'हिशेब चुकता' करण्याच्या सभेंतील स्पष्ट स्वरूपांत केलेली हीच पहिली मागणी. जमलेल्या सगळ्यांनीं तिला दुजोरा दिला. "तुझ्या कामाबद्दलचे टाक त्याचे पैसे!" लाल पट्टेवाले युवक ओरडले.








माय लागलीच क्षमेची याचना करूं लागला. "माझ्या भल्या मित्रांनो ! कृपा करा नि माझ्याशीं असे निष्ठुर होऊं नका !"

"नाहीं नाहीं ! पापाचा झाडा झालाच पाहिजे ! भरपाई झालीच पाहिजे !" मागच्या बाजूचा एक माणूस ओरडला.

"भरपाई झाल्याबिगर माफीची बात नाहीं !" दुसरा ओरडला.

पाठीला पीक आलेला एक म्हातारा पुढें आला आणि आपली हातभर लांब चिलीम सांवरीत म्हणाला, "अरे पण त्यानं एकंदर काय काय केलं आहे त्याची एकदां त्याला नीट आठवण तर करून द्याल ? नीट नि स्पष्ट मांडा त्याचे गुन्हे !"

एक तरुण शेतकरी उठला. "गुदस्त सालीं जपानी मला न्यायला आले होते. आईनं विनवण्या केल्या, 'एकटा मुलगा आहे, शेतावर कोण काम करणार ? त्यासाठीं तरी त्याला नेऊं नका.' तर तूं निर्दयपणानं तिला दोनदां लाथ मारलीस !"

"त्या दोन्ही लाथांचा हिशेब झाला पाहिजे !" सगळेजण एकमुखानें ओरडले.

एक म्हातारी धडपडत पुढें आली. तिचे पाय लटपटत होते. तिला कष्ट होत होते. ती मायला जाब विचारीत होती. तिला हें धैर्य कोठून आलें ? अधिकाऱ्यासमोर बाईनें उभें राहणें ही गोष्ट कधीं शक्य होती का ? पण या सभेंत ती धीट झाली. ती म्हणाली, "माझ्या घरधन्यांवर खोटा आरोप ठेवून त्यांच्याकडून अठरा डॉलर तूं उकळलेस, आहे आठवण ? अठरा डॉलर म्हणजे किती, आहे ठाऊक ? अठरा डॉलर म्हणजे एक वर्षाची खावटी ! आहे आठवण ?"

"आहे !" चडफडत मायनें कबूल केलें.

"मग त्याच्या बदला मला पांच बुशेल धान्य मिळालं पाहिजे." ती जरा बिचकत होती. जमलेल्यांना वाटलें, तिनें अधिक मागणी करावी. एकजणानें आवाज काढला, "नाहीं ! पांचांनीं भागायचं नाहीं. दहा पाहिजेत."

"दहा बुशेल मिळाले पाहिजेत !" लाल पट्टेवाले युवक ओरडले.

आणखी एक बाई लटपटत पुढें आली. "तूं आधीं माझ्या मुलाला सक्तीची मजुरी करायला पाठवलेंस नि नंतर माझ्या नवऱ्यालाहि पाठवलेंस. तो नाहीं म्हणत होता; कारण, एका घरांतून दोघांजणांनीं जायची जरूरी नव्हती. म्हणून त्याला उशीर झाला, तेव्हां जपान्यांनीं त्याच्यावर कुत्रे घातले नि तो मेला. बोल, त्याचा प्राण गेला, त्याची काय किंमत देणार आहेस ?" एक क्षणभर सगळीकडे दुःखपूर्ण स्तब्धता पसरली. ......

हिशेब गोळा करण्याचें हें काम अर्धा तासपर्यंत चाललें. 'माय हा लांचखाऊ व जुलुमी होता, स्वतःच्या फायद्यासाठीं त्यानें सामायिक जमिनी लुबाडल्या आणि मजुरांना त्यानें स्वतःसाठीं फुकट राबवून घेतलें,' असे आरोप त्याच्यावर लागू झाले. हे बहुतेक सगळे त्यानें कबूल केले आणि क्षमेची याचना केली; पण भरपाई करण्याची मात्र त्याची तयारी नव्हती.

"भरपाई झालीच पाहिजे ! तुला जर आम्हां लोकांपैकीं एक म्हणून राहायचं असेल तर कलंक धुऊन टाक !" सगळ्यांनीं स्पष्ट मागणी केली.

सरतेशेवटीं त्या क्षणाच्या अध्यक्षानें मायला सांगितलें, "उद्यां रात्रींपर्यंत विचार कर. उद्यां पुनः सभा भरेल आणि सारा गांव तुझ्याशीं झगडून न्याय मिळविण्याचा प्रयत्न करील."

शेतकऱ्यांनीं नुकतीच निवडून दिलेली अकरा जणांची "हिशेब चुकता करणारी" समिति रात्रींच्या या साऱ्या मागण्यांची यादी करून दुसऱ्या कांहीं मागण्या येतील त्याहि घेईल, ही माहिती मला समजली. नंतर सभेंत आणखी दोघां जपानी काळांतल्या अधिकाऱ्यांची चौकशी होऊन सभा आठ वाजतां आटोपली. चीनमध्यें शेतकरी लवकर झोंपतात.

स्थानिक अध्यक्ष मला म्हणाला, "ही तर पहिलीच सभा. या सभेंतून काय निष्पन्न होईल तें मला तुम्हांला सांगायला मिळायचं नाहीं, याचं मला वाईट वाटतं. पण मायशीं झगडण्याचं काम आम्हांला पुष्कळ सभांतून करावं लागणार असं दिसतं. तो अगदीं चिवट आहे."

"समजा, तो सारखा नकार देत राहिला तर काय ?" मीं विचारलें.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# कसणाऱ्याच्या हातीं जमीन

" शेजाऱ्यांशीं सुखासमाधानानें राहण्याकरतां तरी त्याला नमावं लागेलच. त्याची स्थिति कांहीं अशी नाहीं कीं शहरांत जावं नि इथल्या वसुलविर तिथं राहावं. त्याला राहावं लागणार आहे इथंच."

जवळच्याच 'शांत भिंत' नांवाच्या खेड्यांत जमिनीच्या फेरवांटणीचें कार्य पुरें झालें होतें. तेथला सर्वांत मोठा जमीनदार १२० एकरांचा मालक होता. त्याच्या जमिनीवर तिसांहून अधिक कुळें राबत व त्यांवर त्याचा सरंजामी अधिकार चाले. दर वर्षी एका विशिष्ट सणाच्या आधीं त्या कुळांकडून तो घराची डागडुजी, रंगरंगोटी आणि साफसफाई एक पै देखील न देतां फुकटांत करून घेई. "हिशेब चुकता' करण्याच्या वेळीं एक म्हातारी म्हणाली, "मीं याच्या नऊ माणसांचे कपडे आठ वर्षे धुतले, पण त्याबद्दल मला कधीं दमडी देखील मिळाली नाहीं!" दुसऱ्या एका बाईनें सांगितलें, "मी यांगच्या तान्ह्या मुलाला एक वर्षभर अंगावर पाजलें. त्यानें मला त्याबद्दल जमीन कबूल केली होती; पण शेवटीं मला ढेंकूळ देखील मिळालें नाहीं." या दोघींना प्रत्येकीं एक एकर जमीन देण्यांत आली.

सभेच्या वेळीं यांग भलताच नरम पडलेला दिसून आला. त्यानें तावडतोब सारे आरोप कबूल करून म्हटलें, "पण तुमच्या या न्याय्य मागण्या पुऱ्या करायच्या तर माझ्याजवळ तेवढी जमीन नाहीं." त्यानें आपली सारी जमीन ग्रामबंधूंना देऊं केली. तथापि त्यांनीं त्याची सारी जमीन घेतली नाहीं. त्याच्या कुटुंबाच्या पोषणासाठीं त्यांनीं त्याच्याजवळ बारा एकर जमीन राहूं दिली आणि त्यामुळें गबर शेतकऱ्यांत त्याची गणना होणार होती तरी ती होऊं दिली.

'शांत भिंत' या खेड्याची लोकसंख्या २५०० असून कुटुंबांची संख्या ६२५ होती. फेरवांटणीपूर्वी एकंदर एक हजार एकर जमीन फक्त २६ जमीनदारांच्या हातीं होती. ७६६ एकर जमीन १६४ शेतकऱ्यांच्या मालकीची होती. ह्या शेतकऱ्यांच्या खर्चाची तोंडमिळवणी होत असे; पण उरलेल्या कुटुंबांकडे मुळींच जमीन नव्हती. त्यांतील २३३ कुटुंबें उत्पन्नांतला वांटा घेण्याच्या बोलीनें जमिनी खंडानें घेत आणि बाकीचीं २०२ कुटुंबें निव्वळ शेतमजुरी करीत. दर डोई अर्धा एकर जमीन असली कीं या भागांतलें कुटुंब 'मध्यम शेतकरी' या वर्गांत जमा होई. जमिनीची फेरवांटणी झाल्यावर 'गबर शेतकऱ्यां'ची संख्या ६५ झाली. (यांत जुने जमीनदार आलेच) आणि उरलेले सारे शेतकरी 'मध्यम शेतकरी' बनले. धान्यवांटा घेऊन दुसऱ्याच्या जमिनी कसणारे किंवा शेतमजूर हा वर्ग अगदीं नाहींसा झाला.

फेरवांटणीचें काम करतांना सर्वच जमिनींसाठीं झगडा करावा लागला नाहीं. त्यांपैकीं कांहीं विकतहि घेतल्या गेल्या. होपे या प्रांतांतील सर्वसाधारण अशा एका खेड्यांत १६६ एकर जमीन जमीनदारांकडून मिळाली. त्यापैकीं १४ एकर देणगी म्हणून मिळाले, ७३ एकर विकत घेण्यांत आले आणि उरलेले ७९ एकर 'हिशेब चुकता' करून मिळाले. या सर्व उपायांनींहि फेरवांटणीचें काम योग्य प्रमाणांत झालें नाहीं असें आढळून आलें तर शेवटचा म्हणून एक उपाय योजण्यांत येई. प्रांतिक सरकार जमीनदारांना 'जमीन-कर्जरोखे' देई व त्यांच्या बदला त्यांच्यापाशीं अपेक्षित जमिनीपेक्षां जेवढी अधिक असेल तेवढी जमीन त्यांना सरकारला विकण्यास भाग पाडी. नंतर सरकार ती जमीन शेतकऱ्यांना परत विकत असे.

सक्तीच्या विक्रीची ही पद्धत 'येनान सीमा-प्रांतां'त उपयोगांत आणावी लागली. कारण, तेथें पुष्कळ काळपर्यंत कम्युनिस्ट-सत्ता असल्यामुळें ज्यांच्याकडून जमिनी काढून घेतां येतील असे देश-द्रोही जमीनदारहि नव्हते किंवा 'हिशेब चुकता' करून कोणाच्या जमिनी मिळतील असे अत्याचारी प्रसंगहि घडलेले नव्हते. १९४६च्या डिसेंबरांत एक कायदा पास करण्यांत आला, त्यायोगें सरासरीनें 'मध्यम शेतकरी' होण्याला जेवढी जमीन लागे (हें प्रमाण निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळें असे) तिच्या फक्त दीडपटच जमीन जमीनदाराला स्वतः-च्या ताब्यांत ठेवण्याची मुभा मिळाली; जे जमीन-दार आपल्या सत्कृत्यांमुळें देशभक्त गणले जात होते त्यांना दुप्पट जमीन ठेवण्याची मुभा मिळाली; पण याहून अधिक असेल ती जमीन मात्र सरकारला








विकलीच पाहिजे असा नियम झाला. विक्रीचा भाव तिघां सदस्यांची एक समिति ठरवी. एक स्थानिक सरकारचा, एक किसानसंघाचा व एक जमीनदार-संघाचा असे ते तीन प्रतिनिधी असत. जमिनीची किंमत जमीनदारांना सरकार देई आणि ती जमीन सरकार निम्या भावानें शेतकऱ्यांस पुनः विके. सर्व किंमती धान्यांत मोजल्या जात; कारण, पैशाची किंमत अस्थिर असे आणि सर्व व्यवहार समान वार्षिक हप्त्यांनीं दहा वर्षांत पुरे होण्याचा वायदा असे.

सारांश, १९४६-४७ सालीं जमिनीच्या फेरवांटणीचा जो कार्यक्रम अंमलांत आणला गेला त्याचें स्वरूप केवळ जमिनी हिसकावून घेणें असें नव्हतें. खरेदी, देणगी, सरकारी रोखे, दंड, सामाजिक दडपण, हिसकावणें इत्यादि उपायांबरोबरच स्थानिक कार्यकर्त्यांचा ज्यांना पाठिंबा मिळूं शकेल अशा शक्य त्या सर्व उपायांनीं कसणाऱ्याच्या हातीं जमीन यावी या हेतूनें झालेलें तें एक आंदोलन होतें. ही केलेली वांटणी टिकून राहण्यासाठीं तिला स्थानिक लोकमताचें पाठबळ असण्यापेक्षां स्थानिक लोकांचें सक्रिय पाठबळ असणें आवश्यक होतें. पूर्वीच्या शतकांमधून करण्यांत आलेल्या सुधारणा अपयशी झाल्या होत्या; कारण, त्यांना जागृत आणि कार्यप्रवण अशा किसानांचा पाठिंबा नव्हता. कम्युनिस्टांनीं आपण जी नवीन लोकशाही निर्माण करण्याची आकांक्षा बाळगली आहे तिला जनतेची सामाजिक जागृति आणि फेरवांटणीच्या कार्यक्रमाच्या पोटीं निर्माण होणारी स्वसामर्थ्याची जाणीव या दोन गोष्टी आधारभूत असल्या तरच ती निर्माण होईल हें ओळखलें होतें. त्याचप्रमाणें जमीनवांटणीच्या द्वारां शेतकऱ्यांच्या ठिकाणीं जी आर्थिक निश्चितता येईल तीच नवीन भांडवलशाहीचा पाया होईल व तीच शेवटीं सरंजामशाहीला नष्ट करील हेंहि त्यांनीं ध्यानांत घेतलें होतें.

जमीनदारांच्याकडे जें शिलकी भांडवल असेल किंवा जमिनीच्या विक्रीपासून जो पैसा त्यांच्या हातीं आला असेल तो त्यांनीं प्रादेशिक उद्योगधंद्यांत गुंतवावा म्हणून उद्योगधंद्यापासून होणाऱ्या नफ्यावर कर न ठेवण्याचें किंवा ठेवला तर नाममात्र ठेवण्याचें धोरण अंमलांत आणलें गेलें. या योगें सरंजामी जमीनदारांचें लहान भांडवलदारांत रूपांतर होऊन देशाला जरूर असलेल्या वस्तू निर्माण होऊं लागल्या, हाहि एक फायदा झाला. स्थानिक परिस्थित्यनुसार 'मध्यम शेतकऱ्यां'च्या जमिनींच्या दीडपटीपासून तिपटीपर्यंत जमिनी स्वतःजवळ ठेवून आपलें आयुष्य सुखानें घालवण्याचा त्यांना हक्क आहे ही गोष्ट मान्य करण्यांत आली. एकंदर परिस्थितीचे वाहणारे वारे पाहून व त्याचबरोबर फ्रेंच क्रांतींत व नंतरच्या क्रांत्यांमधून जमीनदारांची काय फरफर झाली हें ध्यानांत घेऊन आपल्याला तसाच भीषण भविष्यकाल येणार आहे कीं काय अशी जमीनदारांनीं धास्ती खाल्ली होती; तथापि प्रत्यक्षांत त्यांच्या शरीरांना तर अपाय झाला नाहींच, पण त्यांचीं घरेंदारेंहि उध्वस्त झालीं नाहींत आणि त्यांच्या हातून जमिनी गेल्या तरी पोटापुरत्या तरी कां होईना आपल्या हातीं राहिल्या या विचारानें त्यांनीं जे निःश्वास सोडले ते त्यांना हायसें वाटल्याचेच द्योतक होते. यावरून चिनी लोकांमध्यें सन्मान्य अटींवर समझोता करण्याचाच कल दिसून येतो. चिनी कम्युनिस्टांना देखील फेरवांटणीचा प्रश्न कांहीं मारकाट न होतां सुरळीतपणें पार पडला ही गोष्ट अभिमानाचीच वाटली. होपे प्रांतांतील एका कार्यकर्त्यानें इतिहासांतील अशा क्रांत्यांची आपल्या देशांतील या क्रांतीशीं तुलना करून अभिमानानें सांगितलें कीं, "आमच्याकडे जमीनदारांनीं सामान्यतः सशस्त्र उठावणी केली नाहीं." तो पुढें म्हणाला, "आमच्यांतल्या जमीनदारांनीं गांवांतून पळ काढला नाहीं. ते आपल्या गांवींच राहिले. त्यांपैकीं कांहीं-जणांनीं, विशेषतः त्यांच्या कुटुंबांतील तरुण मंडळींपैकीं जे आमच्याबरोबर जपान्यांशीं लढले होते त्यांनीं आमच्याशीं सहकार्यहि केलें."

१९४७च्या सुरुवातीला निरनिराळ्या प्रांतांमधून जमिनीची फेरवांटणी संपूर्ण झाल्याचे संदेश नभोवाणीवरून निरनिराळ्या प्रांतांमधून येनानमध्यें येऊन थडकूं लागले!... 'चार प्रांत' भागांत दोन कोटी लोकांना प्रत्येकीं अर्धा ते एक एकर जमीन मिळाली. दाट लोकवस्तीच्या शांटुंग प्रांतांत दीड कोटी लोकांस दर डोई ⅓ एकर जमीन मिळाली. विरळ लोकवस्तीच्या मांचूरियांत प्रत्येकाला एक ते दोन एकर जमीन मिळाली. पाश्चात्य परिस्थितीशीं तुलना








# कसणाऱ्याच्या हातीं जमीन

केल्यास हे आंकडे क्षुद्र वाटण्याचा संभव आहे; परंतु चिनी शेतकऱ्याच्या जीवितांत जो बदल झाला होता तो जन्मभर उपासमार आणि पोटभर अन्न, गुलामी आणि स्वातंत्र्य, कायमची निराशा आणि आशेचा उदय यांमधील भिन्नतेसारखा होता. सगळे आंकडे एकत्र केल्यावर असें आढळून आलें कीं, एका वर्षाच्या अवधींत सहा कोटींहून अधिक शेतकऱ्यांना जमिनी मिळाल्या होत्या. इतिहासामध्यें जमिनींसंबंधांतली ही सर्वांत मोठी क्रांति होती.

सैन्यामधून (आतां हें सैन्य 'जनतेचें स्वातंत्र्य–सैन्य' या नांवानें एकत्रित करण्यांत आलें होतें.) सर्व ठिकाणांहून संदेश येऊं लागले : चांग–कै–शेकच्या सैन्यापासून आपल्या जमिनींचें संरक्षण करण्याचा स्वयंसेवकांचा उत्साह जपानी लढाईच्या वेळच्यापेक्षां किती तरी अधिक आहे! एक राजनैतिक प्रवक्ता म्हणाला, "पूर्वी आपण कां आणि कशाकरतां लढत आहों या गोष्टी आम्हांला त्यांना सांगाव्या लागत. आतां आम्हांलाच ते साऱ्या गोष्टी स्पष्ट करून सांगूं शकतात. त्यांच्या हातीं आतां जमीन आहे."

शांटुंग प्रांतांतील एका खेड्यांतून संदेश आला, "आम्हीं जमीनवांटणीचा कार्यक्रम संपविला त्या वेळीं चांग कै शेकच्या तोफा धडधडत होत्या. त्साओ नांवाच्या जमीनदारानें आम्हांला धमकी दिली, 'कुओमिंटांगचे लोक आले, कीं तुमच्या या सगळ्या पुंडाईचा वचपा काढीन.' तेव्हां शेतकऱ्यांनीं सगळीं म्हातारीं माणसें आणि मुलें आंत पाठीमागें दुसऱ्या खेड्यांमध्यें पाठवून दिलीं आणि नंतरच्या सभेंत तीन एकर जमीन आणि सतरा बुशेल धान्य घेऊन 'हिशेब चुकता' करण्याचा कार्यक्रम चालूच ठेवला. जवळचें सर्व अन्न जनावरांवर लादून त्यांनीं पाठीमागें पाठविलें आणि तरुण मंडळींनीं तेथेंच राहून दोन एकर जमिनींत गहूं पेरण्याचें सर्वांचें काम पुरें करून टाकलें."

या पद्धतीनें सुरू केलेलें जमिनीच्या फेरवांटणीचें हें कार्य ऐन लढाईच्या ठिकाणीं देखील चालू होतें असें आढळून आलें. ज्या वेळीं उत्तर किआंगसू प्रांतांतील निरनिराळे भाग चांग कै शेक जिंकत असल्याच्या बातम्या येत होत्या, त्याच वेळीं त्याच प्रांतांतल्या दीड कोट शेतकऱ्यांना जमिनी मिळाल्या. या प्रांतांत तर चांग कै शेक अगदीं खोलवर घुसला होता आणि मोठमोठीं गांवें जिंकून व मोठ्या रस्त्यांची नाकेबंदी करून जागोजागीं त्यानें माऱ्याचीं ठिकाणेंहि बांधून काढण्याचा सपाटा चालविला होता! तरी सुद्धां त्या माऱ्याच्या ठाण्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांत येतील अशा खेड्यांतून स्थानिक गनिमी सैनिकांच्या संरक्षणाखालीं जमिनीच्या फेरवांटणीचा कार्यक्रम चालूच होता. कुकाओ, नानटुंग आणि चिंकियांग हीं मध्यवर्ति ठिकाणें चांग कै शेकच्या ताब्यांत होतीं; पण त्यांना लागूनच असलेल्या भोंवतालच्या खेड्यांमधून किसान–संघांनीं फेरवांटणीचा कार्यक्रम तीन दिवसांत उरकला. कांहीं गांवांमधून तर ज्या जमिनींवर माऱ्याचीं नाकीं उभारलेलीं होतीं त्या जमिनींची देखील वांटणी शेतकऱ्यांनीं करून टाकली! ज्या शेतकऱ्याला ती मिळाली असेल त्याला फार तर एकादा पावसाळा जाईपर्यंत ती नांगरतां येणार नसेल; पण ती जमीन आपण वांटली तेव्हां कुओमिंटांगच्या लष्करी शक्तीचें नाक आपण खरवडतों आहों हा विचार समाधानाचा होता.

उत्तर कियांगसू प्रांतांतील एका खेड्यांतील किसान जमिनीच्या फेरवांटणीचा कार्यक्रम संपल्याचा उत्सव साजरा करीत होते, त्याच वेळीं चाहूल लागून जवळच्याच नदीपलीकडील नाक्यावरून चांगच्या सैनिकांनीं त्यांच्यावर गोळ्यांचा मारा सुरू केला. तो चुकविण्यासाठीं ते शेतकरी अर्थातच खालीं वांकले; पण "वा वा! आमच्या या उत्सवानिमित्त दारूकाम सुरू झालेलें दिसतें आहे बरं का!" हे उद्गार काढल्यावांचून ते राहिले नाहींत!

---








श्री. त्र्यं. सी. कारखानीस

# कवि खाडिलकर यांना एका कलोपासकाची श्रद्धांजलि

कै. काकासाहेब खाडिलकर हे लोकमान्य टिळकांचे पट्टशिष्य, त्यांचे अगदीं उजवे हात म्हणून मानले जात असत. त्यांनीं आपल्या गुरूंच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या झगड्यांत तळमळीनें व हिरीरीनें भाग घेतला. अर्थात् ते थोर राष्ट्रभक्त होते. कोणालाहि आपल्या देशकालाच्या परिस्थितीपासून अलिप्त राहतां येत नाहीं; तें माणुसकीला व पुरुषार्थाला शोभणारें नसतें; त्या परिस्थितींतील प्राप्त कर्तव्यें पार पाडण्याचा प्रयत्न प्रत्येकानें केलाच पाहिजे. कै. खाडिलकर यांनीं तो प्रयत्न आमरण केला. जनता त्यांना त्याबद्दल धन्यवाद देत आहे, त्यांत मीहि सहभागी आहें.

### कवित्वशक्तीनें राजकारण उज्ज्वल केलें

पण प्राप्त कर्तव्यें हीं अपरिहार्य म्हणून केवळ कर्तव्येंच होत. दैवी शक्तीनें संपन्न असलेल्या मानवी जीवनाची सार्थकता केवळ तीं कर्तव्यें पार पाडल्यानें पुरी होत नाहींत. कै. खाडिलकर हे जसे राष्ट्रभक्त म्हणून राजकारणी होते, तसेच ते कविहि होते. कवि म्हणून त्यांच्या ठायीं जी दैवी शक्ति होती तिचा, राजकारणाच्या धकाधकीच्या मामल्यांत ते पडले असतांहि, त्यांनीं आपल्याला विसर पडूं दिला नाहीं किंवा तिला कधीं कमीहि लेखलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर राजकारणाच्या कार्यांतहि त्यांनीं तिचा सरीस उपयोग केला. पण कितीहि केलें तरी राजकारण हें तात्कालिकच असतें. आणि स्वयंप्रज्ञ व द्रष्ट्या अशा कवीचें काव्य–कारण चिरंतन असतें. प्लेटोसारख्या महान् व्यक्तीनें राजकारणासाठीं जन्मभर आपल्या जीवाची आटापीट केली; पण वस्तुतः तो जात्या स्वयंप्रज्ञ असा द्रष्टा कवि होता. आपल्या अंगच्या या दैवी शक्तीची त्याला जाणिवहि होती; पण तिला त्यानें भुरळ पाडणारी उप–स्त्री ( tempting mistress ) म्हणून हीन लेखलें व तिला झिडकारून प्रथम तो आपली आदर्श शासन–संस्था ( Republic ) प्रत्यक्षांत आणण्याचें राज–कारणच खेळूं लागला. त्यानें त्या राजकारणाचे एकामागून एक अनेक प्रयोग करून पाहिले; पण ते सर्व विफल झाले. तें राजकारण करीत असतां जगाची जी वास्तवता त्याच्या निदर्शनास आली ती पाहून तो अगदीं विटून गेला ! " छे छे ! असल्या या जगांत राहणें म्हणजे एकमेकांना फाडून खाणाऱ्या रानटी पशूंच्या सहवासांत राहण्यासारखें आहे; न जाणो, संसर्गानें आपणहि त्यांच्यासारखेच होऊं; येथून दूर, दूर, कुठें तरी दूर जावें, म्हणजे आपला असा अधःपात तरी होणार नाहीं, " असें त्याच्या मनानें घेतलें. त्रस्त झालेलें मानवी मन कसली ना कसली तरी पळवाट ( escape ) शोधीत असतें. बजबजपुरीनें भरलेलें तें राजकारण सोडून प्लेटोनें दूर दूर प्रवास करीत भटकत राहण्याची पळवाट पतकरली आणि या परिभ्रमणांतच मग त्यानें आपले सुप्रसिद्ध संवाद (Dialogues) लिहावयास सुरुवात केली. त्याच्या दृष्टीनें भुरळ पाडणारी म्हणून झिडकारलेली जी उप–स्त्री होती तिच्याच म्हणजे नाट्य व काव्य ( Drama and Poetry ) यांच्याच सहवासांत तो अखेरीस रंगून गेला ! 'काव्य म्हणजे अंतर्यामीं वसत असलेल्या दैवी शक्तीचा उमाळा' ( impulse of the divinity within ) ही जी त्याची मूळची भूमिका, तीच त्यानें अखेरीस स्वीकारिली व आपले सर्व संवाद त्याच उप–स्त्रीच्या सहवासांत रंगून जाऊन पुरे केले. नाट्यरूपानें हृदयांत स्फुरत असलेलें काव्य व तर्कानें मनांत उभार-

लेलें आपल्या आदर्शाविषयींचें तत्त्वज्ञान या दोहोंचा हृदयंगम मिलाफ त्याला या संवादांत साधतां आला व त्यामुळें त्याला समाधान प्राप्त झालें. आज जवळजवळ अडीच हजार वर्षे प्लेटो जो जगाला परिचित आहे तो हे संवाद लिहिणारा कवि म्हणूनच होय, आदर्श शासनसंस्था निर्माण करण्यासाठीं धडपड करणारा राजकारणी म्हणून नव्हे. कै. खाडिलकरांचें वैशिष्ट्य हेंच कीं, आपल्या ठायीं असलेल्या दैवी शक्तीला प्लेटोप्रमाणें भुरळ पाडणारी उप–स्त्री म्हणून न मानतां, आपली धर्मपत्नी मानून व राजकारणांतहि आपल्याबरोबरच तिला सेवेला लावून तिच्या प्रभावानें तें राजकारणहि त्यांनीं उज्ज्वलित केलें आणि म्हणूनच त्यांचें राजकारण प्लेटोच्याप्रमाणें विफल झालें नाहीं.

प्लेटोला कमीपणा देणारी ही खाडिलकरांशीं केलेली त्याची तुलना साहजिकच कोणांकोणांस विक्षिप्तपणाचीहि वाटेल. 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' असें ज्याप्रमाणें व्यासांबद्दल म्हटलें जातें, त्याप्रमाणेंच ज्या प्लेटोबद्दल "Out of Plato came all things that are still written & debated among men of thought." असें म्हटलें जातें, त्या प्लेटोची मी खाडिलकरांशीं तुलना करीत आहें! प्लेटो हा विश्वकीर्तीचा आहे, खाडिलकर तसे नाहींत, हें मी जाणून आहें; पण येथें मीं फक्त प्लेटो हा जन्मतः कवि असूनहि त्यानें आपल्या अंगीं असलेल्या या दैवी शक्तीची केवळ राजकारणासाठीं प्रथम उपेक्षा केली, तशी खाडिलकरांनीं केली नाहीं, येवढें दाखविण्यासाठींच, जगाला परिचित असलेलें एक ठळक उदाहरण म्हणून हें प्लेटोचें उदाहरण तुलनेसाठीं घेतलें आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली तर ही तुलना विक्षिप्त न वाटतां उलट समर्पकच वाटेल अशी मला आशा आहे.

## 'काव्य म्हणजे विचार–परिप्लुत चैतन्य'

खाडिलकरांचा 'ते कविहि होते' असा उल्लेख मीं वर केला आहे; ते 'नाट्याचार्य' म्हणून सर्वमान्य झाले असल्याचें दिसून येतें, पण 'ते कवि होते' ही गोष्ट मात्र सर्वांसच रुचलेली किंवा पटलेली दिसत नाहीं. वस्तुतः नाटककार हा जर ज़ातिवंत कवि नसेल तर तो नाट्याचार्य या पदवीला पात्रच होणार नाहीं. पण एक तर, खाडिलकरांनीं ज्याला सामान्यतः काव्य म्हटलें जातें अशा प्रकारची स्वतंत्र काव्यरचना मुळींच केलेली नाहीं. ते प्रथम गद्य नाटककार व वृत्तपत्रकार म्हणजे गद्यलेखक म्हणूनच प्रसिद्धीस आले व पुढें मग सन १९१० सालीं प्रेस–ॲक्ट होऊन त्यांचें 'कीचकवध' हें नाटक बेकायदा ठरविण्यांत आलें तेव्हांपासून त्यांनीं संगीत नाटकें लिहावयास सुरुवात केली. संगीताचें (musicचें) अंग त्यांना मुळींच नव्हतें; पण प्राप्त परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठीं त्यांनीं हा संगीताचा आश्रय घेतला व जात्या सुरेल आवाज नसतांहि चिकाटीनें गाणें शिकण्याचा महाप्रयत्न करून त्यांनीं आपलीं संगीत नाटकें लिहिलीं. त्या नाटकांतील पदांवर, वृत्तपत्रांतून व संभाषणांतून जी टीकेची झोड त्या वेळीं उठली तिचा रोख असा होताः—"खाडिलकरांनीं वर्तमानपत्री जोरदार भाषेचीं गद्य नाटकेंच तेवढीं लिहावीं, उगाच संगीताची उठाठेव करूं नये. कारण, त्यांच्यांत शब्दलालित्य मुळींच नाहीं; त्यांचीं पदें ओढूनताणून केलेलीं, दूरान्वयी व म्हणून क्लिष्ट असतात; म्हणजे काव्याचा मुख्य गुण जो प्रसाद त्याचा त्यांच्यांत अभाव आहे; अर्थात् ते कवि नाहींतच." आतां, शब्दलालित्य व प्रसाद हे काव्याचे गुण आहेत याविषयीं कोणाचाच वाद नाहीं; पण ते काव्याचा आत्मा आहेत असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. अशा प्रकारच्या या (esteemed umpires of taste) माननीय समजल्या गेलेल्या टीकाकारांविषयीं इमर्सननें म्हटलें आहे कीं, 'त्यांच्या डोक्यांत परंपरेनें आलेले सौंदर्यशास्त्राचे कांहीं नियम तेवढे असतात, पण हृदयांत सौंदर्यकल्पनेचा गंधहि नसतो!' व त्यांना प्रत्युत्तर म्हणून त्यानें काव्याचें लक्षण पुढलिप्रमाणें केलें आहे : "It is not metres, but a metre-making argument that makes a peom,--a thought so passionate and alive, that, like the spirit of a plant or an animal, it has an architecture of its own and adorns nature with a new thing." (Metre-म्हणजे वृत्त–शब्दलालित्यादि गुणांनीं संपन्न असा

बाह्य आकार, हें कांहीं काव्य नव्हे, तर तळमळीच्या अंतःस्फूर्त उमाळ्यानें बाहेर येऊन जें विचारपरिप्लुत चैतन्य तो आकार आपोआप धारण करतें तें चैतन्य म्हणजे काव्य होय.) दैवी शक्तीनें संपन्न असे ईश्वरी प्रेरणेचें जे कांहीं थोडे लोक असतात त्यांच्या हृदयाच्या मुशींत बाह्यसृष्टि व अंतःसृष्टि यांचें एक नवें रसायन बनतें व तें शब्द, चित्र, गान, शिल्प, मूर्ति इत्यादि रूपांनीं उचंबळून बाहेर येतें. त्याच्या सेवनानें सामान्य जनांच्या वृत्ती उल्हसित होतात, त्यांच्या दृष्टीला व्यापकता येते व जड बनलेल्या त्यांच्या विचारांना चैतन्य प्राप्त होतें. असें जें निरनिराळ्या आकारांनीं बाहेर आलेलें रसायन, तें काव्य होय. अशा प्रकारचें काव्य ज्यांच्या ठायीं असतें ते विश्वकीर्तीचे कवी होतात; पण यावरून मी कै. खाडिलकरांना तशा प्रकारचे विश्वकीर्तीचे कवि ठरविण्याचा अट्टाहास करीत आहें, असें मात्र कोणीं समजूं नये. माझ्या या प्रतिपादनाचा अर्थ इतकाच कीं खाडिलकर हे शब्दलालित्यादि बाह्य गुणांनीं संपन्न असे गोंडस कविता रचणाऱ्या जातीचे कवि नसून, ज्यांचें हृदयच चैतन्यमय आहे व आपल्या ठायीं असलेल्या या चैतन्याच्या स्फुलिंगानें जे इतरांचीं हृदयें प्रदीप्त करतात, अश्या वर वर्णन केलेल्या जातीचे कवि आहेत. त्या जातींत त्यांचें स्थान कोणतें हें त्यांच्या जगाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाच्या कमी–अधिक व्यापकतेवरून ठरणारें असून तें ठरविण्याचें काम काळाचें आहे.

कै. खाडिलकरांचें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेलें लिखाण म्हणजे त्यांचीं नाटकें होत आणि त्या नाटकांवरूनच ते कवि आहेत ही गोष्ट सिद्ध होणारी आहे. नाटकाला दृश्य काव्य असेंच म्हटलें जातें, आतां त्यांच्या नाटकांतील हें काव्य कोणत्या योग्यतेचें आहे तें आपण पाहूं. कै. खाडिलकर हे कोणत्या जातीचे कवि आहेत हें ठरवितांना 'कवी'चें जें लक्षण वर सांगितलें त्या लक्षणाला जुळतें असें जर त्यांचें हें दृश्य काव्य असेल तर ते 'कवि' या संज्ञेला पात्र आहेत असेंच म्हणावें लागेल.

"ज्यांचें हृदय चैतन्यमय असून, आपल्या ठायीं असलेल्या या चैतन्याच्या स्फुलिंगांनीं इतरांचीं हृदयें जे प्रदीप्त करतात" हें तें लक्षण होय. कै. खाडिलकर हे या लक्षणानें युक्त अशा जातीचे कवि आहेत.

## हृदयें थरारून सोडणारें 'कीचकवध'

त्यांच्या नाटकांपैकीं 'कीचकवध' हें एकच नाटक ते अश्या जातीचे कवि आहेत हें सिद्ध करून दाखविण्याला पुरेसें आहे. दृश्य काव्याचें यथार्थ स्वरूप रंगभूमीवरील प्रयोगानेंच दिसत असतें. सन १९०७ सालीं महाराष्ट्र–नाटक–मंडळी या नाटकाचे प्रयोग मुंबई मुक्कामीं 'बॉम्बे–थिएटर'मध्यें करीत असतां प्रयोगाला प्रारंभ नऊ वाजतां व्हावयाचा असूनहि संध्याकाळीं सहा वाजल्यापासूनच थिएटरसमोर प्रेक्षकांचा इतका तोबा उडत असे कीं रहदारीला अडथळा होई. एकदां तर कीचकाची भूमिका वठविणारे कै. गणपतराव भागवत यांना रंगण्यासाठीं आंत जावयास प्रवेशच मिळणें मुष्किलीचें झालें ! खाडिलकरांनीं आपल्या हृदयांतील चैतन्य या नाटकांत प्रवेशांप्रवेशांतून इतकें ओतप्रोत भरून ठेवलें आहे कीं प्रेक्षकांचीं हृदयें वाढत्या प्रमाणांत थरारून जातात ! अखेरीस, शेवटच्या प्रवेशांत भीम कीचकाला कुस्तीच्या पेंचांत पकडून, त्याला चारी मुंड्या चीत करून, त्याच्या छातीवर बसून त्याच्या नरडीचा घोट घ्यावयास उद्युक्त होतो त्या वेळीं तर सबंध प्रेक्षागृहच एकदम उभें राहत असे ! 'The Theatre rose at him' असा जो इंग्लिश रंगभूमीवरील एका प्रसंगाचा अनुभव रंगभूमीच्या इतिहासांत नमूद केलेला आहे त्याचा साक्षात् प्रत्यय त्या वेळीं येत असे. अर्थात असा प्रत्यय यावयास भूमिका वठविणारे नटहि तसेच असावे लागतात. त्या वेळीं महाराष्ट्र–नाटक–मंडळींत तश्या योग्यतेचे नट होते. त्यानंतरच्या काळांत मात्र भीमाची भूमिका वठविणारे श्री. केशवराव दाते यांच्याखेरीज इतर कोणीहि तश्या योग्यतेचे नट न लाभल्यानें 'कीचकवध' नाटकाचें यथार्थ स्वरूप आतांपर्यंत तरी पुनः कोणालाहि पाहावयास मिळालें नाहीं. नाटकाचें जीवित नटांचे हातीं ! नाटककार कवि केवढाहि मोठा असला तरी, किंबहुना तो जितका जितका मोठा तितका तितका अधिकाधिकच, तो या बाबतींत परावलंबी होतो ! आज








# कवि खाडिलकर यांना एका कलोपासकाची श्रद्धांजलि

मला 'कीचकवध' नाटकाचें यथार्थ स्वरूप केवळ शब्दांनीं वर्णन करून सांगावें लागत आहे; पण माझें हें वर्णन सांगोवांगीचें नव्हे. तें यथार्थ स्वरूप मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलेलें आहे–अनुभविलेलें आहे. खाडिलकरांनीं या नाटकांत आपल्या ठायीं असलेलें चैतन्य ओतप्रोत भरून त्याच्या स्फुलिंगांनीं इतरांचीं हृदयें कशीं थरारून सोडलीं हें दृश्य अनेक वेळां प्रत्यक्ष पाहिलेला हा साक्षीदार आपला स्वतःचा अनुभव येथें नमूद करीत आहे आणि त्या अनुभवावरूनच म्हणत आहे कीं, खाडिलकर हे शब्दलालित्यादि बाह्य गुणांनीं युक्त असे सामान्य कवि नसून श्रेष्ठ प्रतीचीं दृश्य काव्यें निर्माण करणारे थोर कवि आहेत. आणि अशा या कवीला एक कलोपासक या नात्यानें अत्यंत आदरपूर्वक मीं ही श्रद्धांजलि अर्पण करीत आहें.

---

प्रो. आइन्स्टाइन एकदां एके ठिकाणीं जेवावयाला गेले होते. तेथील यजमानीणबाईंनीं त्यांना आपला सापेक्षतावाद थोड्या मोजक्या शब्दांत वर्णन करावयास सांगितला. शास्त्रज्ञांनीं उत्तर दिलें, "सापेक्षतावादाऐवजीं मी तुम्हांला एक गोष्ट सांगतों ती ऐका! मी एकदां एका अंधळ्या माणसाबरोबर जात असतांना सहज म्हणालों, 'मला दूध पिण्यास पाहिजे.'

माझ्या सोबत्यानें विचारलें, "दूध म्हणजे काय?"

मी उत्तर दिलें, "एक शुभ्र पातळ पदार्थ."

"पातळ पदार्थ मला ठाऊक आहे; पण शुभ्र म्हणजे काय?"

"शुभ्र म्हणजे हंसाच्या पिसासारखें."

"पिसें मला ठाऊक आहेत; पण हंस म्हणजे काय?"

"वांकड्या मानेचा पक्षी म्हणजे हंस."

"मान मला ठाऊक आहे; पण वांकडी म्हणजे काय?"

हें ऐकून मला रागच आला; मीं त्याचा हात धरला, तो सरळ ताणला आणि म्हटलें, "सरळ म्हणजे असं, बरं का? " नंतर तोच हात कोंपरापाशीं वांकवून मीं त्याला पुनः म्हटलें, "अन् आतां हें झालं वांकडं, समजलं?"

"असं होय?" अंधळ्यानें उत्तर दिलें, "आतां मला समजलं बरं का, तुमचं दूध म्हणजे काय तें!"

ही गोष्ट सांगून आइन्स्टाइनसाहेब यजमानीणबाईंना विचारतात, "मग, यापुढं सापेक्षतावाद समजावून घेण्याची आपली इच्छा आहे का?"

यजमानीणबाई मनांतल्या मनांत उमजल्या व त्यांनीं बोलण्याचा विषयच बदलला!



अनुक्रमणिका






श्री. गो. मा. कुलकर्णी

# आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेची भूमिका

रशिया आणि अमेरिका हीं दोनच राष्ट्रें आज आंतरराष्ट्रीय राजकारणांत प्रमुख आहेत. हीं दोन्हीं राष्ट्रें अगदीं परस्परविरोधी तत्त्वप्रणालींवर अधिष्ठित असल्यामुळें आज त्यांच्यांत संघर्ष निर्माण झाला आहे. समाजसत्तावाद आणि भांडवलशाही यांपैकीं जगाचें स्वामित्व कोणाला मिळणार, याविषयीं जग सांशक व सभय झालें आहे आणि तिसऱ्या जागतिक युद्धाच्या भीतीनें राष्ट्रांच्या जीवनांत अस्थिरता आणि उदासीनता उत्पन्न झाल्या आहेत. साहजिकच अमेरिका व रशिया यांची पुढचीं पावलें कशीं पडतात इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें आहे. अमेरिकेनें गेल्या दोन्ही महा—युद्धांत यशाचा मोठा वांटा उचलला असल्यामुळें, सध्यां अणुबॉंबसारखें भयंकर विध्वंसक अस्त्र तिच्याजवळ असल्यामुळें आणि रशियापेक्षां अमेरिकेचीच माहिती सामान्यांना व विद्वानांना सुद्धां अधिक असल्यामुळें, अमेरिकेच्या धोरणाबद्दल सभय कुतूहल निर्माण झालें आहे. हें धोरण समजण्यासाठीं अमेरिकेच्या एकंदर भूमिकेचा विचार करणें अत्यावश्यक आहे.

**'नवें जग'**:—इ. स. १४९२मध्यें कोलंबसानें अमेरिकेचा शोध लावला तेव्हांपासून ह्या खंडाला 'नवें जग' हें नांव देण्यांत आलें असलें तरी, अमेरिकेचें नवें राजकीय आयुष्य स्वातंत्र्य—संग्रामानंतर १७८९ सालीं त्या देशांत संघराज्याची स्थापना झाली तेव्हांच सुरू झालें. प्राचीन काळीं राज्यांचे संघ युरोप व हिंदुस्थान दोन्ही ठिकाणीं होते. ग्रीक बेटांत थेसाली, बोशिया, ॲक्टोलिया, एकियन लीग इत्यादि राज्यसंघ होते, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत 'वज्जि' नांवाचा राज्यसंघ फार प्रसिद्ध होता. त्या दृष्टीनें अमेरिकन राज्यसंघ ही कांहीं राज्यशास्त्रांत नवी भर नाहीं. परंतु आधुनिक जगांत हाच पहिला व प्राचीन राज्यसंघांपेक्षां अनेक दृष्टींनीं परिपूर्ण असा राज्यसंघ असल्यामुळें, एक नवी राज्यपद्धति अमेरिकेनें आधुनिक जगाला दिली व 'नवें जग' हें आपलें नांव याहि दृष्टीनें सार्थ केलें.

१७८९पासून अमेरिकेच्या एकंदर परिस्थितींत अत्यंत फरक पडला. सुरुवातीला तेरा वसाहतींच्या छोट्या संघटनेपासून तों अठ्ठेचाळीस संस्थानांच्या प्रचंड संघापर्यंत अमेरिकेनें मजल मारली! विस्ताराबरोबरच अपरिहार्यपणें तिच्या धोरणांतहि बदल होत गेला व तात्त्विक भूमिका ओढाताणीनें तीच ठेवण्यांत आली असली तरी व्यवहारांत मात्र महदंतर पडलें आहे.

**नवें धोरण**:—युरोपीयेतर राष्ट्रांत पाश्चात्य राज्यपरंपरा ( Western State-System ) अंगीकृत करणारें अमेरिका हेंच पहिलें राज्य आहे. स्वातंत्र्य—प्राप्तीनंतर अमेरिकेला असें दिसून आलें कीं, अटलांटिकच्या दुसऱ्या किनाऱ्यावर कांहीं आपणाला सत्ता गाजवितां येणार नाहीं, त्याचप्रमाणें युरोपीय राष्ट्रांनाहि अमेरिका खंडांत ढवळाढवळ करतां येणार नाहीं. १८१२मध्यें कॅनडावरील अमेरिकेची स्वारी अयशस्वी झाली. त्याचप्रमाणें इंग्लंडखेरीज इतर राष्ट्रांची सत्ता अमेरिकेंतून पन्नास वर्षांच्या काळांत हळूहळू नष्ट झाली. या दोन उदाहरणांवरून आणि इतर व्यावहारिक गोष्टींचा विचार करून अमेरिकन मुत्सद्यांनीं अमेरिकेच्या धोरणाचीं चार सूत्रें निश्चित केलीं. ( १ ) **अलगपणाचें तत्त्व**, ( २ ) **मन्रो—सिद्धांत**, ( ३ ) **मुक्तद्वार धोरण** व ( ४ ) **शेजारधर्म**. या चतुःसूत्रीवर अमेरिकेचें सर्व पर—राष्ट्रीय धोरण अवलंबून आहे.



अनुक्रमणिका








# आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेची भूमिका

या चारी सूत्रांचें थोडेंसें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे.

अलगपणाचें तत्त्व अर्थात् Isolationism :— युरोपचें राजकारण फार गुंतागुंतीचें व त्रासदायक असल्यामुळें अमेरिकेला युरोपांतील राज्यांशीं तह करून संबंध ठेवणें फार कठिण होई. १७७८मध्यें फ्रान्सशीं केलेली मैत्री अमेरिकेला फार जड झाली, त्यामुळें सन १७९८मध्यें परस्पर–संमतीनें मैत्रीचा करार रद्द करण्यांत आला. जॉर्ज वाशिंग्टननें आपल्या निवृत्तीच्या वक्तव्यांत, १७९६मध्यें, 'गुंतागुंत उत्पन्न करणारे कसलेहि मैत्रीचे करार युरोपीय राष्ट्रांशीं करूं नका,' असा इषारा दिला होता. त्याचप्रमाणें जेफरसननें आपल्या कारकीर्दीच्या उद्घाटनाच्या भाषणांत म्हटलें होतें कीं " Honest friendship with all nations, entangling alliances with none " हें धोरण अजून चालू आहे.

मन्रो–सिद्धान्त ऊर्फ Munroe-Doctrine:— अध्यक्ष मन्रो यानें १८२३मध्यें ह्या सिद्धान्ताची घोषणा केली. त्याचा मुख्य उद्देश युरोपीय राष्ट्रांना अमेरिका खंडांत ढवळाढवळ न करूं देण्याचा होता. त्याचे दोन भाग आहेत : इषारा आणि आश्वासन. अमेरिकेनें इतर राष्ट्रांना आपल्या दोन्ही खंडांत ढवळाढवळ न करण्याचा इषारा दिला व तसेंच आपणहि इतरांच्या बाबतींत ढवळाढवळ करणार नाहीं असें आश्वासन दिलें. सध्यां यांपैकीं पहिला भागच अस्तित्वांत असून दुसरा नाममात्र उरला आहे.

मुक्तद्वार धोरण ( Open Door Policy ):— सर्वांना व्यापारासाठीं खुलें तें मुक्तद्वार. पूर्व आशियामध्यें, विशेषतः चीन देशांत, आपल्यालाहि इतरांसारख्याच व्यापाराच्या सवलती व सोयी असाव्या, जपानला अधिक नसाव्या, या हेतूनें हें धोरण पूर्व आशियापुरतें जारी केलें आहे. अजून त्यांत तत्त्वतः तरी बदल झालेला नाहीं.

शेजार–धर्म (Good Neighbour Policy ):— दाक्षिण अमेरिकेंतील राज्यांशीं चांगला शेजारी जसें वागेल तसें आपण वागतों, साम्राज्याची लालसा आपल्यांत नाहीं व आपण शेजारधर्म पाळून त्या प्राजकांना ( Republicsना) संरक्षण देतों, हें दाखविण्यासाठीं शेजारधर्माचें धोरण ठरविण्यांत आलें आहे. मात्र तें नांवापुरतेंच असून दाक्षिण अमेरिकेंत संयुक्त–राज्यसंघाचें आर्थिक साम्राज्य स्थापन झालें आहे.

या चार तत्त्वांवर अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण आंखलेलें आहे; परंतु याचा अर्थ असा नव्हे, कीं त्यांत कधींच बदल होत नाहीं. अमेरिकेला जेथें व जशी सोय पडेल त्याप्रमाणें ह्या धोरणांत बदल होत असतो. त्यांतहि प्रत्येक खंडाशीं असलेलें धोरण निरनिराळ्या तत्त्वावर आधारलेलें आहे. अलगपणाचें तत्त्व व मन्रो–सिद्धांत हे फक्त युरोपसाठीं, मुक्तद्वार धोरण हें आशिया व इतर खंडांसाठीं आणि शेजार–धर्म पाळावयाचा तो फक्त दाक्षिण अमेरिकेच्या बाबतींतच. कालमानाप्रमाणें मूळ तत्त्वांना सोडून अमेरिकेनें आपल्या धोरणांत बदल केला तरी मधूनमधून पुनः अमेरिकन मुत्सद्दी आपल्या मूळ तत्त्वावर येतात, याचें अलीकडचें उदाहरण म्हणजे प्रे. विल्सननें केलेला व्हर्सायचा तह अमान्य करणें हें होय.

आतां निरनिराळ्या खंडांशीं संयुक्त–राज्यसंघाचें धोरण कसें होतें हें पाहूं.

**अमेरिका आणि युरोपः**— युरोपांतील बऱ्याच राष्ट्रांनीं आपल्या वसाहती अमेरिकेंत स्थापन केल्या होत्या. इंग्लंड, फ्रान्स, स्पेन आणि रशिया हीं प्रमुख राज्यें होत. ४ जुलै १७७६ रोजीं अमेरिकेनें स्वातंत्र्य जाहीर केलें तेव्हांपासून युरोपियन राष्ट्रांच्या अमेरिकेंतील सत्तेला ओहोटी लागली. अमेरिकेचें संयुक्त राज्य स्थापन झालें तेव्हांपासून तर संयुक्त राज्यानें युरोपीय राज्यांसंबंधीं निश्चित धोरण स्वीकारलें. हें धोरण दोन तत्त्वांमधून जाहीर झालें : एक अलगपणाचें तत्त्व व दुसरें मन्रो–सिद्धांत. युरोपीय राज्यें युध्यमान व नेहमीं स्पर्धेत गुंतलेलीं राहत असल्यामुळें अमेरिकेनें त्यांच्या कोणत्याहि भानगडींत पडायचें नाहीं असें ठरविलें व त्याप्रमाणें फ्रान्सशीं असलेला मैत्रीचा करार १७९८मध्यें रद्द करून टाकला व पुनः असा करार इतर कोणत्याहि राज्याशीं केला नाहीं.

युरोपीय राज्यांना अमेरिका खंडाच्या बाहेर ठेवण्यासाठीं प्रे. मन्रोनें सन १८२३ मध्यें एक जाहीर–नामा काढला, तो मन्रो–सिद्धांत म्हणून ओळखण्यांत

येतो. इतर युरोपीय राष्ट्रें दक्षिण अमेरिकेंतील स्पेनच्या वसाहती पुनः मिळविण्यासाठीं स्पेनला मदत करणार आहेत, अशी बोलवा त्या वेळीं उठली होती आणि रशियानें अलास्काच्या दक्षिणेकडील वायव्य किनाऱ्यावर आक्रमण केलें होतें, म्हणून मन्रो–सिद्धांत घोषित करण्यांत आला. ह्या सिद्धांताअन्वयें सर्व युरोपीय राज्यांना अमेरिका खंडांत ढवळाढवळ न करण्याचा इषारा देण्यांत आला व अमेरिका त्यांच्या भानगडींत लक्ष घालणार नाहीं असें आश्वासनहि देण्यांत आलें. इंग्लंडनें व इतर राष्ट्रांनींहि हा सिद्धांत व्यवहारतः मान्य केला.

जोंपर्यंत सं.राज्यसंघ आपल्या अंतर्गत व्यवस्थेमध्यें गुंतला होता, तोंपर्यंत त्या सिद्धांताचा तो स्वतः अंमल करीत असे; परंतु प्रांतिक प्रश्नांतून सुटका होऊन जागतिक सत्ता ( World Power ) म्हणून अमेरिका जेव्हां पुढें आली, तेव्हां त्या तत्त्वाप्रमाणें वागणें तिला अशक्य झालें. याचें निदर्शक म्हणजे रशियापासून संयुक्त–राज्यसंघानें १८६७-मध्यें अलास्का प्रांत खरेदी केला. अगदीं पहिल्यांदांच सं.राज्यसंघानें हा विलग भू–प्रदेश आपल्या राज्याला जोडला. त्यामागोमाग लगेच पॅसिफिकमध्यें हवाई आणि सामोआ व कॅरेबियनमध्यें क्यूबा, सॅंटो डॉमिंगो, व्हर्जिन आयलंड्स् इत्यादि ठिकाणें मिळविण्याचा प्रयत्न अमेरिकेनें केला. याच सुमाराला अमेरिकेला साम्राज्याची तृष्णा उत्पन्न झाली. पोर्टो रिको, क्यूबा, फिलिपाइन बेटें, हवाई बेटें इत्यादींवर अमेरिकेनें स्वामित्व मिळविलें. अमेरिका ( Pacific Power ) प्रशांत महासागरांतील सत्ता बनली. पनामा वगैरे इतर प्रदेशांवर ताबा मिळविण्याची संधि अमेरिकेनें दवडली नाहीं.

ह्या परिस्थितींमध्यें मन्रो–सिद्धान्त आणि अलगपणाचें तत्त्व हीं अमेरिकेला उपयोगीं पडण्यासारखीं नव्हतीं. अमेरिकन व्यापारी जगभर व्यापार करण्यासाठीं पसरले होते व अमेरिकेचें भांडवल फार मोठ्या प्रमाणांत निरनिराळ्या देशांतून गुंतलें होतें; म्हणून अमेरिकेला आपल्या धोरणांत बदल करावा लागला. युरोपांतील आपल्या हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठीं पुढील धोरण स्वीकारणें अमेरिकेला भाग पडलें :—(१) सर्व देशांशीं व्यापार करण्याच्या समान संधीवर भर देणें, (२) अमेरिकेची सुरक्षितता धोक्यांत आणूं शकेल अशा प्रकारें कोणाहि एका राष्ट्राला बलवान् न होऊं देणें.

शांततेच्या काळांत वरील धोरणाच्या अंमलबजावणीची गरज भासली नाहीं तरी १९१४-मध्यें जेव्हां युरोपांत महायुद्ध सुरू झालें, तेव्हां मात्र अमेरिकेला ह्या तत्त्वांचा अंमल करावा लागला. अमेरिकेचा व्यापार धोक्यांत येऊं लागला व भांडवल बुडणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. आणि दोस्तराष्ट्रांचा पराजय झाल्यास अमेरिकेचें सर्व भांडवल बुडून दिवाळखोरीची पाळी आली असती. म्हणून अमेरिकेनें दोस्तांतर्फे युद्धांत प्रवेश केला. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळींहि याच कारणासाठीं अमेरिकेनें दोस्तांच्या बाजूनें युद्धांत भाग घेतला. केवळ आपल्या व्यापाराच्या आणि भांडवलाच्या रक्षणासाठींच अमेरिकेनें दोन्ही वेळीं दोस्तांतर्फे युद्धप्रवेश केला. कोणत्याहि उच्च तत्त्वप्रणालीसाठीं किंवा 'मानवता', 'लोकशाही', अशा कोणत्याहि भडक ध्येयासाठींहि अमेरिकेनें युद्ध केलें नाहीं.

पहिल्या महायुद्धानंतर पॅरिस–शांतता–परिषद् झाली. त्या परिषदेंत प्रे. विल्सनचा प्रमुख भाग होता. लीग ऑफ नेशन्स हें विल्सनचें मूल होतें. व्हर्सायच्या तहाचें पाहिलें कलम म्हणून लीग ऑफ नेशन्सची स्थापना विल्सननें केली होती. परंतु अमेरिकेचें अलगपणाचें तत्त्व या वेळेस अतिशय जोरानें उसळून आलें आणि विल्सनच्या सर्व प्रयत्नांवर व कृतीवर सीनेटनें बोळा फिरविला. अशा प्रकारें अमेरिका पुनः आपल्या अलगपणाच्या तत्त्वावर गेली. कारण अमेरिकेचें भांडवल एकदां वांचविल्यानंतर इतर भानगडींमध्यें काळ आणि वित्त खर्च करण्यास व्यापारी अमेरिका तयार नव्हती.

लीग ऑफ नेशन्सवर व त्या वेळच्या इतर योजनांवर अमेरिकेनें बहिष्कार घातला तरी शांतता तिला हवी होती. कारण शांततेशिवाय व्यापार व उद्योगधंदे यांची वृद्धि आणि यांचा फैलाव होणें अशक्य असतें. ह्यासाठीं सं. राज्यसंघानें वॉशिंग्टन–कॉन्फरन्स (१९२१), Briand–Kellog–Pact (1928), सर्व निःशस्त्रीकरणपरिषदा आणि इतर शांतता–परिषदा यांमध्यें भाग घेतला. १९३१







मध्यें तर मांचूरियाच्या प्रश्नावर विचार करतांना अमेरिकेनें 'लीग ऑफ नेशन्स'शीं सहकार्य केलें.

१९३३च्या मार्चमध्यें फ्रँक्लिन रूझवेल्टची अध्यक्षपदावर निवड झाल्यापासून अमेरिकेच्या धोरणांत विचारार्ह बदल झाला. जागतिक मंदीच्या काळांत तो अध्यक्षपदावर आल्यामुळें पूर्वीचें अलगपणाचें धोरण पुढें चालू ठेवणें अमेरिकेला हितावह नव्हतें. सोव्हिएट रशियाला अमेरिकेनें सरकारी मान्यता दिली नव्हती, ती १६ नोव्हेंबर १९३३ रोजीं देण्यांत आली आणि सहकार्याच्या मार्गांतील एक अडथळा दूर झाला.

१९३९मध्यें दुसरें महायुद्ध सुरू झालें. अमेरिकेनें तटस्थ राहण्याचा शक्य तितका प्रयत्न केला; परंतु मागच्या युद्धांतली परिस्थिति पुनः उत्पन्न होऊं लागली. दोस्तांचा पराभव म्हणजे अमेरिकेच्या भांडवलाचा नाश, त्यांतूनच पॅसिफिक महासागरांत जपानचें प्राबल्य वाढत चाललें आणि शेवटीं तर जपाननें पर्ल हार्बरवर हल्लाच केला! तेव्हां मात्र अमेरिकेनें ८ डिसेंबर १९४१ रोजीं जपानविरुद्ध युद्ध जाहीर केलें. नंतर तीन दिवसांनीं म्हणजे ११ डिसेंबर १९४१ रोजीं जर्मनी व इटली यांविरुद्धहि अमेरिकेनें युद्धाची घोषणा केली. तेव्हांपासून ऑगस्ट १९४६मध्यें जपानचा पाडाव होईपर्यंत अमेरिकेनें शस्त्र हातीं धरलें होतें.

**अमेरिका आणि आशिया**—आशिया खंडांत अमेरिकेला व्यापार करण्यासाठीं फक्त चीनच काय तो उरला होता. इतर देश निरनिराळ्या युरोपीय राज्यांनीं आधींच व्यापले होते. चीनवर मात्र कोणाचाहि राजकीय ताबा नव्हता; म्हणून अमेरिकेला व्यापारासाठीं तोच एक खुला देश होता.

गेल्या शतकाच्या शेवटीं चीनची फाळणी होणार अशीं लक्षणें उत्पन्न झालीं, तेव्हां अमेरिकेचा व्यापार धोक्यांत आला. चीनवर ताबा असलेलीं साम्राज्यवादी राज्यें इतर राज्यांना चीनशीं व्यापार करूं देईनात. अमेरिका चीनपासून अतिशय दूर असल्यामुळें तिला चढाओढ करणें फायद्याचें नव्हतें व शक्यहि नव्हतें. १८९०नंतर इतर राष्ट्रांना चीनचे दरवाजे व्यापारासाठीं बंद करण्यांत आले. इतर गोष्टींचा उपयोग नाहीं असें पाहून १८९९मध्यें अमेरिकन स्टेट-सेक्रेटरी जॉन हे यानें चीनबाबत सर्व राष्ट्रांनीं मुक्तद्वार धोरण स्वीकारावें अशी गळ घातली. इतर राष्ट्रांनीं नाखुषीनें कां होईना, पण तें धोरण मान्य केलें. हेंच धोरण सन १९२२मध्यें नऊ राज्यांमधील तहांत (Nine-Power-Treatyमध्यें) ग्रथित करण्यांत आलें.

पहिल्या महायुद्धानंतर जपानला पॅसिफिकमध्यें जर्मनीचीं बेटें मिळालीं व इतर प्रदेशहि मिळाले. रशिया आणि जर्मनी यांचें आरमार नष्ट झाल्यामुळें जपानची आरमारी शक्ति अखिल जगांत तिसऱ्या दर्ज्याची झाली. मांचूरियावर जपानची वक्रदृष्टि होतीच. अशा परिस्थितींत अमेरिकेचे व्यापारी हितसंबंध धोक्यांत येणें अपरिहार्य होतें. व्हर्सायचा तह अमान्य करून अमेरिकेनें युरोपसंबंधीं अलगपणाचें तत्त्व अंमलांत आणलें तरी, चीनच्या बाबतींत तसें करणें शक्य नव्हतें. त्यांतून मार्ग काढण्यासाठीं जुनें मुक्तद्वार धोरण अंमलांत आणण्याकरितां ११ ऑगस्ट १९२१ रोजीं अमेरिकेनें वॉशिंग्टन येथें एक कॉन्फरन्स बोलावली. त्या कॉन्फरन्ससाठीं तिनें ब्रिटिश साम्राज्य, फ्रान्स, इटली, जपान, चीन, नेदरलँड्स्, पोर्तुगाल आणि बेल्जम या राज्यांना आमंत्रण दिलें. अमेरिकेसुद्धां या नऊ राज्यांमध्यें एक करार झाला. या कराराला 'नऊ राज्यांचा करार' (Nine-Power-Treaty) म्हणून ओळखण्यांत येतें. ह्या कराराअन्वयें चीनसंबंधीं 'मुक्तद्वारा'चें धोरण अंमलांत आणलें आणि चीनच्या प्रदेशाचा ताबा कोणींहि घेऊं नये, असें बंधन घालण्यांत आलें. याच वेळेस आणखी दोनतीन करार करण्यांत आले आणि जपानची सत्ता कमी करून अमेरिकेनें आपल्या हितसंबंधांचें रक्षण केलें.

अतिपूर्वेकडील भागांत अमेरिकेचे तीन प्रकारचे हितसंबंध होते:—

(१) अमेरिकेचा चीनमधील व्यापार आणि भांडवल : ४ कोटी गुंतविलेलें भांडवल, २ कोटी ७० लक्ष पौंडांचा वार्षिक व्यापार, चीनमधील ५०० फर्म्स आणि व्यापारांत गुंतलेलीं जहाजें.

(२) फिलिपाइन्सचें आणि चीन व अमेरिका यांमधील व्यापारी मार्गांचें संरक्षण.







( ३ ) जपानच्या चढाईपासून अमेरिका खंडाचें रक्षण.

हे हितसंबंध रक्षावयाचे असल्यामुळें जपानच्या वाढत्या बळाकडे अमेरिकेला दुर्लक्ष करणें शक्य नव्हतें. फ्रँक्लिन रुझवेल्ट अध्यक्षपदावर येतांच त्यानें जपानसंबंधीं नवें धोरण स्वीकारून विरोधी प्रचार बंद केला, फिलिपाइन बेटांना स्वायत्तता दिली (४ जुलै १९४६पासून हीं बेटें स्वतंत्र झालीं आहेत) आणि अतिपूर्वेकडील समुद्रांतून आपलें आरमार काढून घेतलें. अशा प्रकारें त्यानें अतिपूर्वेकडील जबाबदारी शक्य तों कमी करण्याचा प्रयत्न केला. परंतु जपानच्या पर्लहार्बरवरील आक्रमणामुळें अखेर अमेरिकेला ८ डिसेंबर १९४१ रोजीं जपानविरुद्ध युद्ध पुकारावें लागलें. १९४६च्या ऑगस्टमध्यें जपानचा पाडाव झाला आणि जपान अमेरिकन सैनिकसरकारच्या अंमलाखालीं गेलें तें अजून त्याच स्थितींत आहे.

**संयुक्त राज्यसंघ आणि दक्षिण अमेरिका**— मन्रोसिद्धान्तासंबंधीं शूमननें म्हटलें आहे:—"These negative injunctions addressed to Europe (non-colonisation, non-extension, non-interposition) implied American 'protection' over the Latin American Republics. Protection here, as always in international politics, implies in greater or less degree, influence, control, domination."

—'International Relations.'

दक्षिण अमेरिकेंतील कांहीं प्रदेश संयुक्त–राज्य–संघानें घेतलेच, पण मन्रो–सिद्धांताला अनुसरून इतर प्राजकांचें संरक्षण करण्याची जबाबदारीहि आपल्यावर घेतली. अमेरिकन भांडवलदारांनीं आपलें भांडवल प्रचंड प्रमाणांत या प्राजकांतून गुंतविलें. शेजारधर्माचें धोरण नांवापुरतेंच राहून आर्थिक साम्राज्य स्थापन करण्यांत आलें. राजकीय साम्राज्य मात्र सोडल्याचा बहाणा करण्यांत आला. आणि क्यूबा, हयाटी (Haiti) आणि इतर प्राजकांवरील राजकीय ताबा अमेरिकेनें सोडला. परंतु सबंध दक्षिण अमेरिका आज संयुक्त–राज्यसंघाच्या वर्चस्वाखालीं आहे आणि आंतरराष्ट्रीय संबंधांत दक्षिण अमेरिकेला कांहींहि महत्त्व नाहीं.

इंग्लंडच्या कॅनिंग–सिद्धांतामुळें आणि अमेरिकेच्या मन्रो–सिद्धांतामुळें इतर राष्ट्रांना दक्षिण-अमेरिकेंत शिरकाव करतां आला नाहीं, त्यामुळें संयुक्त–राज्यसंघाला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. संरक्षणाच्या नांवाखालीं सं.–राज्यसंघानें द. अमेरिकेंत आपलें पूर्ण वर्चस्व स्थापन केलें. आपला आर्थिक शिरकाव करून घेऊन ४० कोटींच्या वर भांडवल तेथें सं.–राज्यसंघानें गुंतविलें आहे. अमेरिकेच्या एकूण गुंतविलेल्या भांडवलाच्या शेंकडा ४३ टक्के हेंच भांडवल भरतें. ह्या 'डॉलर–डिप्लोमसी'मुळें दक्षिण अमेरिकेंतील प्रदेश प्रत्यक्ष आपल्या राज्याला न जोडतां सं.–राज्यसंघानें तेथें आपलें साम्राज्य स्थापन केलें आहे. एका अमेरिकन लेखकानें म्हटलें आहे, "In smaller countries of Latin America, through control by our soldiers, our bankers and our oil-kings, we are developing our Ireland, our Egypt and our India."

**अमेरिकेचें चालू धोरण**—वरील विवेचनावरून असें दिसतें, कीं सं.–राज्यसंघानें आपल्या जागतिक हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठीं मैत्रीचे करार केले, साम्राज्याचा त्याग केल्याचें भासविलें, निःशस्त्रीकरणाची आवश्यकता प्रतिपादिली आणि शेवटीं स्वतःचीं शस्त्रास्त्रें वाढविलीं; त्यानें आपल्या अलगपणाच्या तत्त्वाला धरून राहण्याचा प्रयत्न केला; पण मधूनमधून इतर राष्ट्रांशीं सहकार्य केलें, कांहीं प्रसंगीं तह केले आणि आशियांतील प्रश्नांवर युद्ध करण्याची सुद्धां तयारी दाखविली. अशा प्रकारें अमेरिकेच्या धोरणांत तात्त्विक सातत्याचा अभाव दिसून येतो.

सं.–संघराज्य हें व्यापारी राज्य आहे. जगांत सर्वत्र आपला व्यापार चालला पाहिजे, हें या राज्य–संघाचें मुख्य धोरण आहे. त्यासाठीं कोणत्याहि तत्त्वाचा अवलंब किंवा त्याग करायला तें कधीं कचरत नाहीं. त्यानें 'लीग ऑफ नेशन्स'वर बहिष्कार घातला, पण चीनमधील व्यापारी संबंध धोक्यांत येतांच कॉन्फरन्स बोलावून तह केले. जेथें जें आपल्या फायद्याचें होईल तें करावें हें अमेरिकेच्या धोरणाचें मुख्य सूत्र आहे. त्यासाठीं कोणत्याहि तत्त्वाचा बळी घ्यायला अमेरिका कचरणार नाहीं. दोन्ही महायुद्धांत अमेरिकेनें दोस्तांच्या बाजूनें भाग घेतला याचें मुख्य कारण दोस्त राष्ट्रें अमेरिकेचीं कर्ज-

दार होतीं व दोस्तांचा पराजय म्हणजे अमेरिकन भांडवलाचा व व्यापाराचा नाश अशी वस्तुस्थिति होती. लोकशाही, मानवता, स्वातंत्र्य इत्यादि उच्च तत्त्वांचा घोष हें केवळ स्वार्थावरचें पांघरूण होतें. अमेरिकन जनता धनोत्पादनाशिवाय दुसरें कांहींहि जाणत नाहीं. प्रे. विल्सननें निर्माण केलेली लीग ऑफ नेशन्स अमेरिकन जनतेला रुचली नाहीं. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यानंतर पुनः त्याच गोष्टींची पुनरावृत्ति झाली. मोठमोठ्या तत्त्वांच्या घोषणा झाल्या. ६ जानेवारी १९४१ रोजीं प्रे. रूझवेल्टनें आपल्या चार स्वातंत्र्यांची घोषणा केली, जगाला आशा उत्पन्न झाली, पण त्याच वर्षाच्या सप्टेंबरमध्यें ॲटलांटिक–सनद हिंदुस्थानला लागू नाहीं असें चर्चिलनें घोषित केलें तरी मानवी स्वातंत्र्याच्या या पुरस्कर्त्यानें त्या घोषणेला विरोध न करतां जगाला आश्चर्यांत टाकलें. सारांश, सं.–संघराज्याच्या जागतिक धोरणाच्या मुळाशीं कोणतेंहि उच्च तत्त्व नसून फक्त स्वार्थ आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

तोंडानें मानवतेचा जयघोष करीत असतांनाच अमेरिकन विमानांनीं १९४६ सालच्या ऑगस्ट महिन्यांत जपानच्या हिरोशिमा व नागासाकी या दोन शहरांवर अणुबॉंब टाकून त्यांना जगाच्या नकाशावरून उडवून दिलें आणि जपानला लोकशाही व मानवता शिकविण्यासाठीं ज. मॅकआर्थरचें लष्करी सरकार तेथें स्थापन करण्यांत आलें !

१९४६मध्यें यूनोची स्थापना झाली. अमेरिका सुरक्षासमितीची कायम सभासद बनली. नाझी जर्मनीचा अडथळा दूर होतांच सोव्हिएट रशिया व भांडवलशाही अमेरिका यांच्यांत स्वाभाविक मत–भेद उत्पन्न होऊन सुरक्षा–समितींत रशियानें आपला व्हीटोचा अधिकार बेसुमारपणें वापरायला सुरुवात केली. म्हणून पश्चिमी राष्ट्रांनीं अमेरिकेच्या मदतीनें ‘छोटी संघटना’ स्थापन केली. प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नावर अमेरिका व रशिया यांच्यांत मतभेद होत गेला. पॅलेस्टाइनच्या फाळणीच्या प्रश्नावर मात्र दोघांचें एकमत झालें होतें. पण अमेरिकेनें पुनः फाळणीला नकार दिला. मध्य–युरोपांत रशियाचें वर्चस्व स्थापन झालेलें पाहून पश्चिमी राष्ट्रें व मध्य–युरोपांतील इटली वगैरे राष्ट्रें रशियाच्या वर्चस्वाखालीं जाऊं नयेत म्हणून सं.–राज्यसंघानें एक कर्ज देण्याची योजना तयार केली. ही योजना ‘मार्शल–योजना’ म्हणून प्रसिद्ध झाली. ह्या योजनेनुसार एकूण सोळा राष्ट्रांना अमेरिका कर्ज देणार आहे. अशा प्रकारें आपलें आर्थिक वर्चस्व स्थापन करून अमेरिकेला आपली प्रभावळ निर्माण करावयाची आहे. रशिया आणि अमेरिका यांच्यांत आपापला गट निर्माण करण्याची स्पर्धा चालू आहे. हें केवळ Power–Politics आहे. ह्या दोन गटांमध्यें केव्हा युद्ध सुरू होईल हें सांगतां येत नाहीं. सध्यां बर्लिनच्या व डॅन्यूबच्या प्रश्नावर दोस्त राष्ट्रें व रशिया यांच्यांत तीव्र मतभेद उत्पन्न झाला आहे व त्याचा निकाल कोणत्या मार्गानें लागेल हें सांगतां येत नाहीं.

ज्या फॅसिझमचा नायनाट करण्यासाठीं म्हणून दोस्तांनीं येवढें युद्ध केलें, त्याच फॅसिझमच्या आड आज ते लपूं पाहत आहेत. सं.–राज्यसंघानें ज. फ्रँकोशीं संधान बांधून स्पेनमधील विमानतळ आपल्या काबूंत ठेवलेच आहेत, पण फॅसिस्ट स्पेनचा कम्युनिस्ट–रशियाविरुद्ध उपयोग करण्याचाहि डाव त्यांत आहे. ह्यांत अमेरिकेची तात्त्विक भूमिका नष्ट झाली आहे हें उघड आहे.

४ जुलै १९४६ रोजीं अमेरिकेनें फिलिपाइन बेटांचें स्वातंत्र्य जाहीर केलें; परंतु हें स्वातंत्र्य निर्भेळ नाहीं व जें स्वातंत्र्य जाहीर केलें आहे तें सुद्धां अमेरिकेला स्वातंत्र्याची चाड होती म्हणून नव्हे. फिलिपाइन बेटें अमेरिकेला भारभूत झालीं होतीं; त्या बेटांचें रक्षण करणें फार जिकिरीचें होतें. अमेरिका खंडापासून तीं बेटें इतक्या दूर अंतरावर होतीं कीं जपानच्या हल्ल्याचा प्रतिकार करणें फार कठिण झालें असतें. फिलिपाइन बेटांच्या संरक्षणासाठीं जें आरमार अमेरिकेनें ठेवलें होतें तें फार तोकडें होतें. हें आरमार अमेरिकेंत "Suicide–fleet" म्हणून संबोधिलें जात असे.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, सं.–राज्यसंघाच्या मूळ धोरणांत बदल झालेला नाहीं. आपले व्यापारी हितसंबंध अबाधित राहावे व जगांत आपलें आर्थिक वर्चस्व असावें हें अमेरिकेचें मुख्य ध्येय आहे व हें ध्येय साध्य करण्यासाठीं अमेरिका








वाटेल तें करील यांत शंकाच नाहीं. रशियाच्या सामर्थ्याची अमेरिकेला भीति वाटत असली तरी अणुबॉंबसारखें भयंकर अस्त्र जवळ असल्यामुळें अमेरिका घमेंडीत आहे. आणि इतर मार्ग बंद होऊन प्रसंग निर्माण झाल्यास युद्धाचा पहिला घाव अमेरिकाच घालील यांत शंका नाहीं.

**अमेरिकेचा साम्राज्यवाद**—अमेरिकन मुत्सद्यांनीं नाहीं म्हटलें तरी अमेरिका साम्राज्यवादी आहे, यांत शंका नाहीं. कॅनिंग–सिद्धान्तानें व मन्रो–सिद्धान्तानें सं.–राज्यसंघाला दक्षिण अमेरिकेंत हस्तक्षेप करावयाला भरपूर वाव दिला. संरक्षणाच्या नांवाखालीं तेथलीं प्राजकें (Republics) सं.–राज्यसंघानें आपल्या ताब्यांत घेतलीं व मेक्सिकोसारख्या कांहीं प्रदेशांवर तर प्रत्यक्ष ताबा मिळविला. आपण शेजार–धर्म पाळतों असें दाखविण्यासाठीं दक्षिण अमेरिकन प्रदेशावरचा राजकीय ताबा सं.–राज्यसंघानें काढून घेतला, पण तेथें आर्थिक वर्चस्व स्थापन केलें. युरोपीय राज्यांप्रमाणें सं.–राज्यसंघानेंहि आर्थिक वर्चस्वाचें धोरण अतिशय यशस्वीपणें अंमलांत आणलें. ४० कोटींच्यावर अमेरिकन भांडवल द. अमेरिकेंत गुंतवण्यांत आलें आहे. याशिवाय प्रादेशिक विस्ताराचा प्रयत्नहि करण्यांत आला आहेच; १८८९मध्यें पोर्टो रिको चढाई करून घेण्यांत आलें, १९१६मध्यें व्हर्जिन आयलंड्स् विकत घेण्यात आलीं आणि मध्य प्रदेश कायमच्या गहाणखतानें जोडून घेतला गेला. चीनमध्यें चार कोटींवर अमेरिकन भांडवल गुंतलेलें आहे. आतां मार्शल–योजनेमुळें तर इंग्लंडसुद्धां सोळा राष्ट्रें अमेरिकेचीं कर्जदार होणार आहेत आणि हें कर्ज फिटेपर्यंत त्या त्या राष्ट्रांत अमेरिकन मालाला भरपूर बाजारपेठ मिळणार आहे. अशा रीतीनें अमेरिकेचें वर्चस्व अर्ध्या जगावर स्थापन होणार आहे.

युरोपीय राज्यांनीं जिंकलेले प्रदेश आपापल्या राज्याला जोडले, म्हणून त्यांचीं साम्राज्यें जगाच्या नजरेंत भरलीं; पण अमेरिकेनें केवळ आर्थिक साम्राज्य स्थापन केलें म्हणून तें पडद्यामागें आहे. तथापि वास्तविक अमेरिकेचें आर्थिक साम्राज्यच युरोपीय राज्यांच्या राजकीय साम्राज्यांहून कितीतरी भीषण आहे!

३०–८–४८.

---

## बंदीवान

" बंदिवाना, तुला सांखळदंडानें कोणीं बांधून ठेवलें, सांग बरें ? "

" माझ्या धन्यानें मला बांधून ठेवलें आहे. " कैद्यानें उत्तर दिलें, " मला वाटलें, जगामध्यें मींच सर्वांत अधिक संपत्तिमान आणि ऐश्वर्यवान व्हावें आणि कोणालाहि, प्रत्यक्ष माझ्या राजालाहि, एक पैसासुद्धां न देतां मीं तो सर्व तळघरांत सांठवून ठेवला. एकदां मी झोंपेनें पेंगत असतां माझ्या धन्याच्याच बिछान्यावर झोंपीं गेलों व जागा होऊन पाहतों तों मी माझ्या संपत्तीच्या तळघरांतच कैदी झालों आहे असें मला दिसून आलें ! "

" बंदिवाना, हा इतका मजबूत सांखळदंड कोणीं रे बनविला ? "

" मींच बनविला. " कैद्यानें उत्तर दिलें, " तो सांखळदंड मींच अगदीं डोळ्यांत तेल घालून बनविला. मला वाटलें, ' मी अजिंक्य आहें, माझ्या सत्तेनें मी संबंध जग बंदिवान करून टाकीन आणि मी मात्र एकटा खुशाल स्वातंत्र्यांत लोळत राहीन ! अशा रीतीनें या तंद्रींत दिवस आणि रात्र भट्टीशीं बसून घणावर घण मारून मीं ही शृंखला तयार करीत होतों. शेवटीं हें माझें काम पुरें झालें. सांखळदंडाचा दुवा नि दुवा अगदीं मजबूत, अभेद्य झाला; पण शेवटीं आश्चर्य असें कीं त्या सांखळदंडांत मीच अडकलों आहे असें मला आढळून आलें ! "

—**रवीन्द्रनाथ ठाकूर**, गीतांजलि.








श्री. ना. ग. जोशी

# 'विश्वमानवा'चें चतुर्विध दर्शन*

(१)

## ल्यूसीचें प्रयाण

[ख्रिस्ती धर्मगुरु फ्रान्सिस हा नीग्रोकुमारी ल्यूसी हिचा तिला स्वतःपासून झालेल्या बालकासह नाइलमध्यें बुडून झालेला अंत पाहून स्तिमित होतो; वन्य नीग्रोंनीं त्या ख्रिस्ती पित्यापासून झालेल्या ल्यूसीच्या मुलाला बळी द्यावयाचें ठरविल्यामुळें हें घडलें. ]

झणिं काळें तोंड पडे गुरु फ्रान्सिसचें,
त्यास सहज सत्य कळे : परम कृपेनें
ल्युसिला दे ठाव हृदीं नाइलमैया!
अन् टेंकुन चरणांना तीरावर्ती
फ्रान्सिस हो निश्चल, करि ध्यान भक्तिनें
संत प्रिय ल्युसिचें; तैं ध्यानिं ये ल्युसी,
कवटाळित बाळ हृदीं घट्ट, करितसे
बाहूंची क्रूसाकृति बाळावरती!
आणि मिटी नयन, उदासीन पूर्ण कीं!
ल्युसि नाहीं वनबाला, नच अज्ञानी;
ल्युसि म्हणजे भक्ति; ल्युसी प्रेम, श्रद्धा;
ल्युसि म्हणजे मानवीय थोर मनाचा
थोरपणा मूर्तिमंत! शक्य हें कसें?

हें अतर्क्य! ल्युसि खरीच स्फिंक्स नृसिंही!
अति कठीण कूट पुढें ठेवुनि गेली.
कूटाच्या चिंतनांत फ्रान्सिस व्यग्र
तों विस्तृतशा अथांग नाइल-ओघीं
येत बुडबुडे क्षणभर, उठत वर्तुळें,
अन् होउन रुंद रुंद विरुन विरुन तीं
दूर दूर कोठें तरि होत अदृश्य!
वाहि पुन्हां शांत, धीर, निर्विकारसें
अति पवित्र, अति अलिप्त, अति संगूढ,
अति अगाध भगवतिचें जीवनतत्त्व
विस्मृतिच्या—''भूता''च्या—खोल दरिंतुनी
कालाच्या त्या अनंत अवसरामधें!

* लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या **'विश्वमानवां'**तून. जाति—वैनायक किंवा धवलचंद्रिका (निर्यमक).







( २ )

# क्वाई

[ जगण्याची दुर्दम्य ' एषणा ' असलेल्या एका चिनी वृद्धेवरील आपत्तींचा प्रसंग. चीनमधील ' कर्म 'वादी वेदान्ताला ' क्वाई ' हा शब्द कुन्फुत्से( कन्फ्यूशिअस )नें वापरला आहे. या म्हातारीच्या जीवनाला त्यामुळें सामर्थ्य प्राप्त झालें. ]

' जनन-मरण सृष्टींचे नियम ' जाणि ती,
' पंचमहाभूतांची बनली काया,
तत्त्वपंचकांत पुन्हां मिसळुनि जाणें!
—परि जगणें प्राप्त, जीवमान जोंवरी !
सृष्टि करी जीव सृष्ट, प्राण अर्पिते;
प्राणांचें स्वयंतेज जोंवरी स्फुरे
तोंवरि नच मरण शक्य, योग्य जगणें! ......
मग्न विचारीं असतां वृद्धा लेसी—
उठताती वाळूचे लोट प्रचंड,
येति जवळीजवळी; पातले पुन्हां
दैवाचे दूत तिला फिरुनि छळाया ......
आज विलक्षण भासे ती म्हातारी.
चोरहि तैं स्तब्ध बने त्या गांभीर्यें,
वाळूच्या दोन उंच ढुंगांमधल्या
त्या सपाट जागेवर येउनि पोंचे
अन् दावी कुदळीनें जेथ पहुडल्या
भूमाई-पोटीं त्या दोन बालिका !
" ने त्यांना जरि समर्थ तूं, बहाद्दरा !
" वसुधा दे ठाव तयां उदरामध्यें,
" त्यांस माय परतुनि ने स्वतांपाशीं;
" तूं पामर जरि सशक्त न्यावया तयां,
" तरि दाखविं सामर्थ्या आज त्या तुझ्या ! "
सहा वेळ आले ते, लूट लूटियली !
परि नव्हतें रूप असें पाहिलें कधीं.
परम धीर अन् गभीर! स्तंभित झाली
मति त्यांची; गुंगे क्षण पातकी मनीं !
अन् वळले-अक्षरही नच बोलुनियां
झाले झणिं स्वार उंटसांडणींवरी
आलेल्या मार्गानें परत निघाले:
जेंवि कुणी उसळोनी झंझावात
रेतीचे खांब उंच गिरगिरावतो,
परि गिरक्या खातखात सैरावैरा
मृतसमुद्रविस्तारीं होत विलीन,
तेंवी ते क्षितिजतलीं होति अदृश्य !
अन् बसली फिरुनी ती ढुंगावरती,
पाहि पश्चिमेस पुन्हां शून्य दृष्टिनें;
जात चोर दूरदूर, लोट वाळुचे
सानसान होत, तिथें मागमूसही
उरला नच त्यांच्या त्या आगमनाचा !
आले क्षणिं, गेले क्षणिं : घटना परि ती
हो प्रविष्ट 'भूत'-कालिं; परि तिच्या हृदीं
अजुनीही "वर्तमान"-काल वर्ततो;
अजुनीही दुर्दम्या ती जिजीविषा
अंतरिंची फुलवि पुन्हां जीवन-ज्योत
अन् पुनरपि सिद्ध करी जाण्यास तिला !



अनुक्रमणिका








# 'विश्वमानवा'चें चतुर्विध दर्शन

## अन्तार्क्तिक (३)

[ दक्षिण ध्रुवाचा शोध करावयास गेलेल्या कॅप्टन कुकच्या एका सहकाऱ्याच्या—कॅप्टन ओट्स्च्या—जीवनकथेंतील शेवटचा प्रसंग वाचून सुचलेले विचार, त्यांत कांहीं प्रासंगिक फेरफार करून मांडले आहेत. ]

दीर्घ रात्र सरली अंतार्क्तिकची,
धवल धुक्याच्या मागें उजळली दिशा—
रात्र संपली! आतां अंधार नुरे,
दिवस अतां तेजोमय विश्व दाखवी. ...
उठला तो स्थिरचित्तें—गांभीर्यानें,
पाहि दिशा—बर्फानें सुंद जाहली!
अन् बोले शांत मनें नावाड्यांसी,
" मी येतों परत, जरा सहल करोनी... "
आणि वळे दक्षिणेस जावयाप्रती!
सत्य तयां कळुन चुके त्या सहलीचें!
सर्व उभे राहियले नाळेवरती...
जीवनिंच्या निशेंतील स्वप्नच का हें?
लोभनीय, आकर्षक, चंचल, धीर,
सृष्टीच्या पलिकडील—अति विलक्षण—
भुवनांतरिं मंदमंद जाय विरोनी! ...
जात धुक्याच्या पटलाआड हळुहळू,
देह होतसे अदृश्य—मृण्मयी कुडी
बर्फांतहि कधिंकाळीं जाइल विरुनी;
परि त्यांतिल अंश तरी जाइल तेथें
संकेतस्थानीं—त्या दक्षिणध्रुवीं!
ह्या नाहीं त्या रूपीं चैतन्य तरी
गांठिल त्या आदर्शा निश्चित पुढतीं!
स्वप्नच हें घटिताहुनि अधिक सार्थ हो,
अधिक शूर, अधिक धीर, अधिक जिवंत.
अज्ञातांतील गूढ तत्त्व जाणण्या
तें जाइल आंतआंत, आंत अनंत
मायेच्या गाढ धुक्यांतून पलिकडे!!

## कत्तलची रात्र (४)

[ कोंकणांतील एका मुस्लिम स्त्रीच्या जीवनांतील करुण प्रसंग. कत्तलच्या रात्रींच तिचा उरलेला पुत्र मरतो. त्यामुळें आपत्तींनीं खंगलेली मलकाबिबी वेडीपिशी होते व बाणकोटच्या खाडीवर 'हसनहुसेन दोघे भाई' इत्यादि गीत गात भटकते. ]

ठेपे ती ' कत्तलची रात्र ' शेवटीं—
आजूबाजूस सर्व रमति मजेंत!
परि कळते खरि घटना कारुण्यमयी
मलकेच्या हृदयाला; पोर पोटचा
मृत्यूचे अंत्य क्षण मोजित पडला
मांडीवर प्रेत साच! तत्प्राणांची
कुतरओढ चालतसे आंतआंतुनी;......
तों उचकी थांबे अन थांबे सगळें!—
प्राणांचें नेत्रांतुनि हो उत्क्रमण—
अन् पाहुन ते भयाण नेत्र फिक्कट
शोकाच्या झटक्यानें मलका बनली
वेडिपिशी; कधिं येई शुद्धीवर ती,
परि देतां स्मृति तिजला काळरात्रिची
पुनरपि ये वेडाची लहर तिथेला!
मग भटके एकाकी खाडीवरती,
हसन—हुसेनांचें तें दुःखद गीत
गुणगुणुनी फिरत असे किनाऱ्यावरी;
कधिं पाही निश्चलशी काळखडक तो
( बापाचा सर्वनाश जाहला जिथें )
जणुं पाही उकलण्यास कोडें वेडी—
'कुणिकडुनी कोणिकडे?' थांग न लागे!
जगताच्या उत्पत्तीसंगें आला
संहारहि विश्वामधिं; परि न तयाचें
कोडें अतिगहन सुटे बुद्धिसी कधीं...
अज्ञातांतून पुन्हां अज्ञेयांत—
इतुकेंची जाणुं शके मानवी मती,
आणि कूट कूटच तें राहील सदा!
कुठुन कुठें? आणि कसें? आणिक कितिदां?
प्रश्नांचें उत्तर ना मिळणें शक्य
विश्वाच्या अंतापर्यंत मानवा!

———

प्रा. गं. बा. स र दा र

# वारकरी–पंथ आणि महानुभाव--पंथ ※

## शुद्ध ऐतिहासिक दृष्टि

हा विषय जुनाच पण वादग्रस्त आहे. आचार्य भागवत, प्रा. फाटक व डॉ. कोलते यांच्यासारख्या चिकित्सक पंडितांनीं त्याला अलीकडे पुनः चालना दिली आहे. त्यांच्या भाषणांतील व लेखांतलि सर्व मुद्द्यांचा मी सविस्तर परामर्श घेणार नाहीं; परंतु एकंदर चर्चेंतील आशय लक्षांत घेऊन मुख्य विवाद्य प्रश्नांच्या अनुरोधानें मी माझे विचार स्वतंत्रपणें पण सूत्ररूपानें मांडणार आहें. प्रत्येक पिढीची जुन्या काळाकडे पाहण्याची दृष्टि अनुभवानें व विचारानें बदलत जाते. त्यामुळें गतेतिहासाचें वारंवार पुनर्मूल्यमापन करणें अगत्याचें होऊन बसतें. मात्र हें काम सकृद्दर्शनीं वाटतें तेवढें सोपें नाहीं. नव्या कल्पना ग्रहण करतांना जसे जुने पूर्वग्रह आड येतात तसेंच जुन्या विषयांची चर्चा करतांना पुष्कळदां नवे आग्रह नडतात. ते प्रयत्नपूर्वक झुगारून दिल्याशिवाय ऐतिहासिक घडामोडींचें नीट परिशीलन करतां येत नाहीं. प्राचीन पंडितांत संकुचित सांप्रदायिकता असे, तर आधुनिक अभ्यासकांत तात्कालिक अभिनिवेश आढळतो. ज्ञानाच्या प्रांतांत सत्याचा आग्रह व विचारांचा ठामपणा तर हवाच; पण पक्षाभिमानामुळें कळत नकळत येणारी अंधता व एकांतिकता मात्र नकोत. अत्यंत निकडीचे पण तात्कालिक प्रश्न धसाला लावतांना समाजजीवनांत प्रत्यहीं जी शबलता निर्माण होते तिच्यापासून विचारवंतांनीं शक्य तों अलिप्त राहण्याची खबरदारी घेतली पाहिजे. सत्यान्वेषणासाठीं चिकित्सेचें शस्त्र अद्ययावत् हवें यांत शंकाच नाहीं; पण १९४८ सालचीं मूल्यें चक्रधरासारख्या ऐतिहासिक व्यक्तीवर लादल्यानें वस्तुस्थितीचा विपर्यास होण्याचा संभव आहे. तेव्हां चालू काळ अजीबात विसरून कल्पनेनें जुन्या काळांत गेल्याशिवाय, तत्कालीन परिस्थितीशीं पूर्णपणें समरस झाल्याशिवाय, या दोन्ही पंथांच्या कार्याचें आपणांस अचूक मूल्यमापन करतां येणार नाहीं.

## महानुभाव-पंथ वैदिक कीं अवैदिक?

वसंतव्याख्यानमालेंतील आपल्या भाषणांत आचार्य भागवतांनीं चक्रधराचा महानुभाव–पंथ अवैदिक आहे असें प्रतिपादन केलें. "वैदिक संस्कृतीचें समाजशास्त्र चातुर्वर्ण्यावर म्हणजेच विषमता व अहंकार यांवर आधारलेलें आहे. ही संस्कृति नेहमींच समतेशीं वैर करीत आलेली आहे. तिचीं मूल्येंच मुळीं विषमतेवर उभारलेलीं आहेत." असा त्यांच्या विवेचनाचा मथितार्थ आहे. विषमतेच्या या मूल्यांशीं सतत झगडत राहणारा एक प्रवाह भारतीय संस्कृतींत अगदीं आरंभापासून आढळतो हेंहि त्यांनीं मान्य केलें आहे. मात्र समतेचा निर्भयपणें पुरस्कार करणारा हा पुरोगामी प्रवाह प्रत्येक वेळीं निरपवादपणें अवैदिक स्वरूपांत प्रकट झाला आहे, हा त्यांचा समज खरा नाहीं. वैदिक परंपरेचा इतिहास पाहिला तर, ती प्रवाही, परिवर्तनशील व समावेशक आहे असें दिसतें. खुद्द तिच्या विकास–क्रमांतच विषमतेचा व समतेचा पाठपुरावा करणारे विरोधी प्रवाह आढळतात; ते कांहीं काळ समांतर वाहतात, मध्येंच एकमेकांत मिसळतात आणि पुनः नव्या विरोधी स्वरूपांत वेगवेगळे होतात. तेव्हां

※ हा लेख म.सा.परिषदेंत ता. २८-८-४८ व ४-९-४८ रोजीं दिलेल्या व्याख्यानांचा सारांश आहे.—लेखक.

महानुभाव–पंथ वैदिक आहे कीं अवैदिक आहे या प्रश्नाचें एकच एक ठोकळेबाज उत्तर देतां येणार नाहीं. त्यासाठीं आधीं आपणांस वैदिकतेच्या श्रेणी लावाव्या लागतील. तसें न करतां जुन्या परंपरेला विरोध करणाऱ्या प्रत्येक महापुरुषाला आपण अवैदिक लेखूं लागलों, तर बुद्धाबरोबर कृष्णालाहि अवैदिक म्हणण्याची आपत्ति ओढवेल. इतकेंच नव्हे तर मग "प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः[1]" असा कर्मकांडाविरुद्ध प्रथम आवाज उठविणाऱ्या सर्व उपनिषत्कालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींनाहि अवैदिकच म्हणावें लागेल. खिस्तपूर्व काळांत आर्यावर्तांत विचारस्वातंत्र्याची जी प्रचंड लाट उसळली, तिची पूर्वभागांत बौद्ध व जैन या तथाकथित अवैदिक पंथांत परिणति झाली; उलट विरोधी मतांचा सौम्य-पणें आविष्कार करणारे पश्चिमेकडील भागवत व नारायणीय संप्रदाय वैदिक परंपरेंत कालांतरानें सामावले गेले.[2]

युरोपमध्यें धर्मसुधारकांना जिवंत जाळण्यापर्यंत मजल गेली ! तसा प्रकार आपल्याकडे कधीं झाला नाहीं; तरी पण प्रत्येक नव्या विचार–प्रवर्तकाला प्रारंभींच नामोहरम करण्याचा सनातनी धर्मार्त-डांनीं कसून प्रयत्न केला. मात्र विरोधाला न जुमा-नतांहि नवी विचारप्रणालि फैलावत चाललेली दिस-तांच वेळोवेळीं तिच्यावर आपल्या मान्यतेचें शिक्का–मोर्तब करण्याची तत्परता त्यांनीं दाखविली. ज्ञानेश्वरादि संतांचीहि अगोदर पाखंड्यांतच गणना झाली; पण पुढें त्यांना वैदिक परंपरेंत मानाचें स्थान मिळालें. म्हणून कोणताहि विशिष्ट पंथ हा वैदिक कीं अवैदिक असा वाद म्हणजे केवळ शब्द–च्छल होय. शिवाय एकाद्या पंथप्रवर्तकाला फक्त त्याच्या स्वतःच्या वचनांवरून अवैदिक ठरविणें रास्त नाहीं. 'मी अमुक आहें' असें म्हटल्यानें कांहीं कोणी खरोखर तसा ठरत नाहीं. वास्तविक, 'मी कोण आहें' हें तिऱ्हाइतांनीं माझ्या आचारविचारांची पाहणी करूनच निश्चित केलें पाहिजे. कारण, मनुष्य पुष्कळदां आत्मवंचना करीत असतो. स्वतःला क्रांति-कारक समजणाऱ्या माणसांत किती तरी प्रतिगामी प्रवृत्ती रेंगाळत असलेल्या दृष्टीस पडतात. बौद्ध मताचें खंडन करणाऱ्या आद्यशंकराचार्यांवरहि प्रच्छन्न बौद्ध असल्याचा आक्षेप घेतला गेला होताच ना ? खुद्द चक्र-धरांनीं वेदांबद्दल कोठेंहि अनादर दाखविलेला नाहीं. तेव्हां त्यांच्या विचारसरणींत वैदिकतेची किती छाया आहे, त्यांचा पंथ किती अंशानें वैदिक परंपरेला धरून किंवा सोडून आहे हें बारकाईनें तपासल्याशिवाय या प्रश्नाचा निर्णय होणार नाहीं.

## चक्रधर व समाजक्रांति

महानुभाव–पंथावर अवैदिकतेचा छाप मारतांना आचार्य भागवतांची जशी घाई झाली, तशीच चक्रधरांना समाज–क्रांतिकारक ठरवितांनाहि त्यांची गफलत झाली आहे. गेल्या तीनचार शतकांत 'समाजक्रांति' या शब्दाला एक निश्चित अर्थ आला आहे. समाजरचनेला आधारभूत असलेल्या विचारसरणींत आमूलाग्र परिवर्तन घड-वून परिस्थितीच्या प्रवाहाला तसें प्रत्यक्ष वळण लावल्याखेरीज कधीं क्रांति घडत नाहीं. क्रांति म्हणजे केवळ दोन स्वैरविरोधी कल्पनांची झुंज नव्हे. एकाद्या विचारवंताच्या डोक्यांत जरी अत्यंत जहाल व लोकविलक्षण कल्पना उद्भवल्या, तरी तेवढ्यानें तो क्रांतिकारक ठरत नाहीं. पराभूत मनुष्य हा जसा हुतात्मा नव्हे, तसाच आततायी मनुष्य हाहि क्रांतिकारक नव्हे. हौतात्म्याला किंवा क्रांतिकारकतेला निश्चित अशा तत्त्वज्ञानाची बैठक लागते. जुन्या मूल्यांचा उच्छेद करतांना क्रांतिकारक नेहमीं नव्या मूल्यांची जोपासना करतो. प्रतिगामी प्रवृत्तींचा नाश करतांना तो पुरोगामी प्रवृत्तींचा पुरस्कार करतो. आपल्या विचारसरणीला समा-जाची साथ मिळवून तिच्या अनुरोधानें तो लोक–जीवनाचा प्रवाह अजीबात बदलून टाकतो. महानु-भाव–पंथानें महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत अशा तऱ्हेचें मूलग्राही स्थित्यंतर घडवून आणलें नाहीं. भारतीय समाजरचनेच्या मूलतत्त्वांना त्यांनीं वस्तुतः धक्का लावला नाहीं. जन्मसिद्ध जातिव्यवस्था, वर्णा-

१ मुण्डकोपनिषत् (१–२–७)

2 Vaisnavism, Saivism & Minor Religions Systems. P. 2-3.-R. G. Bhandarkar.








श्रमधर्म, कर्मसिद्धांत व पुनर्जन्म या कल्पना पूर्वीप्रमाणेंच नंतरहि अबाधितच राहिल्या. चक्रधरांची जीवितसाफल्याची कल्पना वैदिक तत्त्वज्ञानाशीं विसंगत नाहीं. महानुभाव–पंथाच्या संन्यासप्रवणतेंतहि कांहीं खास वेगळेपणा नाहीं. अध्यात्मवादाच्या जागीं भौतिकवाद आला असता, शब्दप्रामाण्याच्या ऐवजीं बुद्धिप्रामाण्याचा आग्रह दिसला असता, तर मग मात्र वैचारिक क्रांतीची मुहूर्तमेढ रोंवली गेली असें म्हणावयास हरकत नव्हती. परंतु श्रुतिवचनांची जागा चक्रधरसूत्रांनीं घेतली तरी शब्दप्रामाण्य कायमच राहिलें! वैदिक परंपरा बहुतांशीं विषमतेवर आधारलेली होती हें खरें आहे; परंतु या विषमतेचें निर्मूलन करण्यासाठीं तोंडानें समतेचा नुसता उद्घोष करून भागण्यासारखें नव्हतें. समतेच्या तत्त्वावर आधारलेल्या नव्या स्वयंपूर्ण समाजव्यवस्थेची रूपरेषा लोकांपुढें मांडून ती प्रत्यक्ष अंमलांत आणण्याच्या दिशेनें भगीरथ यत्न व्हावयास हवे होते. तत्कालीन कोणत्याहि धर्मपंथाला हें कार्य झेंपण्यासारखें नव्हतें. म्हणून पारलौकिक कल्याणासाठीं ज्यांनीं महानुभाव–पंथाची कांस धरली ते लोकहि सामाजिक व्यवहारांत प्रायः जुन्या परंपरेलाच चिकटून राहिले.

या दृष्टीनें पाहतां बसव, चक्रधर, ज्ञानेश्वर हे सर्वच धर्मसुधारक होते. त्यांची भूमिका ही समाज–क्रांतिकारकांची नव्हती. गेल्या हजार वर्षांत आपल्या जीवनाविषयक दृष्टिकोनांत मूलग्राही असा फरक झालाच नाहीं. पुनरुज्जीवन (revival), परिवर्तन (reform) आणि क्रांति (revolution) यांपैकीं फक्त पुनरुज्जीवनवादी व परिवर्तनवादी अशा दोनच प्रवृत्ती आपल्या आंग्लपूर्व इतिहासांत प्रामुख्यानें आढळतात. त्यामुळें ब्रिटिश राजवट येईपर्यंत आपल्या समाजव्यवस्थेला कधीं मूलगामी स्थित्यंतराचा धक्का बसलाच नाहीं. पारमार्थिक सत्तेच्या चिकित्सेस वैदिक परंपरेनें भरपूर विचार–स्वातंत्र्य दिलें होतें; समाजव्यवहार शाबूत राखून घटपटाची बौद्धिक कसरत कितीहि सूक्ष्मतेनें व कठोरपणानें करण्याला कसलाहि प्रतिबंध नव्हता. त्यामुळें द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, ईश्वरवाद, निरीश्वरवाद असे अनेक पक्षोपपक्ष एकाच परंपरेंत नांदूं शकले. समाजरचनेची पोलादी चौकट मात्र शतकानुशतकें अभंगच राहिली! केवढाहि मोठा युगप्रवर्तक पुरुष झाला, तरी त्याच्या कर्तृत्वाला परिस्थितीच्या मर्यादा पडल्याशिवाय राहत नाहींत. तेव्हां चक्रधर किंवा ज्ञानेश्वर धर्मसुधारकच राहिले यामुळें त्यांच्या व्यक्तित्वाला कांहीं उणेपणा येत नाहीं. लोकमान्य टिळकांनीं बहिष्काराचा मंत्र दिला, १९४२प्रमाणें एकदम 'चले जाव!'ची घोषणा केली नाहीं, याचें कारण ते स्वतः कमी जहाल होते असें नव्हे, तर त्या वेळची परिस्थिति अशा आंदोलनाला अनुकूल नव्हती. समाजाच्या प्रगमनशीलतेला नुसत्या व्यक्तिगत जहालपणाचा फारसा उपयोग होत नाहीं. कल्पनेला वस्तुस्थितीचा आधार मिळाला, तरच ती फलद्रूप होण्याचा संभव असतो. तेव्हां तत्कालीन परिस्थितीची पार्श्वभूमि लक्षांत घेऊनच या दोन्ही पंथांच्या धार्मिक व सामाजिक कार्याचें मूल्यमापन करावें लागेल.

### मूल्यमापनाची कसोटी.

कोणत्याहि कार्याचें मूल्यमापन करतांना कोणती कसोटी ठेवावयाची? 'कर्त्याच्या हेतूकडे लक्ष द्यावयाचें, कीं कार्याचा परिणाम ध्यानांत घ्यावयाचा?' असा प्रश्न पुष्कळदां उपस्थित होतो. वास्तविक पाहतां दोहोंचाहि विचार करणें जरूर आहे. हेतु आणि परिणाम, प्रयत्न आणि प्रभाव यांचा बरोबर मेळ घातला पाहिजे, तरच कोणत्याहि घटनेचा नीट उलगडा होईल. हेतु नुसता शुद्धच असून भागत नाहीं, तो व्यवहार्यहि असावा लागतो. तशीच त्याच्या मागची प्रेरणा बलवत्तर असली पाहिजे व पंथ–प्रवर्तकाचें व्यक्तित्व लोकोत्तर असावयास हवें. या सर्व गोष्टी तितक्याच महत्त्वाच्या आहेत. अहेतुकपणें घडलेल्या कार्याची कसोटी परिणाम हीच होय; पण सहेतुक व संयोजनपूर्वक घडलेल्या कर्तृत्वाचें परिशीलन करतांना संकल्प, साधना व सिद्धि यांचा अन्योन्य–संबंध बारकाईनें तपासला पाहिजे. शिवाय परिस्थितीशीं सुसंगत नसलेल्या स्वैर प्रेरणा किंवा अवास्तव योजना कधींच सफळ होत नाहींत; त्यांचा जनमनावर चिरंतन प्रभाव पडत नाहीं. भविष्य कालाला जन्म देणाऱ्या प्रवृत्ती कांहीं प्रतिभासंपन्न पुरुषांच्या कल्पनेंतून अचानक उगम पावत नाहींत;










सामाजिक परिस्थितीच्या प्रवाहांतच त्या निर्माण होतात. त्यांची चाहूल ज्याला प्रथम ऐकूं येते त्याला द्रष्टेपणाचा मान मिळतो. 'बोलीं अरूपाचें रूप दावीन'[३] या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें क्रांतिकारक तत्त्ववेत्ते या नव्या प्रवृत्तींना साकारता आणतात व आपल्या उज्ज्वल प्रतिभेनें त्यांच्यांतील सुप्त सामर्थ्याची लोकांना ओळख पटवितात. म्हणूनच ते आपआपल्या काळाचे प्रतिनिधी ठरतात. या दृष्टीनें चक्रधर व ज्ञानेश्वर यांच्या यशापयशाची कारणमीमांसा मी करणार आहें. हे दोघेहि महापुरुष खिस्तोत्तर तेराव्या शतकाच्या आसपास उदयाला आले. तेव्हां महाराष्ट्रांतील तत्कालीन परिस्थितीचा थोडा परामर्श आपण अगोदर घेऊं या

## ज्ञानेश्वरकालीन सामाजिक परिस्थिति.

हा काळ धर्मग्लानीचा होता. "क्षीणः कालवशात्पुनस्तरुणतां धर्मोऽपि सम्प्रापितः" असें त्या काळाचें वर्णन जरी हेमाद्रीच्या राजप्रशस्तींत केलेलें असलें, तरी तें वस्तुस्थितीला धरून नाहीं. वैदिक परंपरा निष्प्रभ झाली होती, बदलत्या परिस्थितीप्रमाणें समाजाला नवी प्रेरणा देण्याचें सामर्थ्य या धर्मसंस्थेंत उरलें नव्हतें; म्हणूनच अवघ्या पंचवीस वर्षांत दक्षिणेंतील बहुतेक हिंदु-राज्यें परधर्मीय आक्रमकांना खालसा करतां आलीं. यज्ञयाग, व्रतवैकल्यें, जपजाप्य येवढ्यांपुरतेंच धर्मभावनेचें क्षेत्र आकुंचित बनलें होतें. कर्मठपणाचें अवास्तव बंड माजल्यामुळें नैतिक मूल्यांची चाड राहिली नव्हती. उच्चवर्णीयांत सुखासीनतेची व भोगविलासाची प्रवृत्ति वाढली होती. ब्राह्मण व क्षत्रिय कर्तव्यपराङ्मुख झाले होते. यादवांच्या राजवटींत वैदिकविद्येला भरपूर आश्रय होता; परंतु ठराविक चाकोरींतून जुन्या ग्रंथांचें चर्वितचर्वण करण्यापलीकडे या पंडितांच्या हातून कांहीं विशेष कामगिरी झाली नाहीं. विज्ञानेश्वरापासून हेमाद्रीपर्यंतच्या काळांत वैदिक परंपरेंत धर्मसुधारणेच्या जिवंत प्रेरणेपेक्षां पुनरुज्जीवनाची निस्तेज प्रवृत्तीच दिसून येते. रामदेवरावासारख्या धार्मिकांनीं पंढरपुरच्या देवालयाचा जीर्णोद्धार करण्याचा उपक्रम केला आणि विज्ञानेश्वर व हेमाद्रि यांसारख्या पंडितांनीं स्मृतिग्रंथांवर टीका लिहून आचारधर्माची विस्कटत चाललेली घडी पुनः नीट बसविण्याची खटपट आरंभिली. तुकारामाच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "अर्थें लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें। विषयलोभीं मनें। साधनें बुडविलीं॥" अशा तऱ्हेची सनातन धर्माची अवस्था त्या काळीं झाली होती. त्यामुळें देशभाषांच्या आश्रयानें सर्वसामान्य लोकांत मिसळणाऱ्या जैन, लिंगायत, नाथ इत्यादि पंथांचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला होता. परंतु या पंथांतहि एकोपा असल्याचें दिसून येत नाहीं. जैन व लिंगायत यांच्यांत तर अव्याहत झगडा चालू होता. बिज्जल आणि बसव यांच्या अंतकालची हकीकत वाचली, म्हणजे या पंथांतील वैमनस्य किती विकोपाला जाई याची बरोबर कल्पना येते. इतर बहुसंख्य समाज हा तर बोलून चालून मूढ व अज्ञानी होता; पशुतुल्य जीवन कंठण्यापलीकडे त्याला दुसरी गति नव्हती. त्याच्या ठिकाणीं जी थोडीबहुत धर्मश्रद्धा होती तिला कधीं उच्च विचारांची बैठक लाभलीच नाहीं. म्हणून अज्ञानानें, भीतीनें किंवा स्वार्थबुद्धीनें मंगळाई, जाखाई, म्हसोबा, बहिरोबा इत्यादि देवतांची भक्ति करण्यापलीकडे तिची मजल गेली नाहीं.

## भक्तिपंथांची कामगिरी

जैन आणि लिंगायत या पंथांनीं शूद्रांना धर्म देण्याचा प्रयत्न केला; या प्रदेशांत निर्माण झालेलें त्यांचें बरेचसें वाङ्मय कानडी व संस्कृत या दोन भाषांतच होतें. महानुभव आणि वारकरी या पंथांनीं मात्र महाराष्ट्रांतील बहुजन-समाजासाठीं प्रथमच मराठींत ग्रंथलेखन केलें. स्त्रीशूद्रादिकांच्या धर्मभावनेला त्यांनीं अध्यात्मविचारांची जोड दिली. सर्वसामान्य लोकांत त्यांनीं उच्चतर जीवनाची आकांक्षा निर्माण केली. या दोन्ही पंथांचें ध्येय एकच होतें. त्यांनीं जड जीवांचा उद्धार करण्याचें कंकण हातीं बांधलें होतें. म्हणून संस्कृतांत न लिहितां मराठींत लिहिण्याचा आग्रह महानुभाव-आचार्यांनीं धरला.

---

३ ज्ञानेश्वरी, ६, ३६.










"नको गा केशवदेया! येणें माझांथे स्वामीचा सामान्य परिवारु नागवैल कीं" अशा तऱ्हेनें नागदेवाचार्यांनीं केसोबासांना संस्कृतमध्यें न लिहिण्याचा स्पष्ट आदेश दिला होता. ज्ञानेश्वरादिकांचीहि दृष्टि हीच होती.'मराठीचिये नगरीं' त्यांना 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' करावयाचा होता. शूद्रातिशूद्रांच्या मृतकल्प जीवनांत त्यांनीं नवचैतन्य ओतलें, त्यांच्या मूक भावनांना वाचा फोडली. तेव्हां मराठी-भाषिकांच्या महाराष्ट्र-संस्कृतीचा चक्रधर-ज्ञानेश्वरांनींच पाया घातला हें उघड आहे. आपण लोकांना नवा अनुभव, नव्या भावना, नवें जीवन देत आहों, त्यांच्यासाठीं नवसंस्कृति निर्माण करीत आहों, असा अहंकार, अभिनिवेश, आत्मविश्वास त्यांच्या वाङ्मयांत जागोजाग आढळतो. चक्रधर व ज्ञानेश्वर यांची भूमिका जरी एक असली, तरी त्यांच्या व्यक्तित्वांत व कर्तृत्वांत पुष्कळच तफावत आहे. ज्ञानेश्वरांनीं मराठी साहित्याची अविच्छिन्न परंपरा निर्माण केली व महाराष्ट्रांतील लोकजीवनाला सांस्कृतिक अधिष्ठान मिळवून दिलें. महानुभाव पंथ मात्र या कार्यांत अखेर अयशस्वीच झाला! वारकरी-पंथाप्रमाणें त्याला लोकप्रियता लाभली नाहीं. लोकक्षोभाच्या भीतीनें त्याला आपले ग्रंथ सांकेतिक लिप्यांत गुप्त ठेवावे लागले. एकाच ध्येयानें प्रेरित झालेल्या या दोन पंथांच्या फलश्रुतींत असा फरक कां पडावा? महानुभाव-पंथाची अशी दुर्दशा कां झाली? हा केवळ दैवदुर्विलास म्हणावयाचा का त्याच्या मागें कांहीं कार्यकारणभाव आहे? माझ्या समजुतीप्रमाणें या यशापयशाला कांहीं निश्चित कारणें आहेत; म्हणून त्या दृष्टीनें मी चारदोन मुद्दे विचारासाठीं पुढें मांडीत आहें.

## प्रवृत्ति व निवृत्ति

हे दोन्ही भक्तिपंथ सामान्यजनांसाठीं निघाले. दोन्ही पंथांनीं मोक्षमार्गाचाच प्रचार केला. मात्र वारकऱ्यांची भक्ति प्रवृत्तिपर आहे, तर उलट महानुभावांची भक्ति निवृत्तिप्रधान, संन्यासप्रधान आहे. महानुभावांच्या तुलनेनें वारकरी-पंथ हा प्रवृत्तिपर आहे हें विधान पुष्कळांना निराधार व भ्रामक वाटेल; कारण, या पंथानें आत्यंतिक निवृत्तीचा—मायावादाचा उपदेश करून देश दुबळा केला, नाम-संकीर्तनामुळें टाळकुटेपणाची साथ फैलावून समाज रसातळाला नेला असा आक्षेप नेहमींच घेतला जातो; परंतु सर्वसाधारण लोकांचे ग्रह बहुधा अगदीं ढोबळ मानानें व कित्येकदां तर केवळ काकतालीय न्यायानेंहि बनलेले असतात! गतानुगतिकत्वामुळें ते वारंवार पडताळून पाहण्याची तसदी सहसा कोणी घेतच नाहीं; त्यामुळें एकदां रूढ झालेले ग्रह उत्तरोत्तर ठाम होत जातात. प्रवृत्तिनिवृत्तींचा निर्णय इतक्या स्थूल दृष्टीनें करून चालणार नाहीं. कर्माकर्मविवेक सूक्ष्म आहे, गहन आहे. "कवयोऽप्यत्र मोहिताः" (वांचूनि मूर्खांची गोठी कायसी। एथ मोहले गा! क्रांतदर्शी[४]). कर्म शब्द आपण अनेक अर्थांनीं वापरतों; परंतु या ठिकाणीं विहित कर्म आणि व्यावहारिक कर्म यांतील भेदाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. शास्त्रग्रंथांत कर्म शब्द आला म्हणजे सामान्यतः तो विहित कर्म या अर्थानेंच घ्यावयास हवा. संतवाङ्मयांत या विहित कर्मांतील सकामतेचा तसाच कर्मठपणाचा निषेध आहे. अभंगवाङ्मय हें बहुंशीं प्रासंगिक असल्यामुळें पुष्कळदां त्यांत भक्ताची त्या त्या वेळची मनोवृत्ति प्रतिबिंबित झालेली असते. म्हणून त्यांतून सर्वसामान्य सिद्धांत फार जपूनच काढले पाहिजेत. ज्ञानेश्वर एकनाथांच्या तत्त्वविवेचनपर ग्रंथांचा व अभंग-वाङ्मयाचा तुलनात्मक परामर्श घेऊनच वारकरी-पंथाची भूमिका निश्चित केली पाहिजे.

ज्ञानेश्वरादि संतांनीं समाजधारणेला पोषक होणारीं कर्में सोडण्याची शिकवण दिलेली नाहीं. नैष्कर्म्य आणि निष्क्रियता एक नव्हत. नैष्कर्म्याचा कर्माशीं मुळींच विरोध नाहीं; उलट ज्ञानेश्वरांच्या मताप्रमाणें तर नैष्कर्म्यसिद्धीला कर्में अत्यंत आवश्यक आहेत. (जें चालणें वेगावत जाये। तो वेग बैसावयाचि होये। तैसा कर्मातिशय आहे। नैष्कर्म्यालागीं[५]॥) ज्ञानेश्वरांचा हा कर्मयोग निवृत्तिपर आहे, वारकऱ्यां-

४ ज्ञानेश्वरी, ४, ८८.
५ ज्ञानेश्वरी, १८, १५४.







ची ही प्रवृत्ति अध्यात्मप्रधान आहे यांत कांहींच नवल नाहीं. कारण, लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांच्यापर्यंतचे आपले सारे लोकनायक अध्यात्मवादीच होते. मग तेराव्या शतकांत जेव्हां भौतिक शास्त्रांचा उदयहि झाला नव्हता, तेव्हां ज्ञानेश्वरांनीं अध्यात्मप्रधान कर्मयोग प्रतिपादावा हें स्वाभाविकच नव्हे काय? विज्ञानपूर्व काळांत निष्ठा, त्याग, धैर्य, भूतदया, परोपकार इत्यादि नैतिक मूल्यांची जोपासना करणारा अध्यात्मवाद हा खरोखरच पुरोगामी होता. आजचा भौतिक वाद त्या काळीं दिसणें शक्य नव्हतें; त्या काळचा भौतिक वाद म्हणजे चार्वाकाचा जडवाद, सुखवाद, भोगवाद. सृष्टीपुढें मनुष्य जेव्हां दुबळा होता, निसर्गावर जेव्हां त्याचें प्रभुत्व नव्हतें, बाह्य विश्वांतील अजस्र शक्तींपुढें जेव्हां त्याला पदोपदीं नमावें लागत होतें, तेव्हां पराभूतपणामुळें निराशावाद येऊं नये किंवा बेजबाबदारपणामुळें सुखवाद वाढूं नये, म्हणून त्याला आंतून बळ मिळवावें लागे. 'जगाच्या नियामक शक्तीचा मी एक अंश आहें'-या ऐक्य-भावनेंतून, आत्मश्रद्धेंतून त्याचा सारा आशावाद, प्रयत्नवाद जन्म पावे. म्हणून त्या काळीं निवृत्तिवाद पुरोगामी होता; उलट प्रवृत्तिवादच प्रतिगामी होता.

महानुभावांचा संन्यासमार्ग हा सर्वांना झेंपण्यासारखा नव्हता. महानुभावीय आचार्यांची योग्यता आणि सामान्य माळ्यांकोळ्यांची कुवत यांत जमीन-अस्मानचें अंतर होतें. म्हणूनच वारकरी-पंथानें ज्ञानाचें महत्त्व मान्य करूनहि भक्तीला अग्रस्थान दिलें, तिला प्रवृत्तिपर वळण लावलें व नामसंकीर्तनासारखें सुकर साधन लोकांपुढें ठेवलें. त्यामध्यें अडाणीपणाला किंवा अंधश्रद्धेला मुळींच उत्तेजन नव्हतें. अध्यात्म-मंदिराचें प्रवेशद्वार जास्तींत जास्त रुंद नि सर्वांना समावणारें असावें अशी त्यांची भावना होती. "अवघियांपुरतें वोसंडलें पात्र। अधिकार सर्वत्र आहे येथें॥" ही त्यांची भूमिका. म. गांधींनीं कोणालाहि सहजगत्या आचरतां येईल अशा सुताच्या कार्यक्रमाला आपल्या राजकारणांत मानाचें स्थान दिलें यांतील रहस्य तरी हेंच होय. परमार्थासाठीं प्रपंच सोडून अरण्यवास पत्करण्याची किंवा व्यावहारिक कर्मांना फांटा देऊन संन्यास घेण्याची गरज नाहीं (आतां गृहादिक आवघें। तें कांहीं नलगे त्यजावें[६]) असें सांगणारी ज्ञानेश्वरी ही अध्यात्मदृष्ट्या निवृत्तिपर असली तरी, जैन व महानुभाव यांच्या तुलनेनें सामाजिक दृष्ट्या प्रवृत्तिपरच आहे. 'साधकानें आत्मशुद्धीसाठीं, तर सिद्ध पुरुषानें लोकसंग्रहासाठीं, पण दोघांनींहि कर्में करीतच राहिलें पाहिजे' या गीताप्रणीत कर्मयोगाचाच ज्ञानेश्वरांनींहि पुरस्कार केला आहे.

देखें प्राप्तार्थ जाहले। जे निष्कामता पावले।
तयांही कर्तव्य असे उरलें। लोकांलागीं॥
मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरें लावावें।
अलौकिक नोहावें। लोकांप्रति[७]॥

या ओंव्यांतील आशय तर अगदीं स्पष्ट आहे. "नलगे सायास, जावें वनांतरा। सुखें येतो घरा नारायण!" अशी वारकरी-संतांची श्रद्धा होती. "सुखें संसार करावा!", "पण मार्जी विठ्ठल आठवावा" येवढेंच त्यांचें सांगणें होतें. सिद्धपुरुषानें अलौकिकत्व मिरवूं नये, अगदीं सामान्य माणसाप्रमाणें वागावें, यावर त्यांचा विशेष कटाक्ष होता. ज्ञानेश्वरींत जागोजाग ज्ञानी पुरुषांची, आदर्श भक्तांचीं व स्थितप्रज्ञांचीं वर्णनें आहेत तीं जगावेगळीं वा लोकविलक्षण नाहींत, तर व्यावहारिक कर्तव्यनिष्ठेला व सामाजिक नीतिमत्तेला पोषकच आहेत. सोळाव्या अध्यायांत दैवी संपत्तीचें वर्णन करतांना ज्ञानेश्वरांनीं गंगा व सूर्य यांचे दोन दाखले दिले आहेत.

का फेडित पापताप। पोखित तीरींचे पादप।
समुद्रा जाय आप। गंगेचें जैसें॥
का जगाचें आंध्य फेडित। श्रियेचीं राउळें उघडित
निघे जैसा भास्वत। प्रदक्षिणे[८]॥

गंगेचा प्रवाह समुद्राला जाऊन मिळतो, पण जातां जातां जगाचे पाप-ताप नाहींसे करतो व कांठावरील झाडांचें पोषण करतो. सूर्य आपला नित्यक्रम

---

६ ज्ञानेश्वरी, ५, २२.
७ ज्ञानेश्वरी, ३, १५५, १७१.
८ ज्ञानेश्वरी, १६, १९९-२००.



अनुक्रमणिका






पार पाडीत असतां जगाला ऐश्वर्य व प्रकाश देतो व जीवन आणि ज्ञानहि देतो. भौतिक व आध्यात्मिक उन्नतीची ही केवढी व्यापक व उदार दृष्टि आहे!

अशाच प्रकारें एकनाथ व तुकाराम यांनींहि ठिकठिकाणीं प्रवृत्ति व निवृत्ति यांचा मेळ घातला आहे. "अवताराचें सामर्थ्य पूर्ण। प्रपंच–परमार्थी सावधान[९]॥" असें सांगून एकनाथांनीं रामदासांच्या अगोदरच प्रपंच व परमार्थ यांचा समन्वय साधला आहे. केवळ एकाददुसऱ्या वचनाच्या आधारावर मी हें विधान करीत नाहीं. एकनाथी भागवतांत व भावार्थरामायणांत याच अर्थाचीं किती तरी वचनें इतस्ततः आढळतील. वारकरी–पंथानें समाजाला नेभळट बनविलें हा आरोप तर हास्यास्पद आहे! "अर्जुना देऊनि समाधी। सवेंचि घातला महा-युद्धीं[१०]॥" या उक्तींतील अभिप्राय क्रियाशीलतेचा द्योतक आहे, निष्क्रियतेचा निदर्शक नाहीं. एकनाथ शांत व क्षमाशील होते, पण तुकाराम तर न्याय-निष्ठुर व आक्रमक होते! दांभिकतेवर कठोरपणें कोरडे ओढून त्यांनीं आपल्या अभंगांत सर्वत्र भक्ति आणि भूतदया, परमार्थ आणि परोपकार यांचा मिलाफ घडवून आणला आहे.

वारकरी–पंथांत देवापेक्षांहि संतांचें महत्त्व जास्त आहे :

करितां देवार्चन। घरा आले संतजन॥
देव सारावे परते। संत सारावे आरते॥

संत स्वतःच्या आचरणानें जगाला धडा घालून देतात :

अर्भकाचे सार्टी। पंतें हातीं धरिली पाटी॥
तैसें संत जगीं। क्रिया करूनि दाविती अंगीं॥

चोखा मेळा, गोरा कुंभार, सांवता माळी हे सर्व संत गृहस्थाश्रमी व कुटुंबवत्सल होते. ते आप-आपले व्यवसाय निर्वेधपणें करीत होते. लोकांपासून ते कधीं फटकून राहिले नाहींत; म्हणून त्यांच्याबद्दल लोकांना ते आपल्यांतलेच आहेत असा विश्वास वाटत होता. "नाहीं संतपण मिळत हें हाटीं। हिंडतां कपाटीं रानीं वनीं॥" याबद्दल त्यांना शंका नव्हती; म्हणून संन्यासधर्माचें बंड त्यांनीं माजविलें नाहीं कीं जैन, लिंगायत व महानुभाव या पंथांतल्या-प्रमाणें यती, जंगम किंवा महंत यांसारखा वेगळा संतांचा वर्गीहि काढला नाहीं. महानुभाव–पंथी-यांनीं मात्र गांवाच्या एका टोंकाला जाऊन वृक्षाच्या तळवटीं राहण्याचा म्हणजे विजनवास पत्करण्याचा उपदेश महंतांना केला आहे. (स्वदेशसंबंधु त्याज्य : स्वग्रामसंबंधु त्याज्य : संबंधियांचा संबंधु तो विशेषतां त्याज्य.[११] देशाचा सेवटा : झाडाचा तळवटा : देउळाचा कोनटा : इये तीन्ही सेउनि असावें.[१२]) त्यामुळें समाजाचा व त्यांचा दैनंदिन व्यवहारांतील संबंध सुटला. मग लोकांना महानुभाव–पंथाबद्दल तेवढासा विश्वास, तितकीशी आपुलकी वाटली नाहीं तर काय नवल? मात्र "खटनट यावें, शुद्ध होउनि जावें। दवंडी पिटी भावें, चोखा मेळा॥" ही चोखा-मेळ्याची दवंडी देशांतील अठरापगड जातींना आध्यात्मिक क्षेत्रांत सारखाच दर्जा मिळवून देणारी असल्यामुळें हजारों लोकांनीं वारकरी–पंथाची कांस धरली व खडतर संन्यासामुळें महानुभाव पंथाला मात्र शेवटीं फक्त मूठभर पंडितांचाच पाठिंबा मिळाला!

## वारकरी–पंथाची सर्वसंग्राहकता.

वारकरी–पंथ हा सर्वसंग्राहक आहे. त्यानें संकुचित सांप्रदायिकता बाळगली नाहीं, प्रतीकाचा दुराग्रह धरला नाहीं, दैवतावर रणें माजविलीं नाहींत. परमेश्वर सर्वव्यापी आहे व तो विविध रूपांनीं नटलेला आहे; (तुका म्हणे हरि। अवघा एकला॥ परी हा धाकुला। भक्तीसाठीं॥) म्हणून उपासकांची भावनाच मुख्य आहे, प्रतिमा गौण आहे, याची जाणीव त्यांना होती. त्यामुळें राम, कृष्ण, दत्त, शिव इत्यादि दैवतांच्या भक्तांना त्यांनीं आपल्यांत सामावून घेतलें. वारकरी–संतांनीं तर नेहमींच विष्णु व शिव यांच्या ऐक्यावर भर दिला आहे. (शिव मस्तकीं धरिला। भेद भक्तांचा काढिला॥) महा-

९ भावार्थरामायण, बालकांड, ११,२४३.
१० भागवत, २, ४३१,
११ सूत्रपाठ, आ. १.
१२ सूत्रपाठ, आ. मा. २१९.








नुभाव–पंथीयांनीं ही उदार दृष्टि ठेवली नाहीं. पंच-कृष्णांव्यतिरिक्त इतर दैवतें ते तुच्छ मानतात. ही संकुचित वृत्तीहि त्यांना वेळोवेळीं बाधली असेल असें म्हणावयास हरकत नाहीं.

वारकरी पंथांत विठ्ठलभक्तीचा माहिमा विशेष आहे यांत कांहींच आश्चर्य नाहीं; कारण, पंढरीच्या या विठ्ठलानें महाराष्ट्रांतील साधुसंतांना चारशें वर्षे ग्रंथलेखनाची व कवित्वाची स्फूर्ति दिली आहे. लक्षावधि शूद्राति शूद्राना या दयामय दैवतानें आत्मोद्धाराची प्रेरणा दिली आहे, बंधुभावाचे पाठ दिले आहेत. पण कोदंडधारी रामाशीं तुलना करून कांहीं टीकाकारांनीं विठ्ठलाचे वाभाडे काढले आहेत! त्यांच्या मताप्रमाणें 'विठोबा हा गुलामांचा देव आहे! परंतु वारकऱ्यांच्या दृष्टीनें राम, कृष्ण व विठ्ठल हे तिघेहि एकाच परमेश्वराचे अवतार आहेत. मात्र त्यांचें अवतारकार्य एक नाहीं. राक्षसांच्या संहारासाठीं निघालेल्या रामानें कोदंड हातीं घ्यावें हें स्वाभाविक आहे;परंतु पतितांना पावन करण्यासाठीं, जडमूढांचा उध्दार करण्यासाठीं, दलितांना आश्वासन देण्यासाठीं अहर्निश उभा राहणाऱ्या पांडुरंगाला शस्त्रास्त्रांची काय गरज ? विठोबा हा गुलामांचा देव नाहीं, गरिबांचा देव आहे. द्वारकेच्या राण्याचें ऐश्वर्य त्यानें सोडून दिलें आहे. ( देव भावाचा लंपट । सांडून आलासे वैकुंठ ॥ ) त्याचें कार्य विध्वंसक नाहीं, तर विधायक आहे. वात्सल्य, दयाशीलता, सहिष्णुता, क्षमाशीलता इत्यादि गुणांनीं तो संपन्न आहे. विठाई ही खरी अनाथांची माउली आहे. म्हणूनच तिच्याशीं प्रेमानें सलगी करतांना भक्तांना कधीं संकोच किंवा भीति वाटत नाहीं. ते लडिवाळपणानें तिच्यापुढें हट्ट करतात, तिच्यावर रुसतात, रागावतात आणि पुनः भक्तिभावानें तिच्या पायांवर लोटांगण घालतात!

## महानुभावीय वाङ्मय

'महानुभाव' व 'वारकरी' या दोन्ही पंथांचें कार्य स्त्री–शूद्रांना धर्ममंदिरांत स्थान मिळवून देण्याचें असल्यानें त्यांनीं बौद्ध, जैन, लिंगायत यांच्याप्रमाणेंच देशभाषेचा पुरस्कार केला, मराठीचा अभिमान बाळगला व या बोलभाषेला वाङ्मयीन प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. या बाबतींत अग्रेसरत्वाचा मान महानुभावीय लेखकांकडेच जातो. काव्यगुणांच्या दृष्टीनेंहि या पंडितांचेच ग्रंथ सरस व श्रेष्ठ प्रतीचे आहेत. त्यांचें वाङ्मय विपुल व बहुविध आहे. आरंभीं केशिराजवासांनीं लीळाचरित्रांतील चक्रधरांचीं वचनें सूत्रपाठांत संकलित केलीं. त्यानंतर या सूत्रांवर पुष्कळच टीका, प्रतिटीका, उपटीका अस्तित्वांत आल्या. संस्कृत भाषेंतील टीकाग्रंथ आदर्श मानून हें वाङ्मय लिहिलें गेलें. त्यामुळें न्यायव्याकरणाच्या साह्यानें मूळ वचनांतील शब्दांचा कीस काढण्याची प्रवृत्ति यांतहि दिसून येते. महानुभाव ग्रंथकार संस्कृत भाषेंत निष्णात होते. त्यांचा जुन्या शास्त्रांचा व्यासंग गाढ होता. परंपरागत वैदिक पठडींतूनच ते शिकून तयार झालेले होते. त्यामुळें वेद अप्रमाण मानणाऱ्या या नव्या पंथाच्या प्रवक्त्यांनाहि वैदिक परंपरेंतील भाष्यकारांच्या जुन्या चाकोरींतून बाहेर पडतां आलें नाहीं. त्यांची लेखनशैली लोकानुवर्ती ( Popular ) नाहीं, ती वेदाभ्यासजड ( Pedantic ) आहे. काव्य–प्रांतांतहि धर्मप्रचाराच्या प्रेरणेपेक्षां कलाविलासाची प्रवृत्ति पुष्कळदां वरचढ झालेली दिसते.[१३] टीकाग्रंथांतील विद्वत्ताप्रचुर नि तर्ककर्कश शैली एका बाजूला आणि कथावाङ्मयांतील कल्पनाप्रधान व अलंकारमंडित शैली दुसऱ्या बाजूला, अश्या या दोहींचाहि सामान्य जनांत धर्मपरिवर्तन घडवून आणण्याच्या दृष्टीनें कितपत उपयोग झाला असेल याची शंकाच आहे. मूळचें अनुसंधान सुटल्यामुळें या पंडितांना व कलावंतांना आपलें पांडित्य आणि आपली प्रतिभा धर्मप्रचारासाठीं राबवितां आलीं नाहींत.

नव्या पंथाला आपल्या विचारसरणींतील अभिनव आशय लोकांच्या गळीं उतरवितांना जुन्या तंत्राचा अवलंब करून भागत नाहीं. आपल्या तत्त्वज्ञानाला व कार्याला अनुरूप असें नवें तंत्र त्याला बसवावें लागतें, ही गोष्ट महानुभाव पंडितांनीं ओळखली नाहीं. टीका–लेखनाच्या बाबतींत त्यांनीं

१३ भास्कराच्या ' शिशुपाल वध ' ग्रंथासंबधीं भावे व्यासांचा हा अभिप्राय पाहाः –" भट्टो हा ग्रंथु निका जाला असे : परि निवृत्ताजोगा नव्हेचि : हा शृंगारियांप्रवृत्तांजोगा जाला असे. "



अनुक्रमणिका






संस्कृत भाष्याचें अनुकरण केल्यानें तें वाचकांना समजूं शकलें नाहीं, पचूं शकलें नाहीं. " जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवी ? [१४] " आईचें दूध पितांनाहि ज्या बालकाला श्रम होतात, त्याच्यापुढें पंचपक्वान्नांचें ताट वाढण्यांत काय हंशील ? ललितवाङ्मयाच्या बाबतींतहि पंचमहाकाव्यांचा जुनाट सांचा पत्करल्यामुळें तें वाङ्मय तत्कालीन सामान्य जनांना रुचूं शकलें नाहीं. नुसते शब्द बदलल्यानें वाङ्मय बदलत नाहीं, त्यासाठीं भाषाशैली बदलावी लागते, लेखन–तंत्रांत नावीन्य यावें लागतें. आणि प्रतिपाद्य विषयाला धरून, पण श्रोत्यांची व वाचकांची अभिरुचि लक्षांत घेऊनच हा बदल करावा लागतो.

## ज्ञानेश्वरांची परंपरा

वारकरी–पंथांतील लेखकांनीं श्रोत्यांचा अधिकार तशीच त्यांची आवडनिवड बरोबर अजमावली होती. जुन्या वाङ्मयाचें अनुकरण न करतां त्यांनीं आपल्या प्रचाराला साजेसें नवें तंत्र अस्तित्वांत आणलें. या दृष्टीनें पाहतां ज्ञानेश्वर हे आदर्श पंथप्रवर्तक व अभिजात टीकाकार होत, असें म्हणण्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. श्रोत्यांकडे त्यांच्याइतक्या आस्थेनें व बारकाईनें लक्ष पुरविणारा दुसरा ग्रंथकार मराठी साहित्यांत तरी अजून झाला नाहीं. श्रोत्यांची गरज ध्यानांत घेऊन ते पुष्कळदां निरनिराळ्या तऱ्हांनीं विषयाचा विस्तार करतात; पण विवेचनाच्या ओघांतहि अवधान सुटल्याची जाणीव होतांच ते लगोलग श्रोत्यांचा अनुनय करण्याची काळजी घेतात. त्यामुळें त्यांच्या शैलींत सुगमता असूनहि उथळपणा नाहीं, सखोलता असूनहि अवघडपणा नाहीं. 'न पाहे श्रोतयाचें वदन' अशी दासोपंती वृत्ति त्यांच्या ठिकाणीं नव्हती. त्यांची भूमिका वादकुशल पंडिताची नाहीं, तर्कनिपुण भाष्यकारांचीहि नाहीं, तर ती प्रेमळ उपदेशकाची आहे, सहृदय शिक्षकाची आहे, ममताळू मातेची आहे. (बाळकातें बोरसें। माय जें जेवतूं बैसे। तें तया ठाकती तैसे। घास करी ॥ [१५] ) तत्त्वज्ञानासारखा गहन विषय सामान्य जनांच्या आटोक्यांत आणण्याचा त्यांनीं यशस्वी उपक्रम केला. ( स्त्री शूद्रादि प्रतिभे । सामाविलें ॥ [१६] ) वाचकांशीं समरस होऊन लिहिणाऱ्या कलावंताचा हळुवारपणा त्यांच्या वृत्तींत असल्यामुळें त्यांच्या शैलीला विलक्षण मार्दव तशीच मधुरता आलेली आहे.

व्यक्तिपरत्वें व कालपरत्वें प्रत्येकाची शैली भिन्न असली तरी एकनाथ तुकारामादि इतर संतहि वाचकांशीं समरस झालेले आहेत. त्यामुळें त्यांच्या वाङ्मयाला असाधारण लोकप्रियता लाभली. आरंभी स्फुट, भावनिष्ठ असे शेंकडों लहान लहान अभंग लिहिले गेले. जसजशी मराठी वाचकवर्गाची अभिरुचि उत्तरोत्तर प्रगल्भ बनत गेली, तसतसा ग्रंथविस्तारहि होत चालला व वाङ्मयांत विविधताहि आली. एकनाथांच्या ग्रंथांनीं मराठी साहित्यांत पांडित्याची परंपरा सुरू केली. मुक्तेश्वर तुकारामाच्या काळापासून मराठी भाषेचें सौंदर्य, सामर्थ्य आणि ऐश्वर्य हीं सहस्रमुखांनीं समृद्ध होत गेलीं. महानुभावांच्या तुलनेनें संतवाङ्मयाचा प्रसार पुष्कळच झाला असें म्हणावें लागतें. ज्ञानेश्वरीच्या प्रती गांवोगांव विखुरल्यामुळें तींत अनेक अपपाठ शिरले आणि अस्सल पाठ ठरविण्यासाठीं संशोधन करण्याची पाळी आली! उलट महानुभावांचें बंदिस्त वाङ्मय कालाच्या पडद्याआड अदृश्य होऊन दुर्मिळ झाल्यामुळें त्याचेंहि संशोधन करणें भाग पडलेंच. यांतील कोणतें संशोधन गौरवास्पद आहे, हें ठरविणें मुळींच कठिण नाहीं.

वारकरी–पंथीयांनीं आपल्या धर्मप्रचारासाठीं एक नवें वाक्‌पीठ निर्माण केलें. त्यांचीं निरूपणें व कीर्तनें यांचा थाट अगदीं वेगळा आहे. पंडितांच्या पुस्तकी प्रवचनांशीं किंवा हरदासांच्या दरबारी कीर्तनांशीं त्यांचें यत्किंचितहि साम्य नाहीं. लोकांत आत्मीयता व आत्मविश्वास उत्पन्न होण्यासाठीं लोकांतील पुढारी आघाडीवर यावे लागतात. वार-

---

१४ ज्ञानेश्वरी, ३, १७२

१५ ज्ञानेश्वरी, १८, १६९८.

१६ ज्ञानेश्वरी, १८, १७००.








करी–पंथानें लोकांतून धर्मप्रवक्ते तयार केले. नामदेव हा त्यांच्या कीर्तन–संप्रदायाचा आद्य प्रवर्तक होय. "सुंबाचा करदोडा । रकट्याची लंगोटी। नामा वाळवंटीं । कथा करी ॥" हें दृश्य शूद्रातिशूद्रांना खरोखरच किती स्फूर्तिदायक वाटलें असेल ! आपल्या धर्मजीवनांत ही घटना निःसंशय अभूत–पूर्व अशीच होती. अध्यात्मविद्या ही आतां केवळ दशग्रंथी ब्राह्मणांची मिरास राहिली नाहीं. संत–कीर्तनकार हे महानुभावीय आचार्यांप्रमाणें कोणत्याहि एका विशिष्ट वर्णांचे नव्हते. "आम्हां 'कीर्तन' कुळ–वाडी" अश्या भावनेनें ते आपला जन्मसिद्ध हक्क गाजवूं लागले. ज्ञानेश्वरांच्या भावार्थ–दीपिकेनें या लोकांना कवित्वाची प्रेरणा, तशीच कीर्तनाची स्फूर्ति दिली. जनाबाईसारखी मामुली मोलकरीण अध्यात्माचे सिद्धान्त अभंगांत गाऊं लागली. "वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनीं वाहावा भार माथां !" असें आव्हानपूर्वक म्हणण्याइतका आत्मविश्वास तुकारामांसारख्या कुणब्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाला. ज्ञानेश्वरांच्या मोठेपणाचें खरें रहस्य या लोकोत्तर स्फूर्तिदायकतेंत सांठविलेलें आहे.

### ज्ञानदीप लावूं जगीं

या ठिकाणीं आणखी एका आक्षेपाचें निरसन करणें जरूर आहे. 'वारकरी–पंथ हा अडाणी लोकांचा पंथ आहे, त्याचा ज्ञानाशीं कांहीं संबंध नाहीं. भोळीभाबडी भक्ति हाच त्या पंथाचा आधार असल्यामुळें हजारों लोक त्यांत सामील झाले,' असा पुष्कळांचा समज आहे; पण त्यांत तिळमात्र तथ्य नाहीं. या पंथानें विद्वत्तेचें अवडंबर माजविलें नाहीं हें खरें; परंतु त्यानें अंधभक्तीलाहि कोठेंच थारा दिलेला नाहीं. 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' हें वेदान्ताचें मुख्य सूत्र त्यानें कधींहि सोडलें नाहीं. नामसंकीर्तनासारख्या सहजसुलभ साधनाचा त्यानें उदोउदो केला; पण साधनाच्या दृष्टीनें ही केवळ पहिली पायरी आहे हें त्यानें वारंवार व निक्षून सांगितलें आहे. भक्ति ही सुळावरील पोळी आहे. भक्त होण्यासाठीं 'विष खावें ग्रासोग्रासीं' अशी खडतर साधना करावी लागते ! तें 'येरा गबाळां'चें काम नाहीं. "तुका म्हणे मिळे जिवाचीये साटीं। नाहीं तरी गोष्टी बोलों नये॥" असा तुकारामानें रोखठोक इषारा दिला आहे. या पंथांत भक्तिभावाचा जो गौरव आहे, नामसंकीर्तनाचा जो अट्टहास आहे तो कर्मठपणाची नांगी ठेंचण्यासाठीं आहे; शिवाय, आत्मशुद्धीवर व सदाचरणावरहि या पंथानें खूप भर दिला आहे. त्यांत "विवेकासहित वैराग्याचें बळ" मिळविण्याची शिकवण आहे. त्याचें अभंगवाङ्मय व त्याचा कीर्तनसंप्रदाय म्हणजे धर्मशिक्षणाची एक प्रचंड मोहीमच होती असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्ञानेश्वर हे तर ज्ञानियांचे राजेच होते. परंतु "नाचूं कीर्तनाचे रंगीं। ज्ञानदीप लावूं जगीं" अशी नामदेवांचीहि प्रतिज्ञा होती. लोकांत श्रद्धा होतीच, तिला संतांनीं डोळसपणा आणला. अध्यात्मविद्या, आत्मज्ञान हा तर भावार्थदीपिकेचा वर्ण्य विषय आहे. "करतळावरी वाटोळा । डोलत देखिजे आंवळा। तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज[१७] ॥" ही ओंवी खुद्द ज्ञानेश्वरांच्या साहित्याला तंतोतंत लागू पडण्याजोगी आहे. ज्ञानाचा प्रभाव वर्णन करतांना, ज्ञानाचें स्वरूप विशद करतांना, भावार्थदीपिकेंत ज्ञानेश्वरांची प्रतिभा अत्यंत उच्च आणि विरल वातावरणांत निरंकुशपणें विहार करीत असल्याचें आपणांस दिसून येतें.

नामदेवांचें 'मडकें' कच्चें असल्याची गोरोबाकाकांची परीक्षा, आणि विसोबा खेचरांचा अनुग्रह झाल्यानंतर 'डोळियांचा डोळा उघडिला जेणें,' हा नामदेवांचा उद्गार यांवरून वारकरी–संप्रदायांत ज्ञानाला किती महत्त्व आहे हें स्पष्ट दिसतें. महानुभाव–महंत ज्ञानी होते; पण त्यांचें ज्ञान म्हणजे केवळ शब्दज्ञान होय. या पुस्तकी पांडित्याला व पढिक पोपटपंचीला अध्यात्माच्या क्षेत्रांत कवडीचीहि किंमत नाहीं. व्युत्पत्ति, व्याकरण, रस, अलंकार यांच्या चिकित्सेंत वारकरी–संतांपेक्षां महानुभाव–आचार्य निःसंशय वरचढ आहेत; पण आत्मज्ञानाच्या अनुभूतीखेरीज या व्यासंगाला कांहीं अर्थ

१७ ज्ञानेश्वरी, १३, ६५२.








नाहा. संतवाङ्मयांत हा आत्मप्रचीतीचा जिव्हाळा उत्कटतेनें आढळतो. " सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ " हा अनुभव अज्ञानमूलक आहे काय ? तसें पाहिलें तर अद्वैतमताची कांस धरणाऱ्या पंथाला तरी ज्ञानाशिवाय दुसरी गतीच नाहीं. शब्दज्ञानाच्या क्षेत्रांतहि एकनाथ महापंडित होते. " जयाची वदे पूर्ण वेदांत वाणी " असा तुकोबांचा अधिकार वामनानें वर्णिलाच आहे.

## शास्त्रप्रामाण्य

यानंतर शास्त्रप्रामाण्याचा विचार केला पाहिजे. चक्रधरानें वेदप्रामाण्य मानलें नाहीं म्हणून तो क्रांतिकारक आहे ही विचारसरणि चूक असल्याचें मीं आरंभींच सांगितलें आहे. ज्ञानेश्वरांनीं वैदिक परंपरेला—श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माला प्रमाण मानलें होतें. श्रुतीला तर ते साक्षात् 'माउली' म्हणतात ![18] "कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं ॥[19]" असें म्हणून ते स्मृतिग्रंथांची थोरवी गातात. चातुर्वर्ण्याच्या व जन्मसिद्ध जाति—व्यवस्थेच्या चौकटीला त्यांनीं धक्का लावला नाहीं, या दृष्टीनें ते क्रांतिकारक न ठरतां धर्मसुधारकच ठरतील. वास्तविक पाहतां या भावंडांना वर्णाश्रमधर्माच्या पोलादी चौकटीचा अगदीं कटु अनुभव आला होता. वैयक्तिक दृष्ट्या तर तिच्या विरुद्ध बंड करण्याचा त्यांना खास अधिकार होता. सनातनी पंडितांनीं त्यांना देव म्हटलें, पण ब्राह्मण म्हटलें नाहीं; त्यांचा व्यक्तिगत मोठेपणा मान्य केला, पण त्यांची सामाजिक प्रतिष्ठा (Status) हिरावून घेतली. या अन्यायामुळें ज्ञानेश्वर एकांतिक बनले असते तरी तें क्षम्य होतें; पण कालाचा प्रवाह त्यांनीं ओळखला, परिस्थितीच्या मर्यादा त्यांनीं जाणल्या आणि शक्याशक्यतेचा पूर्ण विचार करून योग्य तोच मार्ग चोखाळण्याचें द्रष्टेपण दाखविलें. या विवेकशीलतेंतच त्यांच्या यशाचें रहस्य आहे. स्वतःच्या अनुभवामुळें आध्यात्मिक जीवनांतील दलितांच्या कुचंबणेची जाणीव त्यांना तीव्रतेनें झाली; म्हणून वैयक्तिक अन्याय निमुटपणें गिळून बहुजनसमाजाच्या आत्मिक उन्नतीसाठीं त्यांनीं वारकरी—पंथाला नवें वळण लावलें. ज्ञानेश्वर हे वास्तववादी धर्मसुधारक होते. बौद्ध, जैन व लिंगायत या पंथांच्या सामाजिक अपयशाचें दृश्य त्यांच्यापुढें होतें. या पंथांनीं वेदप्रामाण्य झुगारून देऊन चातुर्वर्ण्यावर घाला घातला; पण त्यामुळें जातिव्यवस्था कोलमडली नाहीं, कीं वर्णाश्रमधर्माची समाजावरील पकड सुटली नाहीं. उलट, या पंथांचे अनुयायीच सामाजिक व्यवहारांत " प्रमाणं लौकिको विधिः " असें म्हणून जातिभेद व रूढ आचार कांटेकोरपणानें पाळूं लागले. त्यामुळें आचार—विचारांत विसंगति पत्करण्याचा अनवस्था—प्रसंग या पंथांवर ओढवला. या इतिहासापासून जरूर तो बोध घेऊन ज्ञानेश्वरांनीं सामाजिक व्यवहारांत ढवळाढवळ केली नाहीं, समाजक्रांतीच्या खोट्या आशा बाळगल्या नाहींत किंवा एकदम आकाशालाच गवसणी घालण्याचा खटाटोपहि केला नाहीं. त्यांनीं फक्त धार्मिक जीवनांत समता नि बंधुभाव आणण्याचा यशस्वी उपक्रम केला. त्यांचें हें मर्यादित यश ऐतिहासिक दृष्ट्या तर फारच मोठें आहे. समाज—रचनेशीं निगडित असलेली अर्थ—व्यवस्था आरपार बदलण्याजोगी परिस्थिति त्या काळीं नव्हती; नुसत्या विचार—परिवर्तनानें हें कार्य घडण्याचा संभव नव्हता. म्हणून धर्मसुधारकांनीं सामाजिक समतेसाठीं त्यावेळीं जे जे प्रयत्न केले, ते ते सारे सपशेल फसले ! वारकरी—संतांनीं फक्त धार्मिक क्षेत्रांतील भेदभाव दूर केला. देवाच्या मंदिरांत हा ब्राह्मण, हा शूद्र असा फरक नाहीं, त्याच्या पुढें सर्व भक्त सारखे, तो फक्त भावाचा भुकेला आहे. "विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । 'भेदाभेद'—भ्रम अमंगळ ॥ " ही त्यांची अभेदभावाची शिकवण जनमनांत फार खोलवर रुजली. चोखामेळ्याच्या समाधिपुढें एकनाथांसारख्या विद्वत्कुलशेखरानें आपलें मस्तक नमविलें म्हणून त्याचें कोणाला वैषम्य वाटलें नाहीं. 'आपण एकाच दैवताचे उपासक आहों, एकाच जगन्मातेचीं लेंकरें आहों, ही विश्वबंधुत्वाची

१८ ज्ञानेश्वरी, १६, ४६२.
१९ ज्ञानेश्वरी, १६, ४६६.








भावना अंगीं बाणल्यानें सामाजिक व्यवहारांतील कटुता कांहीं अंशानें तरी खास कमी झाली असेल. महानुभाव–पंथानें मात्र मठ–महंत–शिष्य–शाखांच्या द्वारें religious hierarchy निर्माण करून अप्रत्यक्षपणें विषमतेचेंच पोषण केलें.

### लोकप्रियतेचें रहस्य

वारकरी–पंथाच्या प्रसाराचें व लोकप्रियतेचें रहस्य हेंच आहे कीं त्याच्या प्रवक्त्यांत बुद्धि आणि भावना यांच्या गुणांचा मनोज्ञ मिलाफ झाला होता. त्यांच्यापाशीं विचाराचें वैभव कमी नव्हतेंच; पण भावनेचें ऐश्वर्यहि अपार होतें. निष्ठा, त्याग, धैर्य, सहिष्णुता, उदारता इत्यादि गुणांनीं त्यांनीं लोकांचीं मनें वेधून घेतलीं. संत–महंतांच्या भूमिकांत हाच मुख्य फरक आहे. जगावर न रागावतां संतांनीं लोक–निंदेचे आघात शांतपणें सहन केले; पण त्यांची ध्येयदृष्टि अणुमात्र ढळली नाहीं. (तुका म्हणे तोचि संत। सोशी जगाचे आघात॥) महानुभाव आचार्य समाजाच्या विरोधाला घाबरले व त्यांनीं लोकांपासून फटकून वागण्याला सुरुवात केली; त्यांनीं सांकेतिक लिप्यांचा आश्रय करून दुबळेपणा दाखविला. या तुटकपणामुळें हा संप्रदाय अधिकाधिक संकुचित होत गेला व लवकरच त्याची प्रगति कायमची खुंटली.

महानुभाव–पंथाला यादवांच्या दरबारांत मान्यता होती. वारकरी–संतांनीं मात्र राजाश्रयाची कधीं फिकीर देखील केली नाहीं. सामान्य जनांची सहानुभूति व त्यांचें सहकार्य हाच त्यांचा आधार होता. लोकांच्या चांगुलपणावर व गुणग्राहकतेवर त्यांचा विश्वास होता. राजमान्यतेचें त्यांना वावडें होतें. पंडितांनीं त्यांना विरोध केला तरी देखील हजारों लोक या पंथांत अहमहमिकेनें दाखल झाले. महानुभावीय मठांना पुढच्या काळांतहि इनामें मिळालीं. वारकरी–संत मात्र या उपाधीपासून पूर्णपणें अलिप्त होते. " नव्हें मठपति। नाहीं चाहुरांची वृत्ति॥ " अशी आपल्या निःस्पृहतेची ग्वाही तुकारामानीं दिली आहे. संन्यस्तांचा व महंतांचा वेगळा वर्ग काढल्यामुळें चक्रधरांना " भिक्षा राज्य बाई[२०] " असें म्हणून भिक्षा–वृत्तीचा पुरस्कार करावा लागला; पण वारकरी–भक्त आपआपले व्यवसाय करीत असल्यामुळें त्यांना निर्वाहासाठीं लोकांवर भार घालण्याचें कारणच पडलें नाहीं. उलट, " जगा घालावें सांकडे। दीन होऊनी बापुडें। हेंचि अभाग्य रोकडें॥ " अशा शब्दांत त्यांनीं भिक्षा–वृत्तीचा निषेधच केला आहे. वारकरी–पंथाच्या प्रवृत्तिपरतेचा हा आणखी एक सबळ पुरावाच नाहीं का ?

येवढ्या विवेचनानंतर एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट होईल कीं महानुभाव–पंथाचें अपयश हा केवळ दैवयोग नव्हे. त्याच्या पाठीमागें निश्चित कारण–परंपरा आहे. वारकरी–पंथाच्या तुलनेनें या कार्यकारण–भावाची छाननी मीं स्थूल मानानें पण पूर्वग्रहरहित दृष्टीनें केली आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत या दोन्ही पंथांचा कांहीं विशिष्ट कार्यभाग आहे; मात्र वारकरी–पंथाचें कार्य सामाजिक दृष्ट्या निःसंशय अधिक व्यापक व मौलिक स्वरूपाचें आहे.

---

२० सूत्रपाठ, आ., ९१.

---

'परमेश्वराच्या सिंहासनाखालीं खाजिने भरलेले असून त्यांच्या किल्ल्या म्हणजे कवींच्या जिह्वा होत.'
—महंमद पैगंबराची सूक्ति.









अनुक्रमणिका

श्री. रोहिणी भाटे

# 'कथक' नृत्य : सौंदर्यशोध आणि आनंदबोध

मीं नृत्य शिकावयास सुरुवात केली तेव्हां पुण्यांतल्या सर्वसाधारण नर्तकांची आणि रसिकांची स्थिति, हातांनीं चांचपून हत्ती कोणासारखा हें ठरवूं पाहणाऱ्या अंधळ्यांप्रमाणें होती ! एक म्हणतो, हत्ती सुपासारखा—आपण सिनेमांत हाव–भाव युक्त गाणीं ऐकतों तेंच नृत्य ! तर एक म्हणतो, हत्ती मुसळासारखा—उदयशंकर करतो तेंच फक्त नृत्य ! अर्थात् ही झाली सर्वसाधारण जनमनाची स्थिति; तसे नृत्याचे रसिक दर्दीहि पुण्यांत असतीलच प्रथमपासून, अन् होतेच; परंतु आम्ही सर्वसाधारण लोकांच्या रिंगणांतले असल्यानें प्रथम मलाहि हत्ती केवळ खांबासारखाच, खांबायेवढाच वाटे.

नृत्य म्हणून पुण्यांतील एकुलत्या एका क्लासातर्फे जें नजरेसमोर आलें तें अठरा धान्यांचें कडबोळें होतें. त्यांत 'कथका'चें साम्य वाटे; पण त्यांतील डोळे दिपविणारी पायांची करामत आणि विशिष्ट फेरे घेण्याची पद्धत यांचा कोठें मागमूसहि नसे.

## 'कथक'चें आकर्षण

त्यांत **'मणिपुरी'**ची छटा दिसे; परंतु त्या नृत्यपद्धतींतील पराकाष्ठेचें लालित्य तर त्यांत नसे व **'भरतनाट्य'** आणि **'कथाकली'** हे शब्दहि त्या वेळेस शब्दकोशाच्या बाहेर पडले नव्हते ! तेव्हां सांगायची गोष्ट ही कीं माझें ज्ञान इतकें अगाध होतें ! मी 'कथक' किंवा 'मणिपुरी' नृत्य शिकत नसून 'नृत्य' शिकत होतें, येवढेंच मला आठवतें. त्यानंतर थोड्या दिवसांनीं आमचे नृत्यशिक्षक बंगलोरास जाऊन, श्री. सोहनलाल यांजकडे थोडेंबहुत शिकून आल्यावर, त्यांनीं जें कांहीं मला शिकविलें त्यामुळें माझ्या नृत्यांत 'कथक'चा भास निर्माण होऊं लागला; म्हणजे केशर घातलेल्या पदार्थांत आणि केशरी रंग असणाऱ्या, परंतु अस्सल स्वाद नसणाऱ्या पदार्थांत जितकें साम्य असतें तेवढेंच साम्य माझ्या नृत्यांत आणि अस्सल 'कथक' नृत्यांत दिसूं लागलें. त्यानंतर श्री. सुंदरप्रसाद यांच्या 'कथक' नृत्याच्या वर्गांत शिक्षण घेणाऱ्या माझ्या मुंबईच्या भगिनीमुळें 'कथक'नृत्याचें सौंदर्य थोडथोडें कां होईना मला चाखायला मिळूं लागून माझी नृत्याच्या बाबतींत रुळावरून घसरलेली गाडी पुनः रुळावर आणण्याची खटपट मीं सुरू केली. ही गोष्ट घडेपर्यंत मध्यंतरीं जरी बरींच वर्षें गेलीं, तरी त्यांमध्यें पाहिलेल्या आणि अन्तःकरण–पूर्वक आस्वादिलेल्या 'कथक'–नृत्य–कार्यक्रमांमुळें मला 'कथक' नृत्य मनापासून आवडूं लागलें. श्री. हिरालाल, गौरीशंकर, सुंदरप्रसाद, जयलाल व त्यांच्या शिष्या पुवय्याभगिनी इत्यादींचीं नृत्यें पाहिल्यावर, त्यांच्या नृत्यांतील पदन्यासाच्या रेखीव गतिमान् पद्धती, शान्त समुद्रावर हळूहळू अगदीं अलगद सरकणाऱ्या होडीप्रमाणें त्यांचें तें 'गतीं'-तील लयबद्ध पुढेंमागें सरकणें, प्रसंगीं वादळाच्या वेगानें पायांतून नि अंगविक्षेपांतून उमटणारे बोल, तर कधीं 'गतभाव' दाखवितांना चेहऱ्यावर दग्गोचर होणारे सहज, मनोहर, परंतु स्पष्ट आणि रेखीव असे भाव, इत्यादि 'कथक'चे विशेष माझ्या मनावर चित्ररूपानें ठसले आहेत.

## 'कथाकली' व 'भरतनाट्य' यांचा जमाना

त्यानंतर अगदीं अलीकडे 'भरतनाट्य' व 'कथाकली' हे शब्द कोशांतून बाहेर पडले आणि त्यांनीं हळूहळू सजीव रूप धारण करून या दाक्षिणेकडील नृत्यपद्धतींचें अविष्करण करावयास सुरुवात केली.

# ‘ कथक ’ नृत्य : सौंदर्यबोध आणि आनंदबोध

‘कथाकली’ नि ‘भरतनाट्य’ या दोन नृत्यपद्धतींचा विशेष असा आहे कीं नवशिक्या कलावंताला अगर तीं नृत्यें प्रथमच पाहणाऱ्या रसिकाला त्यांतील सौंदर्य चाखतां येत नाहीं येवढेंच नव्हे, तर ‘कथाकलीं’तील उत्तान अभिनयामुळें नि जराश्या असंस्कृत (crude) नृत्यपद्धतीमुळें आणि ‘भरतनाट्यां’तील खटकेदार हस्तविक्षेपांमुळें त्यांत रसच नाहीं असें वाटतें; अर्थात् पुनः पुनः आणि वारंवार तीं नृत्यें पाहत गेल्यास त्यांबद्दलची अभिरुचि हळूहळू वाढत जाते आणि रसास्वादाचें सौख्यहि लाभतें. ‘कथाकलीं’तील मुद्राभिनयाचें शास्त्र तर इतकें विकसित झालेलें आहे कीं नृत्याच्या पार्श्वगीताची भाषा समजत नसल्यास सामान्य रसिकांना त्यांतील संवादाचा आणि कथेचा बोध मुळींच होऊं शकत नाहीं. असें असतांहि ‘ कथक ’ हा नृत्यप्रकार आपल्याकडे बराच आधीं प्रसृत होऊन, बऱ्याच काळपर्यंत नजरेसमोर राहून व गृहराज्याचा उंबरठा ओलांडून समाजाच्या खालच्या थरापर्यंत अधःपतित होत गेल्यानें, ‘कथाकली’ व ‘भरतनाट्य’ हे दक्षिण हिंदुस्थानांतील नृत्यप्रकार नावीन्यामुळें प्रथमपासूनच आपल्याला फार आवडले; व आवडले म्हणजे ते इतके पसंत पडले कीं ‘ जेथें पिकतें, तेथें विकत नाहीं ’ या न्यायाप्रमाणें आपण ‘कथक’ नृत्याला अजीबात विसरलों.

इतरांप्रमाणेंच मींहि ‘कथाकली’ नि ‘भरतनाट्य’ या नृत्यपद्धतींची प्रथम उपेक्षा केली, नंतर त्यांचे कार्यक्रम पाहून नाक मुरडलें, यानंतर माझ्या मनांत त्या पद्धतींविषयीं कुतूहल निर्माण झालें आणि पुढें पुढें तर त्यांतील सौंदर्यरस चाखण्याचें तंत्र उमजल्यावर त्यांचा अभ्यास प्रत्यक्ष करावयास न मिळाल्यास परोक्ष रीतीनें तरी त्यांचा अभ्यास करावासा वाटण्याइतकी आवड माझ्या मनांत निर्माण झाली.

या सुमारास पुण्यामुंबईकडे दाक्षिणेकडील कलावन्त बऱ्याच वेळां येऊन आपापली कला सुटसुटीत नि किंचित् सुधारलेल्या स्वरूपांत जगापुढें मांडूं लागले होते. त्यामुळें हे कार्यक्रम वारंवार पाहून पाहून त्या नृत्यपद्धतींचीं वैशिष्ट्यें माझ्या पूर्णपणें लक्षांत राहिलीं आणि त्यांसंबंधीं लिहिल्या जाणाऱ्या लेखांमुळें त्यांच्या इतिहासासंबंधीं पुस्तकी माहितीहि बरीच मिळाली. पुण्यामुंबईंत पुष्कळ मद्रासी लोक येऊन स्थाईक झाले असल्यानें त्यांच्या म्यूझिकसर्कल्स्-तर्फे हे नृत्यकार्यक्रम होऊन दक्षिणेकडील कलावन्तांना आपल्या कलेच्या प्रदर्शनाला पुष्कळच वाव मिळाला आणि यामुळें या नृत्यपद्धतींची लोकप्रियता वाढून कळसास पोहोंचली, ती इतकी कीं अलीकडे निर्मिलीं गेलेलीं नाट्यनृत्यें किंवा नृत्याचे कार्यक्रम हे ‘ कथाकली ’ किंवा ‘भरतनाट्य’ या नृत्यपद्धतींचीं नृत्यें असल्याशिवाय पार पडणेंच अशक्य झालें. या पद्धतींतील शास्त्र माहीत नसल्यास निदान नृत्याच्या त्या धाटणीचे हस्तपाद–विक्षेप करून प्रेक्षकांना लागलेली दुधाची तहान ताकावर भागविण्याचें काम कलावंत करूं लागले. ‘कथाकली’ नि ‘ भरतनाट्य ’ या नृत्यपद्धतींच्या या उत्कर्षामुळें मला त्या पद्धतींची अतिशय आवड उत्पन्न झाली होती; परन्तु या जमान्यांत निर्माण होऊन रंगभूमीवर आलेल्या ‘चित्रा’सारख्या मशहूर नृत्यनाटकांत ‘ भरतनाट्य ’, ‘ कथाकली ’ नि ‘ मणिपुरी ’ या तिन्ही नृत्यपद्धतींना योग्य तीं स्थानें देऊन ‘ कथक ’-ची योजना तेवढी भलत्याच ठिकाणीं आणि अगदीं नवशिक्या नर्तकाच्या नृत्यांत केल्यामुळें माझें ‘ कथक ’विषयींचें प्रेम जागृत झालें. मोठमोठीं शहरें किंवा सारें जग हिंडून येऊन सुद्धां आपल्या जन्मभूमीबद्दल वाटणारें प्रेम कधींहि कमी होत नाहीं; तद्वत् इतर साऱ्या नृत्यपद्धतींविषयीं आदर वाटला, आवड वाटली तरी ‘ कथक ’विषयींचें प्रेम माझ्या मनांत होतें तसेंच होतें. जें नृत्य मीं प्रथम शिकावयास सुरुवात केली, तें ‘ कथक ’ नृत्य चूक पायावर शिकविलें गेल्यास त्याचें स्वरूप किती गलिच्छ होऊं शकतें आणि त्याउलट सोहनलालजींच्यासारख्या ‘कथक’–विशारदाकडे शिक्षण घेतल्यास त्याच नृत्य–पद्धतीचे विकास आणि उद्धार किती तऱ्हांनीं होऊं शकतात, हे दोन्ही अनुभव मीं घेतले असल्यानें अलीकडे अलीकडे त्या नृत्यपद्धतीची होणारी उपेक्षा मला बरी वाटत नव्हती.

## नृत्यकलेच्या चार खाणी

भारतांतील नृत्यकलेच्या ह्या चार खाणी आहेत. ‘कथाकली’, ‘भरतनाट्य’ आणि ‘मणिपुरी’ या तिन्ही खाणींतून आज जीवनांतील नवनवीं मूल्यें काढण्याचें








काम निरनिराळे ख्यातनाम कलाकार करीत आहेत; अश्या वेळीं भारतांतील रसिकांच्या नजरेस हेंहि आणून देणें जरूर आहे कीं 'कथक'ची खाणहि अगदींच निरुपयोगी झालेली नाहीं. तींतूनहि आजच्या सुधारणेच्या निकषावर पारखून घेऊनहि अमूल्य ठरणारीं मूल्यें निवण्यासारखीं आहेत. वाण आहे ती कर्त्याकरवित्या नि जाणकार कलावन्तांची!

माझ्या वाचनांत आलेल्या नृत्यावरील साऱ्या लेखलेखांकांतून आजपर्यंत 'भरतनाट्य', 'कथाकली' आणि जरा कमी प्रमाणांत कां होईना, पण 'मणिपुरी' ह्या तिन्ही नृत्यपद्धतींना अतिशय नांवाजलें गेलें आहे—तेव्हां असे ते विशिष्ट गुण कोणते हें आपण पाहूं आणि 'कथक'चा अनुक्रम मात्र सगळ्यांत खालीं लावला गेला आहे, तेव्हां त्यांतील ठळक असे दोष कोणते हेंहि आपण नजरेखालीं घालूं.

## शास्त्र आणि कला यांची ताटातूट!

वर सांगितलेल्या ह्या चारी नृत्यपद्धतींतील मूलगामी तत्त्वें भरताच्या नाट्यशास्त्रावर आधारलेलीं आहेत; परंतु त्यांच्या पुढील विकासाला मात्र निरनिराळ्या प्रांतांतील निरनिराळ्या व बदलत्या संस्कारांमुळें निरनिराळीं स्वरूपें प्राप्त झालीं आहेत. 'भरतनाट्य' ही तंजावरच्या देवदासींच्या अनेक पिढ्यांनीं जतन करून ठेवलेली नृत्यपद्धति आणि 'कथाकली' ही केरळ प्रांतांतील नृत्यपद्धति ह्या दोन्ही त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या संस्कृतींसह त्याच प्राचीन स्वरूपांत आज दिसूं शकतात, तसें 'कथक' नृत्यपद्धतीचें नाहीं. इतिहासांतील अनेक संस्कृतींच्या लोकांच्या अनेक आक्रमणांमुळें त्या कलेचें मूळ स्वरूप कसें होतें हें सांगतां येणें कठिण झालें असलें, तरी त्यांतील भारतीय संस्कृतीचे अवशेष कांहीं अगदींच धुऊन गेलेले नाहींत. भरताच्या नाट्यशास्त्रावर आधारलेल्या 'भरतनाट्य' व 'कथाकली' नृत्यपद्धतींत उपयोजिल्या जाणाऱ्या हस्तमुद्रांत आणि 'कथक'मधील हस्तमुद्रांत बरेंच साम्य आहे; परंतु 'कथाकली' हा प्रकार नृत्यप्रकार नसून नाट्यनृत्याचा (Balletचा) एक प्रकार असल्यानें त्या मुद्रांचा उपयोग करीत असतांना आणि त्यांयोगें रामायण, महाभारत, यांसारखीं महाकाव्यें त्यांतील छोट्यामोठ्या प्रसंगांसह सबंध प्रदर्शित केलीं जात असतांना, ती मुद्रांची परिभाषा ज्या ज्या वेळीं क्वचित् अर्थवाही ठरत नाहीं किंवा अपुरी पडते असें कलाकारांना वाटलें, त्या त्या वेळीं आपोआप सूचक आणि स्वेच्छाप्रेरित (arbitrary) अश्या मुद्रा निर्माण करण्यांत येऊन त्या परिभाषेंत भर पडत गेली आणि बोली—भाषेप्रमाणेंच ह्या हावभावयुक्त भाषेच्या द्वारा कोठलाहि विचार मुखांतून एकहि शब्द न उच्चारतां प्रकट करणें हळूहळू शक्य होत गेलें. 'भरतनाट्य' आणि 'कथक' या नृत्यपद्धतींची ही परिभाषा त्या मानानें फारशी विकसित झाली नाहीं; परंतु 'नृत्त' (अभिनयाविना केलेलें नृत्य) मात्र 'कथाकली'पेक्षांहि अधिक वैचित्र्यपूर्ण आणि ढंगदार झालें. नाट्यनृत्य आणि नृत्य असे दोन विभाग केल्यावर 'कथक'मध्यें भावप्रदर्शनाला जास्त वाव नाहीं म्हणून दोष काढणें बरोबर होणार नाहीं.

केरळ प्रांतांतील ही 'कथाकली' नृत्यकला सुसज्ज रंगभूमीऐवजीं उघड्या आकाशाखालीं प्रेक्षकांच्या सान्निध्यांतच आपल्या सौंदर्याचा आविष्कार करीत असल्यानें ती बहुजनसमाजापासून कधींहि दुरावली नाहीं व त्या कलेंतील नाट्य अधिक विकसित व प्रभावी झालें, तेंहि रसिकांच्या नजरेसमोरच; त्यामुळें नृत्यशास्त्र जाणणारे आणि नुसते पाहणारे असे प्रेक्षक वर्गाचे दोन भाग कधींच पडले नाहींत. शास्त्रोक्त नृत्य वारंवार पाहून ओघाओघानेंच जनतेची अभिरुचि वाढली आणि शास्त्र व कला असे दोन विभिन्न विभाग होण्याचा प्रश्नच या नृत्यकलेच्या बाबतींत उत्पन्न झाला नाहीं. 'भरतनाट्या'च्या बाबतींतहि असें म्हणतां येईल कीं ती कला जरी प्रथमपासून देवदासींच्याच हातीं सोंपविली गेली होती, तरी ती संस्था धर्मसम्मत असल्यानें आणि देवभक्ति—देवप्रीति हेंच त्या संस्थेचें ध्येय ठरवून दिलें गेल्यामुळें त्या नृत्यपद्धतीचें स्वरूप न बिघडतां शुद्ध राहिलें आणि ती कला धर्माच्या पार्श्वभूमीमुळें जनतेपासून दूरहि गेली नाहीं. पुढें पुढें तर सुसंस्कृत शिष्टमंडळीच्या कन्याहि हें नृत्य शिकूं लागल्या आणि त्यामुळें 'भरतनाट्या'च्या बाबतींतहि शास्त्र आणि कला यांची ताटातूट होऊं शकली नाहीं.








# 'कथक' नृत्य : सौंदर्यशोध आणि आनंदबोध

ह्याच्या उलट 'कथक' हा नृत्यप्रकार उत्तर हिंदुस्थानवर झालेल्या भिन्नभिन्न संस्कृतींच्या परकीयांच्या अनेक स्वाऱ्यांमुळें आणि उलाढालींमुळें शुद्ध तर राहूं शकली नाहींच, पण उलट त्या कलेनें विलासी स्वभावाच्या मोंगली सरदार–दरकदारांच्या भीतीनें गृहिणींच्या राज्यांतून पलायन करून वारांगनांच्या राज्यांत आपलें ठाण मांडलें; अर्थात् नेत्रसुखाशिवाय दुसरें कसलेंच सुख या राज्यांतील प्रेक्षकांना नको असल्यामुळें 'कथक'च्या पंडितांनीं जगविलेलें शास्त्र तसेंच अडगळींत पडून 'नॉच' (Nautch) हा त्या कलेचा विडंबित प्रकारच जास्त प्रसृत झाला आणि त्यालाच लोक '**कथक नृत्य**' समजूं लागले! येथेंच खरोखर शास्त्राची आणि कलेची फारकत झाली. शास्त्र त्यांतील साऱ्या गुंतागुंतींसह राहिलें पाण्डितजींच्या डोक्यांत आणि कला तिच्या साऱ्या नखऱ्यांसह मिनली ह्या 'नाच'वाल्या कलावन्तिणींच्या अंगीं! आणि याचमुळें ज्यांना 'कथक' नृत्याचें खरें स्वरूप माहीत नाहीं, ज्यांनीं त्याचा खरा रुबाव, त्यांतील लालित्य व त्यांतील गोड आणि सहज अभिनय या बाबी आजपर्यन्त नीट पाहिल्याहि नाहींत, अशांनीं 'कथक नृत्याविषयीं लिहितांना असे उद्गार काढले:— "It is obvious and astounding that the more the technique, the less the gracefulness and sublimity." (Dance of India, by P. Banerji.)

## दोष कलेचा कीं कलावंताचा?

'भरतनाट्य', 'कथाकली' नि 'कथक' या तिन्ही नृत्यपद्धतींचे दोन भाग पडतात : एक '**नृत्त**' आणि एक '**नृत्य**'. 'कथाकलीं'त **नृत्ता**च्या (= हावाभावासहित नृत्याच्या) तन्त्रानें विकासाची पराकोटि गांठली आहे; परन्तु 'भरतनाट्या'चा भर केवळ 'नृत्ता'वरहि नाहीं व केवळ 'नृत्या'वरहि नाहीं—मोजून मापूनच बोलायचें झाल्यास 'नृत्ता'ला 'भरतनाट्यां'त 'कथाकली'पेक्षां अधिक महत्त्व आहे. 'कथक' नृत्यांत 'नृत्ता'ला अभिनयापेक्षां किंचित् अधिक महत्त्व आहे. 'कथक'-मधील 'नृत्ता'चा डौल 'भरतनाट्यां'तल्याप्रमाणें कमानीदार वक्रत्वाच्या वैशिष्ट्यानें झळकणारा किंवा 'कथाकलीं'तील एक प्रकारच्या झुलत्या अंग–विक्षेपांमुळें वेगळाच उठून दिसणारा नसून एका विशिष्ट ताठरपणामुळें मनांत ठसणारा आहे. या तीनहि नृत्यपद्धतींत लालित्य आणि सामर्थ्य ह्या घटकांचा सुरेख संगम झालेला असल्यानें केवळ 'कथक'च्या बाबतींत केलेलें, "Kathak School has mixed up the two styles (Lasya & Tandava i. e. लालित्य नि सामर्थ्य) and the modern spectators laugh behind their handkerchiefs when they see a male dancer with his gorgeous dress attempting to show 'Lasya Nritya' with the crude gestures of a female. On the other hand, there are also the sinuous & vigorous movements of 'Tandava' with a female Kathak dancer." (Dance of India, by P. Banerji.) हें विधान माझ्या मनाला मुळींच पटत नाहीं. कोठल्याहि नृत्यपद्धतीचा मूळ डौल कितीहि सुंदर असला तरी त्या पद्धतीचा आविष्कार करणाऱ्या कलावंताच्या अंगभूत गुणदोषांनुसार त्या कलेला उच्च वा नीच दर्जा येऊं शकतो हें 'कथक' नृत्याला नांवें ठेवणाऱ्या रसिकांच्या लक्षांत येत नाहीं. 'कथक' नृत्यांतील हस्तविक्षेप बॉक्सिंगच्या हातवाऱ्यांप्रमाणें अगर पोहत असतांना करावयाच्या हस्तक्षेपांप्रमाणें असतात असें एकाद्याला वाटलें, तर तो दोष त्यानें पाहिलेल्या त्या विशिष्ट 'कथक'नृत्यकाराचा आहे, 'कथक'नृत्यपद्धतीचा नव्हे, हें ध्यानांत घेणें जरूर आहे. 'कथक'च्या '**नृत्त**' या प्रकारांत पायांतून (पावलांतून म्हणणें अधिक बरोबर होईल) तबल्याच्या बोलांबरहुकूम बोल काढण्याचाहि एक प्रकार मोडतो. ह्यांतहि, 'लास्या'सारखे कांहीं नाजूक म्हणजे केवळ घुंगुरांतून नाद काढण्याचे, तर कांहीं ताण्डव प्रकारांत बसणारे, म्हणजे पावलांतून जोरदार बोल उमटविण्याचे,असे दोन प्रकार आहेत. तालाच्या अर्ध्यापाऊण मात्रांच्या हिशेबांच्या कांड्यांकुड्यांनीं भरलेल्या पाऊलवाटेंतून सहजरीत्या बाहेर येऊन नृत्यकार पदन्यासाचा हा संमिश्र प्रकार सजवीत असतात; ह्यांत नैपुण्य मिळविण्यास बरीच तपश्चर्या लागते; आणि बरीच तपश्चर्या लागते म्हणूनच पुष्कळदां अनेक 'कथक' नृत्याकार ह्या पस्यांच्या करामतीच्या








मेहनतीपायींच आपला घाम सर्वकाळ गाळून 'कथक' नृत्यामधील भावसौंदर्याला अजाणपणें डावलत गेले आहेत आणि त्याचमुळें, **'कथक–पदकृति=शून्य'** असें सर्वस्वीं चुकीचें समीकरण बांधलें जाऊन 'कथक' नृत्यांतील अधिक उच्च व हृद्य असा जो 'भाव आदा' म्हणजे 'कथक'मधील 'अभिनय' त्याचा विभाग आजपर्यंत दुर्लक्षित राहिला आहे. खरें पाहिलें असतां 'कथक' ह्या शब्दाचा अर्थच 'कथा निवेदणारा' असा आहे. अर्थात् कथानिवेदन म्हटलें कीं त्यांत 'नृत्ता'पेक्षां भावप्रकटनाचीच जरूरी अधिक! तेव्हां यावरून असें मनांत येतें कीं पूर्वी 'कथक' नृत्याचाहि नृत्तापेक्षां अभिनयावरच अधिक भर असला पाहिजे; परंतु पुढें 'कथक'नृत्यकारांच्या चुकीमुळें 'कथक'चा मूळ अर्थ लक्षांत न राहून **नृत्तालाच** सारें महत्त्व प्राप्त झालें.

वर वर्णिलेल्या पायाच्या कामांतहि, माझें असें मत आणि माझा थोडाफार असा अनुभवहि आहे कीं पदकृतीला चेहऱ्यावरील भावदर्शनाची थोडीशी जोड कलाकारानें दिली तर तोहि नृत्यप्रकार एरवीं वाटतें तितका रसशून्य आणि सौंदर्यहीन वाटणार नाहीं. 'कथक'ला नांवें ठेवणारा रसिकवर्ग या पदकृतीला (Footworkला) किंचित् तिरस्कारानें 'पायानें तबला वाजविणें' असेंहि म्हणतो; परंतु तबलाहि त्यावर ज्याचा हात फिरेल त्याच्या अंगभूत सरसनीरसतेनुसार बोलका किंवा अबोल राहूं शकतो, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. रसज्ञ तबलजीच्या हातांत तबला 'बोलतो', 'गोड गोड बोलतो', 'गुजगोष्टी करतो', येवढेंच नव्हे तर, 'निरनिराळे भावहि प्रकट करतो.' पायांतून निनादणाऱ्या नि रुमझुमणाऱ्या अनेक बोलांना आणि नादांना चेहऱ्यावरील भावांच्या गोडाव्याची साथ मिळाली तर ?... ... तर 'कथक'मधील याहि नृत्तप्रकाराला नांवें ठेवणें रसिकांना जड जाईल! तबला नि डग्गा यांमध्यें डग्गा अधिक भावप्रकटनक्षम असतो. तबल्याचीच उपमा वापरावयाची तर ही डग्ग्याची भावप्रकटनक्षम बाजू कलाकारानें 'पायानें तबला वाजवीत असतांना' आपल्या मुखावरील भावांनीं संभाळावयाची असते. तेव्हां याहि बाबतींत 'कथक' नृत्यपद्धतीकडे दोष येत नाहीं.

## रसशून्य चमत्कृति कां शिरली?

'कथक' नृत्यांतील नृत्ताचा दुसरा भाग म्हणजे त्यांतील 'सलामी', 'आमद', 'परन' इ. निरनिराळ्या ठेक्यांत लयीच्या अनेक प्रकारांत बांधलेले 'तोडे' किंवा 'तुकडे' होत. हें शास्त्रोक्त नृत्य चालू असतां एक तुकडा संपला कीं दुसरा, तो संपला कीं तिसरा असे एकामागून एक तुकडे कोणत्या तरी एका तालांत नृत्यकार करून दाखवीत असतात. हा नृत्ताचा भाग प्रदर्शित करीत असतांना 'आड,' 'कुआड' इत्यादि लयींचे अनेक (अन् कित्येकदां किचकटहि) प्रकार करून बुद्धीला चकित करून सोडणारें 'कथक'–नर्तकांचें नृत्य पाहून आणि त्यांच्या नृत्यांत नेहमीं आढळून येणारी 'धमार', 'सवारी', 'लक्ष्मी' इत्यादि आडतालांची योजना पाहून कित्येकदां असें वाटतें कीं राजा मानसिंगानें पंधराव्या शतकांत जी 'ध्रुपद-धमार–' गायकी संगीताच्या क्षेत्रावर होत असलेल्या परदेशी आक्रमणावर मात करण्याकरतां निर्माण केली, तिच्याच तन्त्राचें अनुकरण या 'कथक' नृत्यकारांनीं स्वतःच्या नृत्यपद्धतीच्या बाबतींत केलें कीं काय नकळे! गायन–वादन–नृत्यादि ललितकला बहुधा आपआपल्या आश्रयदात्यांच्या मर्जीनुसार नि अभिरुचीनुसार आपला साजशृङ्गार करीत असतात; तेव्हां ध्रुपद–गायकीचें माहात्म्य राजदरबारांत वाढतांच 'कथक'– नृत्यकारांनींहि आपल्या नृत्यांत 'भाव आद्या'ला डावलून 'ताला'शीं खटपट करण्याचीच पद्धत सुरू केली असावी. ध्रुपदधमार गायकीमधील दुप्पट चौपट लयीचे प्रकार, बोल–तानांचे निरनिराळे प्रकार इत्यादि गोष्टी तर 'कथक' नृत्यांत जश्याच्या तश्या दिसतातच, परंतु साऱ्या कलांचें अंतिम ध्येय असा रसपरिपोष विसरून केवळ चमत्कृतिपूर्ण आणि बुध्दीला दिपवणारी तालाची रचना व खटपट करण्याकडे असलेला ध्रुपद–गायकीचा कलहि या नृत्यांत दिसून येतो. 'कथक'नृत्यांत ही रसशून्यता कशी शिरली असावी याबद्दलचा वरील तर्क कलांतर्गत पुराव्यावर आधारलेला आहे. याशिवाय इतर ऐतिहासिक पुरावा असल्यास तो माझ्या वाचनांत तरी अजूनपर्यंत आलेला नाहीं.

# 'कथक' नृत्य : सौंदर्यशोध आणि आनंदबोध

## शरीराचें 'उमलणें'

वरील 'नृत्त'प्रकाराला सुरुवात बहुधा '**थाटा**'नें होते. दोन्हीं हातांची घडी घालून, उजवा पाय चवड्यावर डाव्या पायाच्या मागें टेंकून नृत्यकारानें आपली नजर श्रोत्यांवर रोखली, म्हणजे त्याचा रुबाब, त्याची ऐट काय वर्णावी! तालाच्या ठेक्यानुसार प्रथम केवळ भुवयाच उचलून नर्तक आपल्या अंगांत मुरलेल्या लयीची साक्ष श्रोत्यांना पटवितो. दर वेळेस तालाची सम घेतांना प्रथम दोन मात्रांचा, नंतर चार मात्रांचा, असे मुखडे घेत घेत तो हळूहळू हस्तविक्षेपांना सुरुवात करतो. भुवयांच्या हालचालींना हस्तविक्षेपांची साथ मिळतांच मान थोडीच अचल राहणार! तिचीहि प्रथमतः सूक्ष्म आणि नंतर अधिक स्पष्ट अशी मोठी मनोज्ञ हालचाल सुरू होते. 'भरतनाट्य' नृत्यांत सुरुवातीच्या 'अलारिपु' नृत्यांत (अलारिपु याचा अर्थ उमलणें, flowering असा आहे) नर्तकीचें शरीर अनेक 'करणां'(standing poses)मध्यें नि आविष्कारांमध्यें उमलत असतें असें रसिकजन मोठ्या कौतुकानें वर्णन करतात. 'कथक'मधील 'थाट' हेंहि एक प्रकारचें शरीराचें 'उमलणें'च आहे, हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईलच; त्याचप्रमाणें 'भरतनाट्यां'तील मान, हस्त, पाद आणि नेत्र यांची एकसमयावच्छेदेंकरून होणारी सुंदर हालचाल आणि त्यांतील 'संवाद' हीं वैशिष्ट्यें त्यांतील भाव–सौंदर्याचा नमुना म्हणून गाजलीं आहेत; परंतु खोलांत शिरायचें म्हटल्यास असें सांगतां येईल कीं 'भरतनाट्यां'तील नेत्रांच्या व मानेच्या हालचालींत सौन्दर्य असलें तरी भावसौन्दर्य असेलच असें नाहीं. एकाच वेळीं मान व नेत्र यांची हालचाल करणें हा तालांत बांधलेल्या बोलांचाच एक भाग आहे. तो अभिनय नाहीं, तर ती एकमेकांना पोषक अशी एक तंत्रबद्ध हालचाल आहे. याउलट 'कथक' नृत्यांत जेव्हां जेव्हां या उपांगांची हालचाल घडते, तेव्हां तेव्हां अभिनय अभिप्रेत असतो, भाव–प्रकटनहि अभिप्रेत असतें. अर्थात् हें भावप्रकटन कितपत अर्थवाही होतें हें प्रत्येक नृत्यकाराच्या रसाविष्कारांतील नैपुण्यावर अवलंबून असतें हें सांगायला नकोच! तेव्हां एकाद्या मर्मज्ञ नृत्यकाराच्या 'कथक' नृत्यांतील 'थाट' चालू असतांना वरील उपांगांच्या हालचालींना जो अर्थ येईल त्याचेकडे खरा भावसौंदर्याचा नमुना म्हणून बोट दाखवितां येईल, 'भरतनाट्यां'तील '**नृत्त**' भागांतील उपांगांच्या हालचालींकडे तें श्रेय जाणार नाहीं.

'थाट' संपतां संपतां श्रोत्यांच्या अभिवादनार्थ 'मोंगली छटा' असलेल्या 'सलामी'चे प्रकार करून दाखवून नृत्यकार 'परन', 'आमद' इत्यादि भागांकडे वळतो. 'परन' हें जलद गतीनें धांवणारे व मुळींच विसांवा न घेणारे तोडे, तर 'आमद' हे त्यापेक्षां संथ लयींत निरनिराळ्या लयींच्या प्रकारांची मजा चाखवीत झुलत झुलत जाणारे तोडे! या सर्व प्रकारांची वैचित्र्यपूर्ण मांडणी करण्याची सौंदर्यदृष्टि ज्याला असते, तोच खरा कलावंत! नृत्यकाराची दृष्टि 'कलावंता'ची असली, तर त्याच्या कलेचें मूळचें सौंदर्य खुबीदार मांडणीमुळें द्विगुणित होतें.

## 'तोच–तो–पणा'विषयीं तक्रार!

'कथक'च्या या शास्त्रोक्त नृत्यांतील 'थाटा'-नंतर नृत्यकार जे बोल आस्ते आस्ते लय वाढवीत करीत असतो, त्यांना एका विषयाची (themeची) पार्श्वभूमि नसल्यानें प्रत्येक तुकड्याबरोबर तें नृत्य संपूं शकतें अथवा पुढेंहि चालूं शकतें. यामुळें रसिकांची तक्रार अशी आहे कीं "If the whole thing is properly analysed, there is neither beginning nor end in any Kathak dance. With every 'Bol' or 'Tora', 'the dance finishes and it is mostly repetition work with other 'Bols' or 'Toras' over and over again." —Dance of India, by P. Banerji. हा दोष नीट पाहूं गेलें असतां 'भरतनाट्यां'त आणि 'कथाकलीं'तहि आहे. 'भरतनाट्यां'तील 'अलारिपु' किंवा 'थिलाना' आणि 'कथाकली'–तील 'पुरप्पाद' अगर 'तोडियम्' हीं नृत्यें पाहिल्यास ही गोष्ट स्पष्ट होईल. 'तिरमणम्', 'कलाशम्' नि 'तोडे' हे जेथें येतील तेथें त्यांत साम्य नि 'तोच–तो–पणा' न येणें अशक्य आहे! अर्थात् तयार नि समजदार नृत्यकाराच्या यांपैकीं कोणत्याहि नृत्यपद्धतीच्या नृत्यानें हा सारा 'तोच–तो–पणा' विरून जाऊन त्यांत एक प्रकारचें नावीन्य, चैतन्य








आणि रस येतील, तर त्याउलट कलेची दृष्टि नसलेल्या नर्तकाचें नृत्य (मग तें 'भरतनाट्य', 'कथाकली' अगर 'कथक' कोणतेंहि असो, सारखेंच) रसशून्य दिसेल.

येथें 'कथक' नृत्यांतील 'नृत्तां'चें वर्णन संपलें. यानन्तर या पद्धतींतील 'लास्य' प्रकारच्या अभिनयाला संपूर्ण वाव असणारा '**नृत्य**' भाग '**गत**' आणि '**गतभाव**' पाहूं. ह्या प्रकारांत कृष्णलीलेवर आधारलेले 'छोटे छोटे प्रसंग' किंवा (शब्दशः अर्थ घेतल्यास) 'लघुतम कथा' गुंफलेल्या असतात. ह्या कथाप्रसंगांत अर्थातच फारसें वैचित्र्य नसल्यानें ह्यांतील अभिनयाचें क्षेत्र मर्यादित वाटलें तरी हा दोष संकुचित मनोवृत्तीच्या 'कथक'—नर्तकांकडे जातो. ज्यांची विचारशक्ति प्रगल्भ झाली आहे, ज्यांच्या कल्पनाशक्तीची भरारी अतिशय उंच आहे, अशा नृत्यकारांनीं यांत आपलें मन घातल्यास या क्षेत्राची मर्यादा हवी तितकी वाढवितां येण्याजोगी आहे. 'कथक' नृत्यांतील हें भावसौंदर्याचें दालन आजपर्यंत रसिकांच्या नजरेआड राहण्याला वर निवेदन केलेल्या अनेक घडामोडी व अनेक कलावन्तहि कारण झाल्यामुळें, 'कथक म्हणजे पायांची करामत', 'कथकनृत्य म्हणजे निरर्थक सर्कस' इत्यादि साफ चुकीचीं विधानें रसिकांनीं आजपर्यंत केलीं आहेत, तीं सकारण खोडून टाकण्याची जबाबदारी सान्या जाणकार 'कथक'नृत्यकारांवर पडते. 'जाणकार' म्हटल्यामुळें माझ्यावर ती जबाबदारी येत नसली तरी, त्या नृत्यपद्धतीचा अभ्यास अत्यन्त आवडीनें करणारी एक या नात्यानें मजवर येणारी जबाबदारी मीं अंशतः संभाळली आहे. 'कथक' नृत्याची तरफदारी करतांना क्वचित् इतर नृत्य—पद्धतींतील दोष दाखवावे लागले आहेत, ते दुसऱ्याची कुचेष्टा करून स्वतःची प्रतिष्ठा वाढवावयासाठीं मात्र नव्हेत, हें चाणाक्ष वाचक लक्षांत घेतीलच.

---

जयंत्या, वाढदिवस आणि उत्सवसमारंभ यांचा इतका अतिरेक झाला आहे कीं, आपलीं मनें चैतन्यमय व प्रफुल्लित न होतां आपण केवळ कर्मकांडाची कसरत करीत आहों कीं काय असें वाटूं लागतें.

कर्म, भक्ति, यज्ञ आणि दान या सर्व गोष्टींचा भगवद्गीतेंत सविस्तर ऊहापोह केलेला असून, त्याच क्रिया, सात्त्विक, राजस किंवा तामस कश्या होऊं शकतात यांचेंहि विवेचन त्यांत केलेलें आहे.

गांधीजयंती देखील आपण अहंमन्यतेनें पाळली तर ती सुद्धां तामस होऊन केवळ निरर्थकच नव्हे तर विघातकहि ठरेल. पण आपण मनांत आणलें तर, तीच एक तात्त्विक व आत्मार्पणपूर्वक केलेली उपासनाहि होईल. म्हणून भक्तीला भलतेंच वळण देऊन व गांधीजींना देव बनवून त्यांच्यांतील प्रेरकत्वाला आणि साधुत्वाला आपण मुकून बसतां कामा नये.

सूडभावनेला प्रभावी होऊं देणें हें गांधीजींच्या शिकवणुकीविरुद्ध आहे. 'आपण बलिष्ठ झालें पाहिजे, दुबळें नव्हे; पण द्वेषाची परतफेड द्वेषानें करणें हा केवळ निर्बुद्धपणा होय. आपणांत खरोखरींच तळमळ असेल तर, प्रेम प्रभावी होऊन त्याचाच द्वेषावर विजय होईल' अशी गांधीजींची शिकवण होती. ती स्वीकारणें किंवा नाकारणें आपल्यावर आहे. ती स्वीकारून आपण तिचें प्रत्यक्ष आचरण केलें पाहिजे. आपण त्यांच्या नांवाचे किंवा मूर्तीचें देव्हारे माजवितां कामा नये. ज्या मार्गानें आपण जावें अशी गांधीजींची इच्छा होती, त्या मार्गापासून आपण सर्वच—व्यक्ती काय, संस्था काय किंवा सरकार काय—दूर असलों, तरीं त्यांनीं दाखविलेल्या ध्रुव–बिंदूवर आपलें लक्ष ठेवून आपण सारखा त्या मार्गाकडे जायचा प्रयत्न केला पाहिजे.

— **श्री. चक्रवर्ती राजगोपालाचार्य,** (गांधीजयंतीनिमित्त संदेश) २–१०–'४८.



अनुक्रमणिका








प्रा. के. रा. कानिटकर

# पुणें-विश्वविद्यालयाचा दर्जा

अस्तित्वांत येत असलेल्या पुणें-विश्वविद्यालयानें आपला दर्जा उच्च ठेवावयाचा आहे. त्यांतून बाहेर पडणारा प्रत्येक सन्मान्य पदवीधर ( Honours Graduate ) असा निपजला पाहिजे कीं आवडत्या विषयांत संशोधन करण्याचें सामर्थ्य त्यास पहिली पदवी घेतल्यानंतर एक वर्षाच्या अभ्यासानें प्राप्त झालें पाहिजे. हा अभ्यास बहुंशीं संशोधन करण्याच्या मार्गांचा राहील. असे पदवीधर तयार होण्यास काय काय गोष्टी अस्तित्वांत आणल्या पाहिजेत याचें विवेचन करावयाचें आहे.

## 'सन्मान्य' पदवी( Honours Degree )करतां विद्यार्थ्यांची शिक्षण-पद्धति

पास झालेल्या कायद्याप्रमाणें नव्या विश्वविद्यालयानें साधे व सन्मान्य पदवीचे अभ्यास-क्रम शिकवावयाचे आहेत. त्यासंबंधीं पहिली गोष्ट म्हणजे सन्मान्य पदवीच्या विद्यार्थ्यांना सामान्य विद्यार्थ्यांत बसवून शिकवितां कामा नये, त्यांचे वर्ग निराळे ठेवले पाहिजेत. अनुभव असा आहे कीं मिश्र वर्ग शिकविणें झाल्यास अति खालच्या पायरीवरून तो शिकवावा लागतो. त्यामुळें हुषार विद्यार्थ्यांची सर्वतोपरी कुचंबणा होते. ज्या गोष्टी विद्यार्थ्यांवर सोंपविल्या असतां हुषार विद्यार्थ्यांना पार पाडतां येतात, त्या गोष्टी सामान्य विद्यार्थ्यांना जड जातात.त्यामुळें हुषार विद्यार्थ्यांच्या वेळाचा पुष्कळ अपव्यय होतो. हा अपव्यय टाळणें अतिशय महत्त्वाचें आहे. मिश्र वर्गांत शिकविलेच पाहिजेत असे भाग सन्मान्य पदवीकरतां अभ्यास करणारांना सहज समजणें शक्य असल्यामुळें मिश्रवर्गांत या विद्यार्थ्यांचें नुकसान होतें. ज्या कांहीं गोष्टी विद्यार्थ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें कराव्या त्या गोष्टी हुषार विद्यार्थ्यांकडून नुसत्या सूचनेनें करून घेतां येतात व त्यामुळें वर्गांच्या काळाचा अपव्यय थांबवितां येतो.

सामान्य पदवीचा काल दोन वर्षें असावा. त्यामानानें सन्मान्य पदवीचा काल तीन वर्षें ठेवावा लागेल.

सामान्य पदवी व सन्मान्य पदवी यांतील अभ्यासक्रमांत फार मोठा फरक ठेवला पाहिजे. सामान्य पदवीच्या अभ्यासक्रमांत जर बरेच विषय ठेवावे लागले तर ते दर्ज्यानें बरेच खालच्या पायरीचे राहतील. परंतु सन्मान्य पदवीचे अभ्यासक्रम उच्च दर्ज्याचेच ठेवून त्यांत परिपोषक विषयांचा समावेश आवश्यक करावा लागेल.

सन्मान्य पदवीचे अभ्यासक्रम शिकविण्याची पद्धति फार वेगळी करावी लागेल. तीमध्यें विद्यार्थ्यांकडून स्वावलंबनाची कांस धरली जाईल अशी योजना करावी लागेल. अशा विद्यार्थ्यांनीं केव्हांहि मदत मागितल्यास ती त्यांस मिळालीच पाहिजे; परंतु त्यांच्या डोक्यांत केवळ ज्ञान कोंबण्याचे प्रयत्न होतां कामा नयेत.

अशा तऱ्हेनें शिक्षण द्यावयाचें झाल्यास ग्रंथालयाची सोय फार निराळ्या तऱ्हेनें करावी लागेल. अगदीं 'अद्ययावत' सर्व ग्रंथ व नियतकालिकें ग्रंथालयांत असलींच पाहिजेत; इतकेंच नव्हे तर कांहीं कांहीं ग्रंथांच्या तर अनेक प्रती ग्रंथालयांत उपलब्ध झाल्या पाहिजेत. त्याबरोबरच ग्रंथालयांतच बसून अभ्यास करण्याचीहि सोय करावी लागेल. सन्मान्य पदवीकरितां अभ्यास करणाऱ्यांना व्याख्यानें थोडीं पण उद्बोधक व भरीव अशींच मिळालीं पाहिजेत. या विद्यार्थ्यांचा बराचसा काळ स्वतः वाचन करणें, प्रयोग करणें वगैरेंतच गेला पाहिजे.








असें करीत असतांना वेळोवेळीं त्यांनीं मदत मागितली तर मात्र ती त्यांना मिळण्याची सोय केली पाहिजे. शिक्षकांनीं विद्यार्थ्यांना 'भरवितां' कामा नये याबद्दल विशेष काळजी घेतली पाहिजे.

सन्मान्य पदवीच्या वर्गांत घेण्यापूर्वी विद्यार्थी योग्य दर्जाचा आहे कीं नाहीं याची पारख केली पाहिजे. विद्यार्थ्याला वर्गांत घेतल्यानंतर कांहीं कालानें जर असें आढळून आलें कीं त्याच्या हातून योग्य तऱ्हेनें काम होत नाहीं, तर त्याला तावडतोब वर्गांतून कमी करण्याची खबरदारी घेतली पाहिजे. तसें न केल्यास सर्व योजनेचा विचाड होईल हें खास. असो.

## सन्मान्य पदवीकरितां आवश्यक अशा अभ्यास–क्रमाचें दिग्दर्शन

आतां निरनिराळ्या विषयांतील सन्मान्य पदवीच्या अभ्यासक्रमांबद्दल (निदान कांहीं विषयांत ते कसे असावे याबाबत) दिग्दर्शन खालीं कांहीं उदाहरणें देऊन केलें आहे. प्रत्येक विषयाच्या अभ्यास–क्रमांत मुख्य विषय एक व त्यास परिपोषक किंवा सहायक बाकीचे अशी विषयांची मांडणी केली आहे. तीवरून सन्मान्य पदवीकरतां लागणाऱ्या अभ्यासक्र-माचा व तो पार पाडूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांचा दर्जा किती उच्च अपेक्षिला आहे याची कल्पना येईल.

निरनिराळ्या विषयांचे अभ्यासक्रम देण्यापूर्वी सर्वांना सामान्य असा एक विषय ठेवावा लागेल. तो म्हणजे सामान्य तत्त्वज्ञान ( General Philo. sophy ). ह्या विषयाचा आवांका सांगणें इष्ट आहे. ह्या विषयांत शास्त्राचीं मूलतत्त्वें व अभ्यासाचींहि मूल–तत्त्वें येतील. Deductive व Inductive Logic तर ह्यांत येईलच; परंतु Metaphysicsचा स्थूल भागहि ह्यांत समाविष्ट करावा लागेल. कोणत्याहि विषयाचा अभ्यास उत्तम रीतीनें होण्यास ह्या विषयाची फार मदत होईल.

खालीं कांहीं मुख्य विषय व त्यांचे सहायक विषय उदाहरणादाखल दिले आहेत:–

१ **मुख्य विषय**—Botany.

**सहायक विषय**—Zoology, Bio—Chemistry, Geology, Drawing, Elementary Course in Gardening, Soil-preparation, Elementary Glass-blowing, Colloidal Chemistry.

२ **मुख्य विषय**—Zoology.

**सहायक विषय**—Bio-Chemistry, Bio-Physics, Colloidal Chemistry, Drawing.

३ **मुख्य विषय**—Geology.

**सहायक विषय**—Mathematics, solid Geometry, Dynamics, Botany, Zoology, Drawing, Inorganic Chemistry, Methods of grinding & polishing rocks and minerals, Elementary Carpentry.

४ **मुख्य विषय**—Physics.

**सहायक विषय**—Chemistry, Mathematics, Manual Training, Carpentry, Lathework, Glass blowing, Tinman's work including soldering.

५ **मुख्य विषय**—Chemistry.

**सहायक विषय**—Physics, Mathematics, Elementary Biology, Geology, Glass—blowing, Elementary Drawing.

६ **मुख्य विषय**—Marathi.

**सहायक विषय**—Prakrits, Sanskrit ( Classical Literature ), Philology ( comparative ), Six Systems of Indian Philosophy, English ( short story, personal essay and other forms of literature ), Hindi or Gujarathi ( History of Literature ).

७ **मुख्य विषय**—Sanskrit.

**सहायक विषय**—Marathi ( मराठी वाङ्मयाचा इतिहास, प्राचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास.) German, Vedic Period, Principles of Sociology ( Ethnology ), Philosophy— (i) History of Philosophy. ( ii ) Ultimate concepts in Philosophy, Prakrits—Pali, Ardhamagadhi, Sauraseni and Maharastri.

वर केवळ उदाहरणादाखल कांहीं विषय त्या त्या सहायक विषयांसकट मांडून दाखविले आहेत. इतर विषयांचे त्यांच्या त्या त्या सहायक विषयांसकट अभ्यासक्रम तज्ज्ञांना तयार करतां येतीलच.








तसेंच हरएक विषयासंबंधीं त्याच्या पोषक विषयांची यादी परिपूर्ण झालेली आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. तींत फेरफार सुचविणेंहि शक्य आहे. मुख्य मुद्दा म्हणजे ज्ञानाचा दर्जा उच्च राखण्याच्या दृष्टीनें त्या त्या विषयाचें सांगोपांग ज्ञान मिळविण्याचें सामर्थ्य विद्यार्थ्यांच्या अंगीं आणणें हा आहे.

## सन्मान्य पदवीच्या विद्यार्थ्यांची परीक्षापद्धति

सन्मान्य पदवीच्या विषयांची परीक्षा घेण्याची पद्धत बरीच निराळी ठेवावी लागेल. लेखी परीक्षा तर घ्यावी लागेलच; शास्त्रीय विषयांत Practicals-ची परीक्षाहि अवश्यच आहे; परंतु येवढ्यांवरून विद्यार्थ्यांचा खरा मगदूर समजत नाहीं असा अनुभव आहे. ही अडचण टाळण्याकरतां सूचना अशी कीं हरएक विद्यार्थ्यांची तोंडी परीक्षा घेतली पाहिजे. ह्या तोंडी परीक्षेंत विषयांतील निरनिराळ्या भागांसंबंधीं त्याचें वाचन किती आहे हें ग्रंथालयाच्या साहाय्यानें ताडून पाहावें लागेल. ही परीक्षा एकदोघांनीं न घेतां पांचसहा परीक्षकांच्या मंडळानें घ्यावी. त्याकरतां ही परीक्षा अवश्य त्या दीर्घ कालापर्यंत चालेल. प्रत्येक विषयाच्या परीक्षक–मंडळांत निम्मे सभासद बाहेरून आणणें अवश्य आहे.

मुख्य विषयाची परीक्षा तीन वर्षांच्या शेवटीं व्हावी; परंतु सहायक विषयांची परीक्षा पहिली टर्म संपल्यानंतर त्या विषयांतील अभ्यास पुरा झाला आहे असें सर्टिफिकेट शिक्षकानें दिल्यास केव्हांहि घेतां यावी अशी योजना असावी व अशा सर्व पोषक विषयांत परीक्षा उत्तीर्ण झाल्याशिवाय मुख्य विषयाच्या परीक्षेस बसण्यास परवानगी मिळतां कामा नये. हरएक पोषक विषयांत पास होण्यास विद्यार्थ्यानें त्या विषयांत शेंकडा ८० मार्क तरी मिळविले पाहिजेत असा निर्बंध असावा. पोषक विषयांचा दर्जा काय असावा हें विषयनियामक तज्ज्ञ–समितीनें ठरविलें असलें पाहिजे असें गृहीत धरलें आहे.

ह्या प्रकारें योजना केल्यास व साधी पदवी अलग करून सामान्य विद्यार्थ्यास ती दोन वर्षांत मिळविण्यास अति त्रास पडूं नये अशी खबरदारी घेतल्यास विश्वविद्यालयाची इभ्रत योग्य दर्जाची राहील असा भरंवसा वाटतो.

## कांहीं संभाव्य आक्षेप व त्यांचें निराकरण

ह्या विषयासंबंधीं कांहीं मित्रांशीं बोलत असतां त्यांनीं कांहीं आक्षेप घेतले; पहिला आक्षेप असा कीं ह्या सन्मान्य पदवीच्या अभ्यासक्रमांत ज्या तऱ्हेनें मुख्य विषय व त्याचे सहायक विषय यांची मांडणी केली आहे तीवरून असें दिसतें कीं ह्या पदवीधराच्या ठिकाणीं सर्वज्ञता आणण्याची ही केवळ अशक्यप्राय खटपट आहे! ह्यास उत्तर असें कीं कोणत्या तरी एका विषयांत शक्य असल्यास प्रत्येकानें 'सर्वज्ञता' मिळवावी हेंच ध्येय विश्वविद्यालयानें आपल्या पुढें ठेविलें पाहिजे. मनुष्य एकेक विषयांत तज्ज्ञ झाला तर तो आपल्या ज्ञानाचा संशोधनाकडे उपयोग करील असा संभव उत्पन्न होतो. विश्वविद्यालयानें हा असा संभव उत्पन्न करणें हेंच त्याचें खरें काम आहे. सन्मान्य पदवी घेणारा हरएक माणूस संशोधन करीलच असें जरी नसलें, तरी ह्या पदवीधरांतून संशोधन कार्याला वाहून घेणारे लोक मिळतील, असा जास्त संभव आहे.

दुसरा आक्षेप असा घेण्यांत येतो कीं या अभ्यास–क्रमामुळें विद्यार्थ्यांवर जास्त बोजा पडून त्यांची चिकित्साशक्ति नाहींशी होण्याचा संभव फार. परंतु यावर उत्तर असें कीं Intermediate-पर्यंतच्या अभ्यासक्रमांत बहुविध विषयांचा प्राथमिक अभ्यास झालेला असतोच. त्यामुळें पुढें जास्ती बोजा होण्याचा संभव नाहीं व एकाच विषयांत प्राविण्य मिळवावयाचें म्हणजे त्या विषयांतील चिकित्साशक्ति वाढवावयाची असाच या अभ्यासक्रमाचा हेतु आहे.

तिसरा आक्षेप असा कीं सन्मान्य पदवी बहुसंख्य लोकांना मिळणें दुरापास्त होईल; या आक्षेपांत कांहींच अर्थ नाहीं. बहुसंख्य लोकांची बुद्धि तीक्ष्ण व अभ्यास करण्यास पुरेशी परिश्रमशील आढळेल तर त्यांनाहि सन्मान्य पदवी कां मिळूं नये? परंतु विशेष अभ्यास न करतां व बुद्धि तीक्ष्ण नसतां सन्मान्य पदवी मिळाली पाहिजे असा जर या आक्षेपाचा अर्थ असेल तर तो अर्थ आम्हांस मान्य नाहीं.

आणखी एक आक्षेप असा कीं इतर विश्वविद्यालयांतून सन्मान्य पदवीविषयीं अशाच प्रकारची योजना आहे का? व ती तशी असल्यास कोठें

कोठें आहे ? असा एक आक्षेपगर्भ प्रश्न व्यवहार्यतेच्या दृष्टीनें विचारला जातो. ह्यास उत्तर असें कीं इंग्लंडमधील केंब्रिज व ऑक्सफर्ड आणि अमेरिकेंतील हार्वर्ड वगैरे प्रसिद्ध विश्वविद्यालयांतून बहुंशीं ह्यासारखीच योजना असली पाहिजे आणि ती तशी आहे हें मीं प्रत्यक्ष पाहिलेलेंहि आहे. परंतु त्या माहितीचा उत्तर म्हणून मी उपयोग करूं इच्छीत नाहीं. उलट मला असें म्हणावयाचें आहे कीं आपणांस कोणत्या दर्जाचे पदवीधर पाहिजेत, हें आपणांसच ठरवितां यावयास नको काय ? केवळ दुसरीकडे अमुक एक गोष्ट असेल तरच ती आपल्याकडे चालू करावयाची अशी विचारसरणि अवलंबावयाची कीं काय ? स्वतः हिंदी लोकांनीं आपणांस इष्ट वाटतील त्या गोष्टींचा विचार करण्यास शिकावयाला नको काय ? हरएक गोष्टीबद्दल माहिती मिळवूं नये, असें माझें म्हणणें नाहीं. परंतु परधार्जिणी मनोवृत्ति मात्र आतां सोडून दिलीच पाहिजे. आपणांस काय पाहिजे, काय नको, याची छाननी करून आपणच काय तें ठरविलें पाहिजे. चिकित्सकानें माहिती मिळविली तर त्यास असें आढळून येईल कीं कोणत्याहि प्रसिद्ध विश्वविद्यालयांत कोणतीहि सन्मान्य पदवी मिळविण्याकरतां अतिशय श्रम करावे लागतात व एकाच विषयाचा जवळजवळ परिपूर्ण अभ्यास करून शक्य असल्यास संशोधन सुद्धां करावें लागतें. असो.

तात्पर्य येवढेंच कीं, आपल्या नव्या विश्वविद्यालयाचा दर्जा मुंबई–विश्वविद्यालयाच्या सध्यांच्या दर्ज्यापेक्षां फारच उच्च राहिला पाहिजे.

---

शांतता हें आमचें ब्रीद असून त्याबद्दल आम्ही अभिमान बाळगीत आलों आहों. म्हणून आपण युद्धाचें साहित्य गोळा करायला लागून युद्धाकरतां सुसज्ज होणें हें जरा चमत्कारिकच वाटेल; पण तें इतकें चमत्कारिक नाहीं. या जगांत ज्या देशाला आपलें स्वातंत्र्य टिकवावयाचें असेल, त्याला बलाढ्य झालेंच पाहिजे. आम्हां हिंदवासीयांना दुसऱ्यांवर आक्रमण करावयाचें नाहीं. आम्हांला स्वतःला स्वातंत्र्य–स्वतंत्र संधि व स्वतंत्र जीवन पाहिजे आहे, त्याचप्रमाणें तें इतर देशांना व इतर लोकांनाहि लाभावें अशीच आमची इच्छा आहे. आम्हांला लोकशाहीच्या आड यायचें नाहीं. सर्व जगभर शांतता नांदावी, अशीच आमची मनीषा आहे. युद्धानें किती भयंकर नाश केला आहे आणि केवढे गहन प्रश्न निर्माण केले आहेत, याची कल्पनाहि करणें भयंकर आहे.

म्हणून शांतताप्रिय मनुष्य या नात्यानेंच मी या 'क्रूझरा'चें स्वागत करीत आहें. हें 'क्रूझर' युद्धाचें प्रतीक आहे हें खरें; पण केवळ शांतता टिकवून ठेवण्याकरतांच आवश्यक असें तें युद्धाचें प्रतीक आहे. जर दुर्दैवानें आमच्या स्वातंत्र्याला धोका येणार असेल, तर जो देश किंवा जी व्यक्ति आमच्या आड येत असेल त्या तिच्याशीं आम्हांला आमचें सर्व बळ एकवटून नाइलाजानें लढावेंच लागेल.

आमचा हेतु दुसऱ्यांवर अरेरावी करण्याचा नाहीं. केवळ आमचें स्वातंत्र्य टिकवावें येवढाच आमचा हेतु आहे व त्याकरतां दुर्दैवानें आम्हांला युद्ध करावेंच लागलें तर देशाच्या नांवाला डाग लागेल असें कांहींहि आम्ही करणार नाहीं. आमची दाक्षिण्यबुद्धि सतत जागृत राहील. आम्ही एका महान् देशाचे पुत्र आहों. आम्हांला मोठ्या उज्ज्वल परंपरेचा वारसा आहे. पण त्याबरोबरच गेल्या कांहीं वर्षांत आमच्यांत कांहीं दोष देखील उद्भूत झाले आहेत, हेंहि खरें. आहे ते तर आम्हीं काढून टाकलेंच पाहिजेत; पण आज आपल्यापुढें एक आद्य कर्तव्य आहे : देशांत ऐक्य नांदेल याकरतां प्रयत्नांची पराकाष्ठा करणें.

—पं. जवाहरलाल नेहरू, १५।९।'४८ ('दिल्ली'चें स्वागत करतांना.)



अनुक्रमणिका








श्री. दा. गो. देशपांडे

# टीकाकार टागोर

टीकाकार टागोर हा शब्द-प्रयोग 'कादंबरीकार राधाकृष्णन्'सारखा विसंगत वाटणें स्वाभाविक आहे. आणि त्याला स्वतः रवीन्द्रनाथ टागोरच जबाबदार आहेत. कारण, गुरुदेव टागोरांनीं सर्व विषयांवर लिहिलें नि तें अतिशय सुंदर लिहिलें. यामुळें झालें काय, कीं टागोरांनीं साहित्यसृष्टीला रम्य फुलांनीं भरलेली जी परडी अर्पण केली तींतील दर्शनी फुलें तेवढींच जगाला ठसठशीतपणें दिसलीं. काव्य, कथा आणि कादंबरी हीं तीं नेत्रदीपक सुमनें होत. याचा परिणाम असा झाला कीं, परडींतील तळचीं मोहक पुष्पें मात्र उपेक्षित राहिलीं. टागोरांचें टीकावाङ्मय यापैकींच होय. परंतु हें झालें सर्व–सामान्य वाचकांच्या दृष्टीनें. यांत ना टागोरांचा दोष ना वाचकांचा. कारण, सर्वसाधारण वाचक हा कांहीं संशोधनाच्या बैठकीवरुन वाचीत नाहीं व त्यानें तसें वाचावें अशी अपेक्षाहि नसते. अशी अपेक्षा असते रसिक, टीकाकारांकडून. कारण, वाचकांचें जें मार्गदर्शन होत असतें तें टीकाकारांच्यामुळें आणि त्यांच्या साहाय्यानें. गंमत अशी कीं टागोरांची टीका–काराची भूमिका सर्व लोकांच्या नजरेसमोर न येण्याचें कारण म्हणजे हे टीकाकारच ! कांहीं टीका–कारांनीं तर टागोरांच्या टीकावाङ्मयाला टीकावाङ्मय म्हणावयाचेंच नाकारलें आणि अजूनहि ते नाकारीत आहेत ! याचीं कारणें दोन आहेत : एक असें कीं हे टीकाकार बहुतेक आंग्लाळलेले आहेत व म्हणूनच त्यांची टीका परप्रेरित असते. त्यांच्या डोक्यांत इंग्रजी ग्रंथकर्त्यांच्या ( आणि फार फार तर संस्कृत साहित्यकारांच्या ) उक्तींची आणि विचारांची गर्दी झालेली असते. त्यांची लेखणी बोलते ते जातिवंत टीकाकाराचे उद्गार वाटत नाहींत. दुसरें असें कीं हे टीकाकार टीका हा सर्वस्वी बौद्धिक व्यापार मानणारे असतात. यांत भर म्हणूनच कीं काय कोण जाणे, पण आमच्या टीकाकारांत असेहि कांहीं आहेत कीं त्यांना (ललित) साहित्यांत कांहींहि मौलिक करतां आलें नाहीं, म्हणून ते टीकाकार झाले !

**टीकाकार सहृदय असावा लागतो**

वास्तविक टागोर हे ज्याप्रमाणें जीवनाचे एक थोर व कलावंत भाष्यकार होते, त्याप्रमाणेंच ते एक हाडाचे टीकाकारहि होते. तसेंच पाहिलें तर प्रत्येक खरा ललित–लेखक हा थोडयाफार प्रमाणांत प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष टीकाकार असतोच. टागोरांनीं आपल्या कथा, कादंबऱ्या, एकांकिका आणि आपलीं नाटकें यांत तर आपल्या टीकेचा सुसंवादी सूर मिसळून दिलाच, पण याखेरीज टीका या स्वतंत्र सदरांत पूर्णांशानें घालतां येण्यासारखें अस्सल टीका–साहित्यहि निर्माण केलें व नुसतें निर्माणच केलें असें नव्हे, तर तें अभिजात नि मौलिक घडावें याची पुरेपूर दक्षताहि घेतली ! मात्र असें करतांना त्यांनीं टीकेचे नियम धुडकावून लावले; त्यांनीं वाङ्मयाच्या इतिहासांतील आदर्श टीका आणि टीकाशास्त्र पाहिलीं नाहींत असें नव्हे. टागोरांचा वाङ्मयाचा व्यासंग फार दांडगा होता. 'मॉडर्न रिव्ह्यू'चे संपादक कै. रामानंद चतर्जी यांनीं टागोर ज्या विषयां-वरील पुस्तकें वाचीत त्या विषयांची यादीच एक पानभर दिली आहे ! टागोरांचें वाचन अगदीं शेवटपर्यंत चालू होतें. जगांतल्या सुंदर साहित्याशीं त्यांचा निकट परिचय होता. पण येवढें अध्ययन करुनहि स्वतंत्र मतप्रदर्शन करण्याची क्षमता त्यांनीं आपल्यांत राहूं नि टिकूं दिली. किंबहुना, स्वतः उत्तम टीका लिहून त्यांनीं पूर्वींच्या टीकांतील उणिवा दाखवून दिल्या. याखेरीज त्यांनीं पूर्वींच्या टीकाका-रांच्या पुढें एक पाऊल टाकलें. जें पूर्वींच्या टीका--







कारांना करतां आलें नाहीं तें टागोरांनीं केलें. टीकेचे नियम टागोरांनींहि मानले; पण ते मनांत नेहमीं वागवून होते कीं जीवन हें चैतन्यमय आहे, तें सारखें बदलतें आहे, विकसत आहे व या जीवनाचाच रतीब साहित्याला असतो; म्हणून साहित्यहि बदलणार, वाढणार अर्थात् त्याचे नियम साचेबंद असून चालणार नाहीं. म्हणून कोणत्याहि आदर्श टीका–शास्त्राच्या नियमांपेक्षां टीका–शास्त्राच्या आशयालाच महत्त्व असतें नि असावें. आणि हा आशय मानवी जीवनाशीं विसंगत किंवा विसंवादी असत नाहीं, असून चालत नाहीं. कारण, मानवी जीवन हें मानवी मूल्यांवर चाललेलें असतें व हीं मूल्यें अंतिम मूल्यें असतात. हीं अंतिम मूल्येंच टीकेच्या आशयांत तेज आणि ओज ओतीत असतात. टीकाकाराला ह्याचें ज्ञान झालें तरच तो टीकाकार बनूं शकतो. नाहीं तर तो केवळ तंत्राची कसरत करूं लागतो: तो शब्द बोलतो व ते शब्द चांगले असतात; पण त्या शब्दांना जीवनांत अर्थ नसतो. आजच्या बहुतेक टीकाकारांचें असें झालें आहे. टागोरांच्या प्रतिभेंत मानवाच्या अंतिम मूल्यांचें अमर संगीत अहोरात्र घुमत होतें. 'कुमारसंभव' आणि 'शाकुंतल'या महान् ललितकृतींवरच्या टीकेंत टागोरांनीं जे उद्गार काढले आहेत, त्यांवरून हें चांगलें लक्षांत येईल. या टीकेच्या ओघांत ते म्हणतात, "शकुंतलेला जेव्हां आतिथ्यधर्म म्हणजे कांहींच नाहीं, सगळा काय तो दुष्यन्तच' असें झालें, तेव्हां तिच्या त्या प्रेमामध्यें कल्याणमयता राहिलीच नाहीं. जें उन्मत्त प्रेम प्रियजनाशिवाय इतरांना विसरून जातें, तें समस्त विश्वधर्माच्या विरुद्ध वागतें; म्हणूनच असलें प्रेम थोडक्या दिवसांतच नकोसें होऊन जातें. सर्व जगाला तुच्छ लेखून स्वतःचेंच स्तोम माजवून राहणाऱ्या प्रेमाला पुढें पुढें आपलाच भार पेलेनासा होतो; पण जें प्रेम स्वतःला बाजूला सारून जगाच्या संसाराशीं मिळून असतें, जें स्वतःच्या भोंवतालच्या लहानमोठ्यांना तसेंच आपपरांना विसरत नाहीं, जें प्रियजनांना मध्य–बिंदु कल्पून विश्वपरिघापर्यंत स्वतःचें मंगल माधुर्य फैलावतें, त्याच्या अचलपणावर देव किंवा मानव कोणीहि आघात करूं शकत नाहींत आणि कोणीं केला तरी तें विचलित होत नाहीं. परंतु जें प्रेम यतींच्या तपोवनांत तपोभंगानें प्रकट होतें आणि गृहस्थाश्रमी जनांच्या गृहांत गृहस्थ–धर्माचा अकल्पितपणें पराभव करून उभें राहतें, तें प्रेम झंझावाताप्रमाणें दुसऱ्यांचा नाश तर करतेंच, पण त्याबरोबरच स्वतःवरहि नाश ओढवून घेतें."

आणि अशी टीका करीत असतांना टागोरांनीं असेंहि नाहीं मानलें कीं टिका हा सर्वस्वी बौद्धिक व्यापार आहे. टिकाकार हा सहृदय असावा लागतो. वाचीत असलेल्या कृतीशीं त्याला समरस होतां आलें, तरच तिचा स्वाद तो घेऊं शकेल. समरस होणें हें बुद्धीपेक्षां हृदयाचें कार्य आहे. तेथें केवळ तर्काचें आधिष्ठान राहिल्यास त्यांतल्या सौंदर्याचें रसग्रहण होणारच नाहीं. खुद्द टागोरांनींच ज्या ठिकाणीं निव्वळ बुद्धिवादाचा प्रभाव असतो त्याचें वर्णन ' A mind all logic is like a knife all blade. It makes the hand bleed that uses.' असें केलें आहे. आमच्या बऱ्याच टीकाकारांचें असें झाल्यामुळें त्यांच्यांत नुसत्या सहानुभूतीचाच अभाव दिसतो असें नव्हे, तर त्यांना कोठेंहि चांगलें दिसतच नाहीं ! या ठिकाणीं ब्रह्मदेवाच्या एका गोष्टीचें स्मरण होतें. जग निर्माण करावें असें ब्रह्मदेवाला वाटलें. त्याप्रमाणें करावयाच्या अगोदर त्याच्या मनांत आलें, ' आपल्या कामांतील बरेंवाईट सांगणारा कोणी तरी पाहिजे.' म्हणून त्यानें याकरतां टीकाकार निर्माण केला व मग तो आपल्या कामास लागला. तो एक एक वस्तु बनवीत गेला आणि टीकाकार तिच्यांतली चूक दाखवून आपल्या जन्माचें सार्थक करूं लागला. टीकाकाराच्या चांचणीपुढें बिनचूक म्हणून कांहीं निभेचना. ' हत्तीला वर पाहतां येत नाहीं, उंट वरच पाहतो, गाढवांत चपळपणा नाहीं, माकड अचपळ ' अशा रीतीनें टीकाकाराची टिका सुरू झाली ! तो आपले शेरे मारीत गेला. ब्रह्मदेवाची अक्कल गुंग झाली ! तरीहि त्यानें शेवटचा प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलेंच आणि आपल्या साऱ्या कौशल्याची कमाल करून ' माणूस ' घडविला. टीकाकार निरखून पाहूं लागला; अखेर चूक निघा-







लीच. ' याच्या छातींत एक खिडकी पाहिजे होती म्हणजे याचे विचार सगळ्यांना कळले असते. आजचे आमचे सारे टीकाकार ब्रह्मदेवाच्या या टीकाकाराचे अगदीं शंभर टक्के वंशज आहेत !

### टीकाहि स्वतंत्र कृतीइतकीच मोहक

टागोरांनीं मुळांत जें चांगलें होतें त्याला सरळ, कांहीं एक आडपडदा न ठेवतां, चांगलें म्हटलें आणि साऱ्या जगाला तें दाखविलें; त्यांच्या अगोदर, असें आणि इतकें कोणीं म्हटलें नाहीं. महाभारत, रामायण, कुमारसंभव, मेघदूत, कादंबरीचित्र इत्यादि संस्कृत, ललित–कृतींत दडलेलें अपार व अक्षय सौंदर्य त्यांनीं जगाच्या निदर्शनास आणून दिलें. लोकांत असा एक प्रवाद रूढ आहे कीं ' कालिदास म्हणजे एक सौंदर्यलोलुप अथवा विलासी कवि ! ' या प्रवादाला आमच्या येथील चांगले चांगले विद्वान् सुद्धां बळी पडले आहेत. टागोरांनीं या प्रवादाला धक्का दिला; परंतु असें करतांना त्यांनीं हेंहि मान्य केलें आहे कीं कालिदास विलासी मायानगरी उभविण्यांत अतिशय कुशल आहे. पण तेवढेंच कांहीं त्याचें कार्य नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. शाकुंतलांत त्यानें मदनाची मस्ती आणि त्याचा प्रभाव हीं नुसतीं मान्यच केलीं असें नव्हे, तर तीं त्यानें खूपच खुलविलीं आहेत ! " समाजाच्या वातावरणापासून दूर असलेल्या दोन तपोवनांत अहेतुक, आकस्मिक व अशांत अशा प्रेमाला धिंगाणा घालावयाची सुंदर संधि त्यानें मोठ्या कुशलतेनें व रंगेलपणानें आणून दिली " हें तर खरेंच; पण " इतकेंच करून मात्र तो थांबला नाहीं; केवळ या शक्तीच्या जोरावरच तो आपल्या काव्याविषयींची प्रशंसा रसिकांकडून वसूल करीत नाहीं. त्यानें मदनाच्या या दुर्दम शक्तीच्या जयाचें ज्याप्रमाणें वर्णन केलें आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका दुर्जय शक्तीच्या द्वारा शेवटचें संपूर्ण मीलन घडवून आणून मगच आपलें काव्य समाप्त केलें आहे. " मदनानें उन्मत्त झालेल्या प्रेमाला त्यानें विरहाच्या अग्नींत शुद्ध व्हावयास लावलें आणि मगच डोळस प्रेमाला मीलनाचा स्वर्ग प्राप्त करून दिला ! जी गोष्ट शाकुंतलाची तीच कुमार–संभवाची. टागोरांचें रामायणाचें व महाभारताचें रसग्रहणहि असेंच मार्मिक आहे. " काव्य–सृष्टींतील उपेक्षिता " या लेखांत तर रामायणकार, कालिदास व कादंबरीकार यांच्याजवळ ते आपली आर्त तक्रार रुजूं करतात. ते म्हणतात, " सीतेला रामाबरोबर जातां यावें आणि ऊर्मिलेला मात्र जातां येऊं नये यांत किती विदारक कारुण्य सांठविलेलें आहे ! राम व सीता या दोन देवतांकरतां केवळ लक्ष्मणानेंच तेवढा स्वतःचा बळी दिला असें नसून त्याच्याबरोबरच ऊर्मिलेनेंहि आपल्याला प्राणापेक्षांहि अधिक प्रिय अशा स्वतःच्या पतीला त्या देवतांच्या चरणीं वाहिलें आहे ! पण ही गोष्ट मात्र लिहिली गेली नाहीं. लक्ष्मणाला वनवासांतील बारा वर्षें आपल्या उपास्य प्रियजनांच्या शुश्रूषेच्या प्रिय कार्यांत तरी गुंतवितां आलीं ! पण स्त्रीजीवनांतील ऐन बहारीचीं तीं बारा वर्षें उर्मिलेनें कशीं बरें व्यतीत केलीं असतील ? " जी स्थिति ऊर्मिलेची तीपेक्षांहि अधिक करुण प्रियंवदा आणि अनसूया यांची ! कवीनें ऊर्मिलेचें निदान लग्न तरी लावलें ! पण ' सासरीं जावयाला निघालेल्या शकुंतलेला निरोप देऊन प्रियंवदा आणि अनसूया वाटेंतून रडत रडत परत आल्या, त्यानंतर नाटकांत त्यांनीं पुनः प्रवेश केला नाहीं; परंतु ज्या नाटकाचा अजून प्रयोगच झाला नाहीं, अशा एका नाटकाच्या रंगभूमीवर त्या आतां संपूर्ण यौवनानें खुलून दिसत आहेत ! आतां तंग वल्कलांनीं त्यांच्या यौवनाला बांधून टाकणें शक्य नाहीं !' आणि अश्या या तरुणींचें कवीनें काय केलें ? त्याचप्रमाणें पत्रलेखा. युवराज चंद्रापीड अभ्यास करून परत येतो आणि विवाहाच्या सगळ्या भावमधुर गोष्टी पत्रलेखेला सांगतो. ती त्याच्या प्रणयाची नि शृंगाराची जणूं प्रेक्षकच ! आपलें सर्वस्व चंद्रापीडाला अर्पण केलेल्या पत्रलेखेला जणूं भावनाच नाहीं असें कवीनें गृहीत धरलें आहे ! टागोरांची ही रस–ग्रहणात्मक टीका वाचली कीं वाटूं लागतें, "खरोखरच संस्कृत साहित्य रत्नांच्या खाणींनीं भरलेलें असून तीं रत्नें टागोरांनीं सर्व जगाला बहाल केलीं आहेत." प्रथम संस्कृत साहित्यांतल्या या सौंदर्याच्या खाणींत कोणी पूर्णपणें शिरतच नाहीं आणि शिरलाच तरी त्याला सौंदर्याचा सर्व ठेवा गवसतोच असेंहि नाहीं. ( आणि ज्याला गवसतो त्याचें कौतुकहि करण्याची निरोगी वृत्ति नसते.) समज असेल तर उमज पडणार !







## व्यक्तिवाद आणि राष्ट्रवाद यांची संगति

टागोरांची टीका ही जशी मौलिक आणि मूलगामी होती तशीच ती सर्वगामीहि होती. त्यांनीं समाजावर आणि राजकारणावर आत्यंतिक आत्मीयतेनें टीका केली. त्यांची समाजविषयक टीका त्यांच्या 'स्वदेशी समाज' या पुस्तकांत ग्रथित आहे. आपलें राष्ट्र गुलामींत आहे व ती गुलामी समाज सुधारल्याशिवाय जाणार नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती. आपला समाज मागसलेला आहे, लोकांचीं मनें बरोबर नाहींत. या समाजाला बदलावयाचें असल्यास जनतेच्या हृदयापर्यंत पोहोंचतां आलें पाहिजे. आपल्या सभा, टेबल, खुर्च्या आणि हार–तुरे या गोष्टींनीं येथील जनता भांबावून जाते. तिला परकेपणा वाटूं लागतो, आपुलकी वाटत नाहीं. म्हणून बहुजनांच्या मनांवर परिणाम करावयाचा असल्यास कथा, कीर्तनें, ललितें नि तमाशे यांच्या द्वारेंच प्रचार झाला पाहिजे त्यांच्या विचार–विकारांना जवळ वाटणारे मेळे भरविले पाहिजेत असा सल्ला आणि इषारा त्यांनीं समाजाची सुधारणा करावयास निघालेल्या पुढाऱ्यांना दिला. टागोर भारतीय मनाशीं चांगले समरस झाले होते. त्यांना ह्या मनाचा स्वभाव नि धर्म दोन्हीं कळले होते. येथील जीवन नुसत्या उपचारांनीं भरलेलें नाहीं आणि दिखाऊपणाचा प्रकार आपल्या प्रकृतीशीं विसंगत आहे, हें ते चांगलें जाणून होते. म्हणूनच उत्साहाचे व उल्हासाचे कृत्रिम मार्ग त्यांना अप्रिय होते. अगदीं टाळ्या वाजविणें सुद्धां त्यांना आवडत नसे. ते म्हणत, "टाळ्या वाजवणें हे संयमी संस्कृतीचें प्रतीक नव्हे. टाळ्या वाजविण्यांत वर्तन–वादाचा (Behaviorism-चा) अंशच अधिक असतो. मनुष्यांत आणि इतर प्राण्यांत फरक असेल तर तो हाच कीं मनुष्य निव्वळ वर्तनवादी नाहीं; माणसांत मानसिक क्रियेचा भाग प्रधान आहे. लहान मूल गुदगुल्या केल्या कीं सर्व शरीर हिसळून खदखदां हंसतें. परिपक्व मानव स्मित करतो. आपली संस्कृति ही संयमी आहे." समाजाच्या मनाचा विचार करतांना टागोर इतके सूक्ष्म बनत आणि जी गोष्ट समाजविषयक तीच राजकारणाच्या बाबतींत. आज राजकारण म्हणजे सचोटीचा दिवाळखोरपणा झाला आहे. अशा राजकारणांत तोल जाणें—तोल न टिकणेंच अधिक संभवनीय. भडक भावनांची स्वस्त उधळपट्टी राजकारणांत फार असल्यामुळें चांगला माणूस तेथें टिकणें कठिणच. वंगभंगाच्या चळवळीच्या वेळेस टागोरांनीं प्रत्यक्ष त्या चळवळींत भाग घेतला. ते वंगभंगाचा विरोध करीत गल्लोगल्लीं आपलें तेजस्वी काव्य ऐकवीत हिंडले. पण ज्या वेळेस त्या चळवळींतील नीति ढळूं लागली, चळवळीला हीन प्रांतीयतेचा वास येऊं लागला, तेव्हां त्यांनीं चळवळींतून अंग काढून घेतलें आणि तिच्यावर कडक टीका केली. साऱ्या मानवतेच्या विशाल पार्श्वभूमीवरून त्यांनीं तींत लक्ष घातलें होतें. जपानमध्यें त्यांनीं राष्ट्रवादावर व्याख्यानें दिलीं, त्यांतहि त्यांची हीच भूमिका होती. त्यांनीं त्याच वेळेस "संकुचित राष्ट्रवादाच्या चिखलांत रुताल तर नाश ओढवून घ्याल!" असा धोक्याचा लाल दिवा जपान्यांना दाखविला होता. जपाननें तिकडे दुर्लक्ष केलें आणि त्याचें काय झालें हें आज आपण पाहतच आहों. टागोरांचीं हीं व्याख्यानें 'Nationalism' या पुस्तकांत एकत्रित केलीं आहेत. हें पुस्तक म्हणजे राजकीय टीकेचें एक विचारप्रवर्तक व्यासपीठच बनलें आहे. त्यांत टागोरांची ऐतिहासिक संशोधनाची भेदक दृष्टि जशी दृग्गोचर होते तशीच त्यांची हिंदुस्थानविषयींची तीव्र तळमळ पण व्यक्त झालेली दिसते. आज राजकीय मूल्यांचा विचार कांहीं आंग्ल पुस्तकांच्या आधारें करणाऱ्यांना असा प्रश्न पडला आहे कीं व्यक्तिवाद, देशप्रेम आणि राष्ट्रवाद यांची संगति कशी लावावी? ह्या लोकांनीं टागोरांच्या Nationalismचीं पारायणें करावीं म्हणजे प्रकाश दिसेल, इतकी सुंदर मीमांसा त्यांत आहे.

## 'Surplus'चा सिद्धान्त

पण समाज–विषयक आणि राजकारण–विषयक टीका ही कांहीं झालें तरी परिस्थितिसापेक्षच असते. येथेंहि टागोर विचारांच्या दृष्टीनें परिस्थितीच्या पलीकडे गेले आहेत हें खरें असलें तरी, त्यांच्या टीकेचें संपूर्ण आणि खरें दर्शन येवढ्यानेंच होणार नाहीं. त्याकरतां त्यांच्या कलेवरच्या आणि साहित्यावरच्या टीकांकडेच वळलें पाहिजे. कारण, कला आणि








# टीकाकार टागोर

साहित्य हीं कालनिरपेक्ष असतात व तीं तशीं असलीं तरच कला आणि साहित्य बनून अनंत काळाच्या क्षितिजावर चिरंतन असा ठसा उमट वितात आणि या क्षेत्रांत आल्यावरच कलावंताचे पैलू खरे कीं खोटे हें दिसते. टागोरांची या दोन प्रकारांवरची टीकात्मक निर्मिति अनुक्रमें 'Personality' आणि 'प्राचीन साहित्य' या पुस्तकांत मुख्यत्वेंकरून समाविष्ट झाली आहे. टागोरांनीं कलेच्या क्षेत्रांत Surplusचें जें सिद्धान्तन केलेलें आहे तें अभिनव आणि अभिजात आहे. मनुष्याच्या इंद्रियजन्य आणि इंद्रियेतर अनुभवांमुळें माणसांत कांहीं तरी (Surplus) सांचत असतें व यानेंच मनुष्याचें व्यक्तिमत्त्व (Personality) बनत असतें. या सांचण्यावरच मानवी संस्कृतीची समृद्धि अवलंबून आहे. सर्व धर्मांचा, सर्व तत्त्वांचा आणि सर्व कलांचा उगम या surplusमध्येंच आहे. 'सुशिक्षितांचा वेदान्त' सांगणारे कै. श्री. म. म. जोशी यांनीं म्हणूनच म्हटलें आहे कीं खरे टागोर त्यांच्या Personalityमध्यें दिसतात. ते Personalityमध्यें दिसतात तसेच, पण जरा निराळ्या स्वरूपांत, 'प्राचीन साहित्यां'तहि अवतरले आहेत. साहित्याच्या टीकेंत नवीं मूल्यें मांडणारा लेखक असला म्हणजे त्याला 'तुम्ही लिहून दाखवा पाहूं तसें!' असें आह्वान देण्यांत येतें. टागोरांच्या बाबतींत असला प्रकार होणें शक्यच नव्हतें. कारण, त्यांनीं वाङ्मयाचे सारे प्रकार हाताळले होते, असंख्य नवे प्रयोग केले होते आणि या साऱ्यांत त्यांनीं कल्पनातीत यशहि मिळविलें होतें.

## टीकेचें शास्त्रीय स्वरूप

कांहीं कांहीं लोक रवींद्रनाथ टागोरांच्या टीकेंतील शास्त्रीयतेबद्दल साशंकतेनें बोलतात. त्या दृष्टीनें टागोरांच्या टीकावाङ्मयाकडे पाहूं लागल्यास तेथेंहि टागोर आपले परिपूर्णच! आज टीकेच्या तुलनात्मक (Comparative), निर्णायक (Judicial) आणि अनुमानात्मक (Inductive) या पद्धती अधिक सर्वमान्य आहेत. एकाद्या कृतीचें मूल्यमापन करण्याच्या दृष्टीनें यांचें महत्त्व अनन्य आहे. म्हणूनच शास्त्रीय टीकेंत यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला जातो. टागोर ज्या वेळेस कालिदास आणि शेक्सपियर या दोघांना मैदानांत खेंचून त्यांच्या शकुंतला आणि मिरांडा (Tempest) या नायिकांची तुलना करून म्हणतात कीं "मिरांडा ही बेटावर असली तरी नागरी भावनेची वाटते. बेटाशीं आणि तेथील वातावरणाशीं ती समरस नाहीं; उलट शकुंतला ही तपोवनाचा एक भाग वाटते; तेथील वनज्योत्स्ना, हरिण आणि ती एकच वाटतात," तेव्हां तुलनात्मक पद्धतीचा सुंदर प्रत्यय येतो जेव्हां टागोर पाश्चात्यांची दृष्टि विश्लेषणात्मक (Analytical) आणि पौर्वात्यांची दृष्टि संश्लेषणात्मक (Synthetic) असते असें विधान करून पुढें म्हणतात कीं "शाकुंतलाचा शेवट पाश्चात्यांनीं शकुंतला आणि दुष्यन्त यांच्या ताटातुटींत केला असता; कारण, त्यांच्या तंत्राप्रमाणें नाटकाचा शेवट तेथेंच व्हावयास पाहिजे; पण जीवनाचें संपूर्ण दर्शन करविणें हें पौर्वात्य लेखकांचें काम आहे," तेव्हां त्यांच्या निर्णायक टीकेचा सुरेख पडताळा मिळतो. महाकाव्यावरच्या त्यांच्या विवेचनांत अनुमानात्मक टीकेचीं कित्येक रम्य स्थळें विखुरलेलीं आहेत. विज्ञानानें भारावून आपल्या काव्यशक्तीचा अपव्यय करणाऱ्या आधुनिक कवींवर ते जेव्हां तुटून पडतात, तेव्हां त्यांच्या निर्मळ शास्त्रीय टीकेचा विलास दिसतो. मात्र त्यांनीं शास्त्रीय ज्ञानाच्या आधारावर नव्या शास्त्रीय चुका केल्या नाहींत. या दृष्टीनें कांहीं वर्षांपूर्वी 'विश्वभारती' या त्रैमासिकांत पाश्चात्य कवींवर त्यांनीं केलेली टीका वाचण्यासारखी आहे.—आणि टीकेच्या क्षेत्रांतील टागोरांची ही कर्तबगारी पाहिली म्हणजे म्हणावेंसें वाटतें कीं टागोरांचा हा 'चमत्कार' होता. खरेंच, टागोरांच्या प्रतिभेचा स्पर्श हा राजा मिडासच्या (King Midasच्या) स्पर्शासारखा आहे. ज्याला ज्याला स्पर्श केला त्याचें त्याचें आपलें सोनें झालें!—मग स्वाभाविकपणेंच उद्गार निघतात, 'टागोर थोर कवि म्हणून अमर झालेच नसते, तर जातिवंत टीकाकार म्हणून तरी अमर झालेच असते!'

---








प्रा. न. र. फाटक

# काकासाहेब खाडिलकरांचें व्यक्तिमत्त्व

आपल्या कर्तेपणानें प्रसिद्धीस चढलेल्या पुरुषांच्या व्यक्तिमत्त्वामध्यें आनुवंशिक व स्वयत्नार्जित अशा द्विविध गुणावगुणांचें मिश्रण असतें हें तज्ज्ञांचें मत ध्यानांत घेतल्यास काकासाहेब खाडिलकरांच्या व्यक्तिमत्त्वामध्यें आनुवंशिक गुणांचा अंश कोणता व स्वयत्नार्जित अंश कोणता हें पाहणें अवश्य ठरतें. व्यक्तिमत्त्व ही स्वभाव–विशेषाला देण्यांत आलेली एक संज्ञा आहे. निश्चित, अपरिहार्य अशा स्वभाव–विशेषांनाच अनुलक्षून व्यक्तिमत्त्व हा नवा शब्द इंग्रजींतील तद्वाचक पर्यायाच्या अनुरोधानें हल्लीं रूढ झालेला आहे.

## एकाद्या गोष्टीचा ते पिच्छाच पुरवीत

या दृष्टीनें खाडिलकरांचे स्वभावघटक पाहूं गेल्यास अगदीं प्रथम करारीपणा हा घटक ठळकपणानें डोळ्यांत भरणारा आहे. त्यांनीं लिहून ठेवलेल्या आठवणींत आपले वडील अतिशय करारी स्वभावाचे होते व तेंच वळण आपल्या स्वभावांतहि उतरलें होतें, अशा अर्थाचा मजकूर त्यांनीं दिलेला आहे. खाडिलकरांच्या मातुःश्री सुद्धां, ' स्त्रीणां हि साहचर्याद् भवन्ति चेतांसि भर्तृसदृशानि ' या न्यायानें, अशाच विलक्षण करारी होत्या व त्यांचें गमक म्हणजे त्यांच्या जीवनांतलें कडक सोंवळेंओंवळें मरणोत्तरहि संभाळलें जाण्यासाठीं त्यांचें शव सोंवळ्याच्या वस्त्रांत गुंडाळून स्मशानभूमींत नेलें गेलें असें तत्कालीन माहीतगारांच्या तोंडून ऐकायला सांपडतें. वडील–मातुःश्रींच्या स्वभावांतील हा विशेष खाडिलकरांच्याहि ठिकाणीं उत्कटत्वानें वास करीत होता. एकदां एकादी गोष्ट पूर्ण विचारांतीं करण्याचें मनानें घेतलें म्हणजे खाडिलकर त्या गोष्टीचा कसा व किती पिच्छा पुरवीत असत याचीं उदाहरणें किती तरी सांपडतील. लहानपणीं आपल्या बरोबरीच्या मंडळीसमोर पड घ्यावयाची नाहीं तर आपल्या खेळाडू कुशलतेबद्दल त्यांची शाबासकी मिळवायची, या त्यांच्या स्वभाव–गुणाचें प्रत्यंतर पुढें वृत्तपत्रव्यवसायाच्या व नाट्यलेखनाच्या क्षेत्रांतहि दिसून आलें. वृत्तव्यवसायांत त्यांनीं ' नवा काळ ' काढला तेव्हां त्यांच्या परीक्षेची वेळ होती. सगळ्या महाराष्ट्रामध्यें म. गांधींच्या राजकीय नेतृत्वासंबंधीं प्रतिकूलतेचें वातावरण पसरलेलें असतां खाडिलकरांनीं नव्या वृत्तपत्राचा संकल्प केला. खाडिलकर हे या नव्या वृत्तपत्राच्या रूपानें गुरुद्रोह आचरीत आहेत, असा आरोप त्या वेळीं मुंबई शहरांत व अन्यत्र उचारला जात होता. पुढें या आरोपाला आणखीहि एका आरोपाची जोड मिळाली; त्यांना कॉंग्रेसच्या निधींतून किंवा एकाद्या पुढाऱ्याकडून सढळपणानें पैशाची मदत झालेली आहे, अशा स्वरूपाचा तो आरोप होता. 'खाडिलकर ' अर्थस्य पुरुषो दासः ' या अनुभवाअन्वयें गांधी–वादाचा पुरस्कार करीत आहेत' या आरोपानें 'ते कॉंग्रेसच्या अगर कॉंग्रेसवाल्यांच्या पैशाचे गुलाम आहेत', असें त्यांचे आरोपकार महाराष्ट्राला भासवून त्यांच्या चारित्र्यजन्य लोकप्रियतेच्या मुळावरच आघात करीत होते. खाडिलकरांच्या ऐवजीं दुसरा कोणी अशा प्रतिकूलतेच्या माऱ्यांत सांपडला असता तर त्यानें आपला हा व्यवसाय सोडून दिला असता. खाडिलकर सुद्धां केव्हां केव्हां अगदीं प्रारंभींच्या काळांत त्यांचे अकृत्रिम स्नेही व साह्यकर्ते वासूकाका जोशी यांना विनोदानें ' कशाला ही दैनिकाची कटकट म्हातारपणीं माझ्यामागें लावून दिलीत ? यापेक्षां मी नाटकें लिहून त्यांच्या उत्पन्नावर सुखानें दिवस काढूं शकलों असतों ' असें म्हणत असत.








# काकासाहेब खाडिलकरांचें व्यक्तिमत्त्व

परंतु ही निश्चयाची डळमळ फक्त बोलण्यापुरतीच असे. अशीं वाक्यें उच्चारीत असतांनाच 'नवा–काळ'चें कांहीं तांतडीचें काम उपस्थित झालें कीं, तावडतोब ते एकाग्रतेनें त्याची संपादणी करण्याच्या उद्योगास लागत असत. 'गांधीप्रणीत देशसेवेच्या मार्गांत उत्पन्न झालेल्या विघ्नांचा धुव्वा उडवून त्याबद्दल लोकांचा विश्वास वाढवावयाचा', या प्रतिज्ञेनें काढलेल्या दैनिकाच्या खाडिलकरांनीं केलेल्या जोपासनेचें दर्शन घडलेल्यांना त्यांच्या करारीपणाची ओळख तेव्हांच पटत असे. 'नवा काळ'च्या पंचवीस वर्षांत खाडिलकरांनीं संपत्तीचे चढउतार दोन तीन वेळां अनुभवले; परंतु अशा प्रसंगीं त्यांच्या कर्तव्य–क्षमतेमध्यें मुळींच अंतर पडलें नाहीं.

## कायद्याऐवजीं बोअरयुद्धाचा अभ्यास

खाडिलकरांच्या करारीपणाचा इतिहास केसरीकडे ते योगायोगानें कामास लागले, त्या वेळेपर्यंत सहज जाणारा आहे. देशसेवेंत आयुष्य वेंचावयाचें व देश–सेवेचें साधन 'केसरी', असा हेतु मनांत पक्केपणानें घोळत असतां टिळकांनीं त्यांना त्यांच्या एका लेखां-तील विचारसरणि पसंत पडून आपल्याकडे बोलावून घेतलें, त्याला येथें योगायोग म्हटलें आहे. केसरींत देशसेवेच्या अंगोपांगांचें वारंवार उद्भवणाऱ्या राज–कारणविषयक चर्चेच्या रूपानें मनमुराद विवेचन करण्याची संधि मिळण्यापूर्वी आपलें लेखनकार्य 'त्रिविधज्ञान–विस्तारां'तून चालवावें, अशी त्यांची इच्छा होती; परंतु केसरींतल्या प्रवेशानें त्यांच्या देश-सेवावृत्तीला योग्य भूमिका लाभली व त्या भूमिकेचीं कर्तव्यें ते अत्यंत निष्ठेनें बजावूं लागले. केसरीचें काम करण्यांत सरकारी रोषाचीं संकटें पसरलेलीं होतीं; तथापि खाडिलकरांनीं त्यांची क्षिति बाळगली नाहीं. त्यांहून अधिक तीव्र स्वरूपाचीं संकटें गृहस्थाश्रम योग्य रीतीनें चालविण्यासंबंधांतलीं होतीं. टिळ-कांच्या कारकीर्दींत केसरींत काम करणाऱ्यांच्या वेत-नांचें मान फार बेताचें होतें. 'नवा काळ'मध्यें कामावर माणसें घेतांना ते त्यांची प्रापंचिक कुचंबणा होणार नाहीं असा विचार बाळगूनच पगाराचें मान ठरवीत असत. अर्थात् त्यामध्यें माणसाची लायकी व त्याच्या कामाची लायकी यांविषयीं तारतम्य बाळगलें जात असे, हें निराळें सांगायला नकोच. केसरींतला खाडिलकरांचा आर्थिक अनुभव स्पृहणीय नव्हता; परंतु त्याबद्दल त्यांनीं केव्हांहि तक्रारीचा शब्दहि काढला नाहीं. प्राप्त स्थितींतच पूर्ण संतोष बाळगून त्यांनीं आपलें कर्तव्य शेवटपर्यंत बजावलें. केसरी व मराठा या दोन्ही वृत्तपत्रांत काम करणारीं अनेक माणसें दुसरा किफायतीचा उद्योग दिसतांच तिकडे निघून गेल्याचीं उदाहरणें खाडिलकरांसमोर होतीं. टिळक देखील खाडिलकरांना 'तुम्ही एकदां एल एल. बी. होऊन जा; म्हणजे केसरी सुटल्यास किंवा सोडावा लागल्यास कायद्याचें ज्ञान तुम्हांला थोडेंफार उपयोगीं पडेल' असें त्यांना पुनः पुनः सांगत असत. टिळकांनीं एकदां त्यांना परीक्षेच्या अभ्यासाकरतां मुद्दाम मुंबईला जाऊन राहण्यास भाग पाडलें; पण कायद्या-ऐवजीं खाडिलकरांचें लक्ष आफ्रिकेंतील बोअर–युद्धानें वेधून घेतल्यामुळें त्यांनीं त्या युद्धाचा अभ्यास केला. त्या अभ्यासांतूनच 'गनिमी काव्याची लढाई' या लेखमालेचा प्रादुर्भाव झाला. साहजिकच एल. एल. बी.ची परीक्षा हुकली आणि खाडिलकर केसरींत काम करूं लागले. परीक्षा गमावली हा त्यांच्या करारीपणाचाच एक परिणाम समजावा लागतो.

## 'तुमचें मनुष्य खुशाल आहे.'

नेपाळांत जाऊन हत्यारें तयार करण्याचें काम खाडिलकरांनीं स्वीकारलें, त्यासंबंधींची हकीकत आतां त्यांच्याच शब्दांनीं जगांपुढें सविस्तर आलेली आहे. देशसेवेचा तोहि एक उपाय होता व टिळ-कांची त्याला संमति असल्यानें खाडिलकरांना त्याची मुळींच दिक्कत वाटली नाहीं. हा मार्ग केसरींतले अग्र–लेख लिहिण्यापेक्षां जसा बिकट होता, तसाच भयानक आपत्तींनाहि आह्वान देणारा होता. पण सरकारला त्याचा पुरा सुगावा लागण्यापूर्वीच खाडिलकर स्वदेशीं सुखरूप परतून आले, म्हणून निभावलें. नाहीं तर त्यांच्या प्राणाशींच गांठ पडण्याचा संभव होता. प्राणावर बेतलें नसतेंच तर देशोधडीस तरी लागण्याची पाळी आलीच असती. परंतु या संकटांची जाणीव असूनहि त्यांनीं हत्यारें बनविण्याच्या कामास निःशंकपणें हात घातला, यांत त्यांच्या स्वभावाचा करारीपणाच विशेष तेजस्वितेनें










दिसणारा आहे. नेपाळांतलें काम अशक्य झालें तेव्हांच त्यांनीं त्याला रामराम ठोकला! तेथें अतिशय जपून, सावधपणानें राहावें लागत होतें. ख्यालीखुशालीच्या उघड्या पत्रव्यवहारालाहि तेव्हां जागरूक सरकारी बंदोबस्तामुळें सवड नव्हती. टिळकांच्याकडे त्यांच्या योजनेप्रमाणें खाडिलकरांच्या कामाची व खुशालीची माहिती यावयाची व 'तुमचें मनुष्य खुशाल आहे' अशी मोघम बातमी टिळकांनीं खाडिलकरांच्या नातेवाइकांना द्यावयाची, असा प्रकार जवळजवळ दोन वर्षें चाललेला होता. 'तुमचे नातेवाईक खुशाल आहेत' असेंच उलट खाडिलकरांना या काळांत कळावयाचें. परंतु खाडिलकरांना या स्थितीचा मुळींच कंटाळा आला नाहीं. ते आपल्या कामांत दंग होते. परत आल्यावर त्यांनीं आपल्या कामाचा तपशील अगदीं गुप्त राखला होता. नेपाळांत ते ब्रिटिश राजकारणाच्या दृष्टीनें संशयास्पद अशा कांहीं उद्योगासाठीं गेले होते, येवढेंच पुष्कळांना ठाऊक होतें. अलीकडे स्वराज्य जवळ जवळ येत असल्याचें दिसूं लागल्यावरच ते निकटवर्ती व्यक्तींजवळ विषय निघाल्यास तो वृत्तांत बोलत असत; परंतु त्यालाहि आपल्या मरणानंतरच प्रासिद्धि मिळावी असेंहि ते बजावून ठेवीत. स्वराज्य निश्चित आटोक्यांत आल्यावर त्यांनींच तो वृत्तान्त लेखबद्ध केला. त्यांच्या मृत्यूपूर्वी यासंबंधाची वाच्यता वासूकाकांच्या चरित्रांत झाली होती; परंतु तीहि स्वराज्य–काळांतच झाली. अशा कडक कटाक्षानें जिच्याबद्दल गुप्तता राखण्यांत येत होती, ती कामगिरी १९०३ ते १९०५ या काळांत किती धोक्याची होती याची पूर्ण कल्पना असून सुद्धां खाडिलकरांनीं ती पत्करली यावरून त्यांच्या स्वभावाचा एक पैलू लक्षांत येण्याला हरकत नाहीं.

## आपलें फर्स्टहँड असें आहे तरी काय?

खाडिलकरांच्या स्वभावांत अनेक परस्परविरोधी गुणांचें मिश्रण झालेलें होतें: त्यांची तडफ जशी दांडगी तसा त्यांचा धिमेपणाहि जबर होता. मनांत आलेली गोष्ट झपाट्यानें उरकण्याकडे जसा त्यांचा कल होता, तसाच त्या गोष्टीच्या परिपाकाला अवश्य असणाऱ्या साधनांतील उणिवा नडूं लागल्यास त्या, तडफेशीं न जमणाऱ्या सहनशील शांतपणानें दूर करण्याचाहि तत्परपणा ते दाखवीत आणि असें पाहिल्यावर थोड्या वेळापूर्वीची त्यांची तडफ कोठें मावळली याचा त्यांच्या अन्तेवासीयांना चमत्कार वाटावयाचा. 'नवा काळ' काढण्याचें ठरल्याबरोबर खाडिलकरांनीं वासूकाकांच्या जोडीनें त्याकरितां अवश्य असणारी प्राथमिक व्यवस्था बिलकुल कालापव्यय होऊं न देतां अंमलांत आणली; परंतु पहिला अंक छापण्याच्या रात्रीं मुद्रणयंत्रांनीं जो विचित्र खेळ मांडला होता, तो अनुभवून दुसरा एखादा पुरुष निरुत्साहाच्या किंबहुना स्वीकृत–संन्यासाच्या तावडींत गेला असता; परंतु खाडिलकर हे यंत्राची कामें सुरळीत चालू करण्यासाठीं यांत्रिकामार्फत होत असलेल्या प्रयोगामध्यें गर्क झाले होते. 'जुनीं सेकंडहँड यंत्रें म्हटलीं कीं असाच त्रास व्हायचा; पैसे जास्त पडले तरी नवीं कोरीं यंत्रें आणूनच आपलें काम करणें श्रेयस्कर' असे शब्द एका सहकाऱ्याच्या तोंडून वैतागानें बाहेर पडतांच खाडिलकर गंभीरपणें हंसले व म्हणाले, 'आपलें फर्स्ट हँड असें आहे तरी काय? आपलें राजकारणहि सेकंडहँडच नाहीं का? मग यंत्रांबद्दलच तीं सेकंडहँड म्हणून खळखळ करण्यांत काय हंशील? जसें आपलें राजकारण, तशींच हीं यंत्रें. 'नवा काळ'च्या पहिल्या रात्रीचा पाढा पूर्वी वाचला गेला असल्यानें तेव्हां यंत्रांनीं किती सतावलें, याचा तपशील येथें मांगण्याची गरज नाहीं. तडफ व धिमेपणा यांचें साहचर्य दाखविण्याकरतांच ही माहिती सादर केलेली आहे. 'यंत्रें निर्जीव म्हणून त्यांच्यावर संतापून काय उपयोग?' या जाणिवेनें खाडिलकरांनीं शांतपणा धरला, असा कोणाचा समज झाला असल्यास, त्याला माणसांशीं घडणाऱ्या व्यवहारांतहि खाडिलकर अशाच रीतीनें वागत असत, हें उत्तर आहे. एकदां एक नाटक बसवितांना खाडिलकरांनीं त्या नाटकाच्या नायकाचें काम एका होतकरू तरुणाला देण्याचें ठरविलें. नाटकमंडळीच्या इतर प्रमुख नटांनीं व सल्लागारांनीं तें काम त्या व्यक्तीला झेंपायचें नाहीं, नीट वठवितां यावयाचें नाहीं, असा अभिप्राय व्यक्त केला; परंतु खाडिलकरांच्या निश्चयावर सदर अभिप्रायाचा परिणाम झाला नाहीं. त्यांनीं त्याच








व्यक्तीला त्या कामाचें शिक्षण देण्याला प्रारंभ केला. सुरुवातीस त्याच्या पुष्कळ चुका होत असत. शब्दांचा उच्चार व अभिनय त्याला चटकन् साधत नव्हते. खाडिलकरांनीं पुनः पुनः त्याला संधा द्यावी व त्यानें पुनः पुनः चुकावें, अशी स्थिति पाहून इतर नटांना व सल्लागारांना आपलें म्हणणें खरें ठरणार या अपेक्षेनें हुरूप चढला व ज्यांना धैर्य होतें त्यांनीं 'आम्ही नव्हतों का सांगत कीं हें असेंच होणार म्हणून ?' असें खाडिलकरांच्या कानांवर घालण्याची कुचराई केली नाहीं; पण खाडिलकरांचा 'हाच या कामाला योग्य आहे व तो कितीहि चुकला तरी त्याला शिकवून तयार करीन व मग निवड चांगली झाली असें तुम्हीच कबूल कराल' हा खुलासा कायम होता. शेवटीं खाडिलकरांच्या मनाजोगें काम त्याला करतां येऊं लागलें व खाडिलकरांना समाधान लाभलें. परंतु पहिल्याच प्रयोगांत तो एका ठिकाणीं चुकला व खाडिलकरांचा हिरमोड झाला. त्यानंतर त्या नाटकाचे चारपांच प्रयोग होईतोंवर खाडिलकर नाटक पाहावयास जात होते. तो जेथें चुके तेथें त्या कामाबद्दल ते त्या नटाला इषारा देऊन ठेवीत. चारपांच प्रयोगांत तें काम त्याच्या अंगवळणीं पडल्याची खात्री झाल्यावर खाडिलकरांनीं नाटकाला जाण्याचा क्रम बंद केला. पुढें त्या नटानें त्याच कामाबद्दल लोकांकडून वाहवा मिळविली.

## बाहेर तसेंच घरांतहि बोलणें माफक

कोणाहि आल्यागेल्याशीं जणूं काय तो कोणी जुनाच परिचित आहे, अशा थाटानें खाडिलकर बोलत नसत. येणाऱ्याच्या कामाला जरूर असेल तेवढेंच बोलून त्यास वाटेस लावण्याची त्यांची रीत होती व त्यांच्याविषयीं सामान्यतः आढळून येणाऱ्या गैरसमजुतींना त्यांच्या या मोजकें कामापुरतें बोलण्याच्या रीतीनें जन्म दिलेला होता. खाडिलकर ही एक मोठी व्यक्ति असून तिच्याशीं कांहीं कामाच्या निमित्तानें यथेच्छ बोलण्याची संधि घ्यावी अशी त्यांच्याकडे जाणाऱ्या सर्व नवख्यांना इच्छा असावी हें त्यांच्यापुरतें स्वाभाविक ठरणारें आहे; परंतु जाहिरात किंवा छापण्याचा इतर मजकूर देण्याच्या हेतूनें कोणींहि यावें आणि आपल्या कामाव्यतिरिक्त राजकारणाच्या चर्चेंत शिरावें हें खाडिलकरांना परवडत नसे; कारण, कसल्या ना कसल्या तरी विषयाचें निरंतर चिंतन करण्याची त्यांनी संवय होती. यामुळें कोणी आपल्या कामाच्या बाहेर लगट करूं लागल्यास त्याला कोधाच्या शब्दांनीं घालवून देण्यासहि ते कचरत नसत. कामापुरतें ज्याचें त्याला निश्चित उत्तर दिल्यावर जर कोणी चेंगटपणानें उभा राहिला तर तेंहि त्यांना खपत नसे. त्यांच्या 'जितक्यास तितकें'पणाच्या अशा अनुभवाचीं माणसें खाडिलकर हे माणूसघाणे, तिरसट किंवा घमेंडखोर आहेत, असा ग्रह आपल्या परिवारांत पसरवीत. परंतु कोणी चिरपरिचित किंवा चिरस्नेही कामासाठीं किंवा कामाखेरीजहि आला तर त्याचें स्वागत करून त्याच्याशीं तासचे तास नाना विषयांवर चर्चाविनोद करतांना खाडिलकरांना ज्यांनीं पाहिलें आहे त्यांना वरील ग्रह चुकीचा असल्याचें पटत असे. बाहेरच्या लोकांशीं ज्याप्रमाणें त्यांचें माफक बोलणें असे, त्याचप्रमाणें घरांतल्यांशींहि असे. त्यांनाच कांहीं बोलावेंसें वाटलें तर ते केव्हां तरी बहुत वेळपर्यंत बोलत राहत; पण असा प्रसंग विरळाच. एकादा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याविषयीं आपलें मत सांगून टाकल्यावर अधिक युक्तिवादाची घासाघीस करीत बसण्याचा त्यांना कंटाळा होता. ज्याला नीट समजावून सांगितल्यानें उपयोग आहे असें वाटेल, त्याच्याशीं फिरून फिरून त्या विषयाचा खल करण्याचा कंटाळा खाडिलकर करीत नसत, हा मुद्दा मागें नटाबद्दल जी माहिती दिली आहे तिच्यावरूनहि कळणारा आहे. आल्यांगेल्यांशीं कमी बोलण्याच्या मागें आणखी एक विचार असावा, असें म्हणतां येतें. अघळपघळ संवादांतून आपल्या मतलबाचा मजकूर वेगळा काढून त्याचा विपर्यासानें उपयोग केला जातो व तो कानांवर आल्यास निष्कारण मानसिक त्रास भोगावा लागतो, म्हणून कमी, मोजकें व निश्चित स्वरूपाचें बोलणें उत्तम असा नियम खाडिलकरांनीं केला असावा. एकदां ज्योतीबा फुले यांच्यावरून पुण्यामध्यें वाद उत्पन्न झाला असतां फुल्यांच्या विरोधी पक्षानें एक लहानसें पुस्तकें छापून ज्योतीबा खिस्ती झाले असावे, असा ग्रह निर्माण करणारी







माहिती त्यांत घातली होती. या पुस्तकांत खाडिलकरांच्या स्नेह्यांचा हात होता व त्यावर 'नवा काळ'मध्यें टीका आली तेव्हां त्यांनीं आपला खासगी संबंध इरेला टाकून अश्या तऱ्हेचा मजकूर पुनः या दैनिकांत न येण्याविषयीं खबरदारी घेण्याची सूचना खाडिलकरांना दिली. 'नवा काळ'मधील मजकुरांत आक्षेपार्ह असें कांहींहि नव्हतें तरी सुद्धां, या स्नेह्यापाशीं त्याविषयीं ऊहापोह करण्याचा प्रसंग टळावा, अशी खाडिलकरांची इच्छा त्या वेळीं निदर्शनास आली. 'नवा काळ'चें बस्तान ठीक बसून सर्व कामें सुरळीत चालू झाल्यावर खाडिलकर अशा प्रसंगीं वाद करूं इच्छिणाऱ्याला 'नवाकाळ'च्या त्या त्या खात्यावरील जबाबदार माणसाकडे पाठवून देत असत. आपल्याशीं त्याचा वादच होऊं नये म्हणजे निष्कारण फाजील बोलण्याचा प्रसंग टळेल अशा धोरणाची ही तरतूद होती.

## टीकाकाराविषयीं मनोगत

इतरांशीं खाडिलकर थोडें बोलत असले, तरी आपल्या चिरमित्रांच्या भेटीचा योग आल्यास खाडिलकर तासचे तास हास्यविनोदपूर्वक बोलत असत, असाहि अनुभव होता. पण अशा संवादांत खाडिलकर कधीं कोणा व्यक्तीविषयीं नालस्तीची भाषा बोलत नसत व बोलूं देत नसत, हा त्यांचा स्वभाव—गुण मुद्दाम लक्षांत ठेवण्याजोगा आहे. जर बैठकीची मंडळी बरोबरीची किंवा आपल्याहून वयानें अगर मानानें वडील असली, तर खाडिलकर बैठकींतून निघून जात. कारण, दुसऱ्याच्या नालस्तीनें मनुष्य आपला नैतिक अधःपात करून घेतो असा त्यांचा ठाम अभिप्राय होता. स्वपक्षमंडनार्थ कधीं कधीं त्यांना प्रतिपक्षांतील थोरांमोठ्यांबद्दल अतिशय कडक व कडू लिहावें लागलें, तरी खासगी संवादांत तो विषय उगाळण्याची त्यांना संवय नव्हती. 'नवा काळ'मध्यें प्रतिपक्षाच्या पुढाऱ्यांना अनुलक्षून टीका लिहिण्याचा प्रसंग असला व त्या टीकेचा मजकूर त्यांनीं स्वतः लिहिलेला नसला, तर तो नीट बारकाईनें तपासण्याचा त्यांचा प्रघात होता. त्यांच्यावर टीकेचा कितीहि भडिमार झाला तरी तिची दखल त्यांनीं कधीं घेतली नाहीं. "टीकाकारांना पायवाटेच्या जूसबा राहून वेडावांकडा आवाज काढणाऱ्या बेडकांप्रमाणें लेखावें; ते जर वाट अडवितील किंवा अडथळा करतील, तर त्यांच्याकडे वाट मोकळी करण्यापुरतें लक्ष द्यावें; त्यांच्या मागें त्यांचा पाठलाग करीत दूरवर गेल्यास आपला रस्ता चुकतो व मजल थांबते", असें त्यांचें टीकाकारांविषयीं मनोगत होतें. टीकाकार हे रस्ता अडवून धरण्याइतके समर्थ बहुधा नसतात; त्यांना खूप ओरडल्यानेंच जर समाधान लाभत असेल तर त्यांना त्या समाधानाचा लखलाभ होऊं द्यावा अश्या वृत्तीनें ते टीकाकारांची उपेक्षा करीत असत. टीकाकार भेटीला आला तर त्याला त्याच्या टीकेची ओळख न देतां ते त्याच्याशीं मोकळेपणानें वार्तालापहि करीत. मात्र कोणी होतकरू वा जिज्ञासु प्रामाणिकपणें शंका विचारूं लागल्यास त्याची परोपरीनें समजूत पटवून देण्याची कसूर ते करीत नसत. केळकरांच्या 'गत—गोष्टीं'त खाडिलकरांसंबंधीं पुष्कळसा विचित्र मजकूर आलेला आहे.त्याचा परामर्श घेण्याच्या भरीस आपल्या सहकाऱ्यांनीं पडूं नये, अशी खाडिलकरांनीं ताकीद दिलेली होती. पुढें त्याच संदर्भात बोलतांना त्यांनीं म्हटलें, "ज्याअर्थीं 'गत—गोष्टीं'त केसरी—मराठा—संस्थेचा ट्रस्टी होण्याबद्दल टिळकांनीं मला प्रथम विचारलें असें विधान आहे, त्याअर्थीं टिळकांचा मजवर विश्वास होता कीं नव्हता हा प्रश्न आपोआपच निकालांत निघतो. समजूतदार वाचक ह्यावरून योग्य तो बोध घेतीलच." खाडिलकरांवर हिशेबीपणाच्या बाबतींत ते कुमकुवत असल्याचा आणखी एक आरोप 'गत—गोष्टीं'त आहे. मुंबईत थोड्याशा आधारानें दैनिक चालवून स्वतःची लाख—सव्वालाखाची इमारत व तीसचाळीस हजारांची यंत्रसामग्री संपादन करणारा मनुष्य हिशेबी कीं गैर—हिशेबी याचा निर्णय करणें कठिण नाहीं; मग त्या पुस्तकांतील आरोपांचीं निरनिराळीं विधानें धुंडाळून त्यांचा समाचार घेण्याची दगदग हवी कशाला? एका आक्षेपाचें निरसन पुस्तकांतच असून दुसऱ्याचें खंडन इमारतीच्या व कारखान्याच्या रूपानें प्रत्यक्षच लोकांना दिसणारें आहे. ज्यांना हें पाहावयाचेंच नाहीं, त्यांना मुद्दाम सांगून तरी उपयोग काय? समजूतदारांना आपल्या खुलाशाची जरूरी नाहीं व दुराराध्यांना त्याचा उपयोग नाहीं, म्हणून स्वस्थ राहणें हाच उत्तम मार्ग.








## चूक आणि शिक्षा यांसंबंधींचें सूक्ष्म तारतम्य

खाडिलकरांच्या स्वभावांत रागीटपणाचा अंश फार मोठ्या प्रमाणांत होता. मनाविरुद्ध कांहीं होतेंसें किंवा झालेंसें दिसतांच त्यांच्या संतापाचा पारा किती चढेल याचा नियम नसे. संतापाच्या भरांत ते काय बोलतील याचाहि भरंवसा नसे; परंतु संतापाइतकाच त्यांचा विवेकहि तीव्र होता. संताप ओसरला कीं मग विवेकाच्या अंकुशाची टोंचणी त्यांच्या मनाला लागून संतापाच्या स्थितीची व परिणामाची तपासणी अंतरंगांत सुरू होऊन जरुरीपेक्षां परिणामाची व्याप्ति जास्त आढळल्यास त्यांचें हृदय व्यथित होत असे. ज्याला त्यांचा संताप बाधला असेल त्याला बोलावून त्याची क्षमा याचण्यासहि ते कचरत नसत. पश्चात्तापानें माफी मागतांना त्यांच्या डोळ्यांतून खळखळां अश्रुधारा सुरू होत. मग त्यांच्या मनांत कसलाहि संकोच राहत नसे. उलट, ज्याची माफी खाडिलकर मागत असतील त्यालाच उलट त्यांची स्थिति पाहून विरघळून जावें लागे. 'चूक झाली म्हणून बोलावें लागलें, परंतु चुकीच्या मानानें बोलणें अधिक होतें,' असे त्यांचे उद्गार चूक आणि शिक्षा यांचें प्रमाण त्यांनीं मनांत ठरविल्याची साक्ष पटविणारे असत. इतकें यासंबंधांतलें सूक्ष्म तारतम्य इतरांच्या ठायीं क्वचितच पाहावयास सांपडेल. मेनका नाटकासाठीं विश्वामित्राच्या भूमिकेचा अभ्यास करतांना विश्वामित्राला क्रोध जिंकण्यासाठीं स्वतंत्र तपश्चर्या करावी लागल्याची रामायणांतली माहिती वाचल्यावर त्याप्रमाणें त्यांनींहि क्रोध जिंकण्याचा अभ्यास चालविला. अगदीं अलीकडच्या काळांत त्यांनीं क्रोधाच्या आहारीं न जाण्याइतकी तयारी केल्याचा अनुभव येत असे. परंतु क्रोधाची लाटच उठणार नाहीं, अशी अवस्था त्यांना कमावतां आली नाहीं. कित्येकदां नवा गुण अंगीं जडविण्याचें वय निघून गेल्यामुळें हा फार वर्षांचा मुरलेला क्रोधाचा दोष संयमाला दाद न देतां आपला प्रभाव गाजवितोच, असें ते क्रोधाची मीमांसा करतांना म्हणत असत. तथापि स्वतःचे दोष ओळखणें व त्यांची मात्रा चालूं न देण्याचा यत्न करणें ही या प्रकारांतली महत्त्वाची गोष्ट आहे. प्रत्येक मनुष्य आपल्या दोषांच्या बाबतींत पूर्ण अंधळा असतो. खाडिलकर दुसऱ्यांच्या दोषांबाबत अंधळे व आपल्या दोषांविषयीं डोळस असल्यामुळें त्यांच्या मानसिक उन्नतीची कल्पना येण्याला हरकत नाहीं.

## लोकमान्यांच्या शिक्षेचें शल्य !

आपल्यामुळें दुसऱ्याला त्रास भोगावा लागला व त्याचें प्रायश्चित्त घेण्याची सवड आपल्याला मिळाली नाहीं तर त्या त्रासाचें शल्य त्यांच्या मनांत कसें दीर्घकाळ राहत असें याचें उदाहरण म्हणजे त्यांना १९२९ सालीं राजद्रोहाच्या गुन्ह्यानिमित्त एक वर्षाची शिक्षा झाली तेव्हां त्यांच्या चित्ताला वाटलेलें समाधान हें होय. टिळकांना दोन वेळां आपल्या लेखांमुळें शिक्षा झाली, पण त्या शिक्षेची फेड आपणास करतां आली नाहीं, याचा विषाद त्यांच्या अंतरंगांत घर करून बसलेला होता. १९२९मध्यें ज्या दिवशीं हायकोर्टानें त्यांना शिक्षा फर्माविली, त्या दिवशीं खाडिलकर घरून कोर्टांत जातांना आपणास शिक्षा होणार या खात्रीनें मोठे उल्लसित झालेले होते. त्यांच्या वृत्तीच्या या प्रकाराबद्दल केलेल्या पृच्छेचें उत्तर त्यांनीं 'या शिक्षेनें मी लोकमान्यांना माझ्यासाठीं भोगाव्या लागलेल्या शिक्षेच्या दोषांतून मुक्त होणार आहें.' असें दिलें. टिळकांना तुरुंगांत लोटणारे लेख टिळकांचे नव्हते, हें गुपित राहिलेलें नव्हतें. १९२० सालीं टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या शिकवणीबद्दल लिहितांना खाडिलकरांनींच केसरींत त्याची प्रथम उघड वाच्यता केली व अलीकडे दोनतीनदां त्यांनीं ते लेख आपले होते असेंहि स्पष्टपणें जाहीर केल्याचें कित्येकांना आठवेलच. खाडिलकरांना ज्यांमुळें शिक्षा झाली ते लेखहि त्यांचे नव्हते. टिळकांप्रमाणेंच खाडिलकरांना सुद्धां दुसऱ्यांच्या लेखांसाठीं शिक्षा मिळाली हा दोघांच्या शिक्षेंतील सादृश्याचा योग खाडिलकरांच्या चित्तांतील शल्य—वेदना हलक्या करणारा होता. हायकोर्टानें खाडिलकरांनाहि टिळकांप्रमाणेंच रात्रीं ८ वाजण्याच्या सुमारास शिक्षा सुनावली ! खाडिलकरांना तेव्हां कैद्याच्या पिंजऱ्यांत बसविलेलें होतें. शिक्षेचा तपशील त्यांना ऐकूं आला नाहीं. जवळच्या सहकाऱ्याला त्यांनीं तो विचारला. 'एक वर्षाची साधी कैद व दोन हजार रुपये दंड' हा तपशील कळल्यावर 'शिक्षा माझी मी भोगणारच आहें; दोन








हजार दंडाचा भारहि 'नवा काळ'वर पडूं देणार नाहीं; शिक्षेच्या वर्षांत दोन नाटकें लिहून काढलीं कीं दंडाची रक्कम वसूल होईल, ' असें हास्यमुखानें खाडिलकर बोलले. वृत्तपत्राच्या व्यवहारांत जबाबदारीचीं कामें चार दोन माणसें करीत असतील तर एकाच्या चुकीबद्दल दुसऱ्याला प्रायश्चित्त मिळावें हें कायद्याप्रमाणें सरळच आहे व त्यासाठीं निरंतर खेद किंवा हळहळ वाटण्याचें कारण काय, असाहि प्रश्न विचारतां येईल. पण खाडिलकरांचीं नैतिक मूल्यें व्यवहाराच्या सपाटींतील नव्हतीं. तीं फार उंचीवरील होतीं. त्यामुळें त्यांना टिळकांच्या शिक्षेसंबंधीं आपल्यावरील जबाबदारीचें दुःख दीर्घकाळपर्यंत वाहावें लागलें.

## स्नेहालाहि सच्चेपणाची जरूरी

खाडिलकरांना असत्याचा तीव्र तिरस्कार वाटत असे. चुकीबद्दलच्या चौकशींत लबाडीचीं उत्तरें दिलीं जात आहेत असा संशय आला कीं, त्यांचा क्रोध भडकत असे; त्यांच्या अनिवार क्रोधावेशाचें कारण बहुधा लबाडीचा संशय हेंच असे. चूक सरळपणानें कबूल केल्यास ती कितीहि मोठी असली तरी खाडिलकर मुळींच रागावत नसत. मग ते शांतपणें चुकीच्या कारणांचा शोध करूं लागत. एकदां एका मोठ्या नाटककारानें त्यांना बालगंधर्वांकडून आपल्या नाटकाचा मोबदला आपणाला ठरल्याप्रमाणें मिळाला नाहीं अशी तक्रार केली. त्याच्या तक्रारींत खोटेपणाचा अंश नाहीं, अशा समजुतीनें खाडिलकर बालगंधर्वांकडे गेले. त्या दिवसांत मेनका नाटक बसविण्याचें काम सुरू होतें. त्या नाटककारानें आपल्या तक्रारींत भेटावयास गेलें असतां बालगंधर्वांकडून अपमान होतो, अशा अर्थाचा मीठमसालाहि भरलेला होता. नाटकवाल्यांनीं नाटकाच्या कर्त्याचा योग्य मान ठेवला पाहिजे, अशाविषयीं खाडिलकरांचा कटाक्ष असल्यानें खाडिलकरांनीं नाटकमंडळींत मेनकेच्या तालमीसाठीं जातांक्षणीं तालीम बंद ठेवून बालगंधर्वांच्या हजेरीला सुरुवात केली. नाना तऱ्हेचे उलट सुलट प्रश्न विचारून बालगंधर्वांकडे कसलीच चूक नाहीं, अशी खात्री करून घेतल्यावर खाडिलकर घरीं आले. तो नाटककार त्यांची वाटच पाहत होता. या वेळीं खाडिलकरांचा बालगंधर्वांवरील राग उलटलेला होता; परंतु त्यांनीं नाटककाराशीं बोलतांना प्रारंभीं अतिशय संयम राखला होता. नाटकाचा मोबदला व अप्रतिष्ठा या बाबतींत बालगंधर्वांकडे मनावर घेण्याजोगा दोष नाहीं, असें त्या नाटककाराला कांहीं वेळानें नाइलाज होऊन कबूल करावें लागल्यावर खाडिलकरांच्या क्रोधाचा एकदम स्फोट झाला ! व त्यांनीं त्या नाटककाराला खोटें बोलल्याबद्दल असें जोराचें वाक्ताडन केलें कीं, तो रडूंच लागला ! समाजांत ज्याचा मोठा मान आहे अशा गृहस्थाला असें बोलावें लागत असल्याबद्दल खाडिलकरांनाहि वाईट वाटत होतें. त्याचें रडें पाहिल्यानंतर खाडिलकरांनीं आपला क्रोध आंवरला आणि त्याला समजुतीच्या गोष्टी सांगायला सुरुवात केली : 'तुमचा प्रत्येक शब्द अक्षरशः खरा आहे. असें धरून मी बालगंधर्वांची खरडपट्टी काढणार होतों; पण मला तोंडघशीं पडण्याची पाळी आली !' ज्याच्याकडून काम साधायचें त्यालाच फसवायचें हा न्याय नव्हे, अशा धोरणानें ते बोलत होते. शेवटीं निरोप घेतांना 'हें प्रकरण विसरून जावें आणि आपला स्नेह कायम ठेवावा' अशी त्या नाटककारानें विनंति केली तेव्हां "स्नेहाला सुद्धां आपसांतल्या सच्च्या वागणुकीचा पाया पाहिजे. व्यवहारांत सलोख्याचे साधारण संबंध असणें म्हणजे खऱ्या अर्थानें स्नेह ठरत नाहीं व तसल्या स्नेहाला बाध आला म्हणून माणसाचें कांहीं बिघडतहि नाहीं. स्नेहापेक्षां तुम्ही आपल्या अंगच्या गुणांवर जास्त भिस्त ठेवा व त्यांचा प्रामाणिकपणें उपयोग करा म्हणजे तुमचें सदैव कल्याणच होईल. ज्या संस्थेंत मी दिवसरात्रीचेंहि भान सोडून वीस वर्षें हाडें झिजविलीं तींतून मला डोळ्यांतून टिपें गाळीत, निराधार स्थितीमध्यें बाहेर पडावें लागलें ! परंतु माझें नुकसान काय झालें व ज्यांच्यामुळें मला ती संस्था सोडावी लागली त्यांचें तरी माझ्या अभावीं काय नुकसान झालें आहे ? जगांत कोणाचेंहि अडत नाहीं; ज्याचा त्याचा सामान्य व्यवहार कसा ना कसा तरी चालतोच. याचा अर्थ तुमच्याविषयीं एकंदरीनें माझ्या मनांत अनादर उत्पन्न झाला आहे किंवा मी तुमच्याबद्दल स्नेह–भावना ठेवणार नाहीं असा नाहीं. मी तुम्हांला










टाकून तोडून बोललों तें सुद्धां स्नेहभावनेनेंच. तुम्ही आजचा प्रसंग, त्याचें तात्पर्य ध्यानांत ठेवून, विसरावा अशी माझी पण तुम्हांला विनंति आहे.'' अशा अर्थाचें संभाषण करून खाडिलकरांनीं त्या प्रकरणावर पडदा टाकला व निराळा विषय काढून पहिलें कडवट वातावरण पुष्कळसें नाहींसें केलें. त्या गृहस्थाच्या आदरसत्काराची सिद्धता खाडिलकरांनीं आधींपासून ठेवली होती, तीप्रमाणें सत्काराचे पदार्थ पुढें आले व त्या गृहस्थाला ते स्वीकारावे लागले. त्या दिवसानंतर मात्र या दोघांची भेट पुनः झाली नाहीं.

### कृतघ्नपणासारखें पातक नाहीं

खाडिलकरांच्या ठिकाणीं कृतज्ञतेचा गुण पराकाष्ठेनें वसत होता. आपल्या संसारांतल्या अडचणींतून आपणाला नाटक-मंडळ्यांनीं तारलें म्हणून नाटक-मंडळ्यांबद्दल त्यांची कृतज्ञताबुद्धि अखंड कायम होती. त्यांनीं जाहिरातीचे पैसे बुडविले तरी सुद्धां त्यांच्या जाहिरातींना 'नवा काळ'मध्यें कधींच मज्जाव नव्हता! एकाद्या मंडळीनें पूर्वींच्या मुक्कामांतलि जाहीरातींची थकलेली बाकी देतां येत नाहीं म्हणून नव्या मुक्कामांत 'नवाकाळ'ला जाहिरात देण्याची टाळाटाळ केल्यास तें खाडिलकरांना रुचत नसे. बाकी थकली यासाठीं 'नवा काळ'च्या व्यवस्थाखात्यानें त्यांच्या जाहिराती बंद करूं नयेत, अशी खाडिलकरांची त्या खात्याला कायमची ताकीद होती. ज्या पुरुषाचे आपल्यावर अडचणीच्या वेळीं उपकार झाले असतील, त्याच्याबद्दल त्यांच्या हृदयांत ओतप्रोत प्रेमादर असल्यानें त्याच्याविषयीं कोणी दुरून दुरून सुद्धां अनादर किंवा अनुदारपणा व्यक्त करीत असल्याचा संशय आल्यास खाडिलकर एका क्षणाचाहि विलंब न लावतां तो विशेष सलगीचा नसेल तर त्याला हांकलून देत व सलगीचा असेल तर त्याचें तोंड बंद करून टाकीत. स्वतःच्या व्यवहारांतील उपकारकांसंबंधांतच तेवढी त्यांची वागणूक अशी होती असें नव्हे, तर तिऱ्हाइतांच्या व्यवहारावद्दलहि उपकारी व उपकृत यांची निश्चित माहिती असल्यास ते असेंच वागत. 'नवा काळ' पत्राच्या जोडीनें 'स्वाधीन भारत' नांवाचें हिंदी दैनिक खाडिलकरांनीं कांहीं वर्षे चालविलें होतें. ह्या पत्राच्या संपादकांपैकीं एकजण फार खटपट्या व लटपट्या होता. त्यानें एका सधन मारवाड्याला गांठून त्याच्या द्रव्यबळानें 'स्वाधीन भारत' 'नवा काळ'-च्या संबंधांतून वेगळें करण्याचा व्यूह रचला. देण्याघेण्याच्या खाडिलकरांनीं ठरविलेल्या सगळ्या अटी त्या मारवाड्याला सदर संपादकानें न कळवितां सौदा नक्की केला. पुढें मारवाड्याचा प्रतिनिधि त्या संपादकासह खाडिलकरांकडे आल्यावर अटींत फरक पडूं लागल्याचें पाहून तिकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं अशी संपादकानें आग्रहाची भाषा चारदोनदां वापरली, तेव्हां तो संपादक त्या मारवाड्याला फसविण्याची कांहीं लटपट करीत आहे असें ध्यानांत घेऊन खाडिलकरांनीं प्रत्येक शब्द ठासून उच्चारीत म्हटलें कीं, हा सेठजी तुमच्यावर विश्वास ठेवून आज हजारों रुपयांवर पाणी सोडण्यास तयार झाला असतां त्याच्याशीं सुरुवातीपासूनच लफंगेपणानें वागण्याची तुमची वृत्ति अतिशय घातक आहे. असल्या वृत्तीनें तुम्ही दुसऱ्याचें थोडेंसें नुकसान एकाद्या वेळीं करूं शकाल; पण तुमचें मात्र जन्माचें नुकसान ठरलेलें आहे. अश्या वृत्तीनें तुम्हांला जन्मभर वणवण करीत फिरावें लागेल! पुरेशा कल्याणाची स्थिरता तुम्हांला कधींच लाभणार नाहीं. मला याउपर तुमच्याशीं 'स्वाधीन भारता'च्या प्रकरणांत बाटाघाट करायची नाहीं. हा सौदा मोडला असें समजून तुम्ही आपापली वाट धरा.' अश्या तऱ्हेचीं वाक्यें बोलून खाडिलकर इतरांच्या आधीं आपल्या जागेकडे निघून गेले!" "कृतघ्नपणासारखें भयंकर पातक नाहीं!" हा त्यांचा पक्का सिद्धान्त प्रसंगोपात्त त्यांचें जें उपदेशपर विवेचन आपल्या सहकाऱ्यांशीं चाले, त्यांतूनहि पुष्कळदां प्रकट होत असे. या सिद्धान्ताच्या अनुरोधानें खाडिलकरांच्या एकंदर चरित्राची तपासणी केल्यास किती तरी गोष्टींचा सहज उलगडा होतो.

त्यांच्या कृतज्ञताबुद्धीचा आणखी एक चुटका येथें निवेदन करण्याजोगा आहे. 'नवा काळ' निघाल्यावर एकानें त्या वर्षाचें कॅलेंडर आणून दिलें, त्यावर दत्ताचें रंगीत चित्र होतें. त्यावरून खाडिलकरांचें व कॅलेंडरवाल्याचें कांहीं बोलणें झालें. कॅलेंडरवाला दत्तभक्त होता. 'नवा काळ' १९२३च्या मार्चमध्यें निघाला असल्यामुळें जानेवारीपासूनचें एकादें कॅलेंडर देण्यांत औचित्य नव्हतें; परंतु 'तुम-








त्या नव्या उद्योगाच्या जागीं माझें हें दत्ताचें चित्र असावें, अशा भावनेनें मी हें कॅलेंडर देत आहें, ' अशा रीतीनें कॅलेंडरवाल्यानें आपला हेतु स्पष्ट केला व 'आपण सांगलीचे म्हणजे दत्तभतीच्या परिसरांले आहां; श्रीदत्ताच्या कृपेनें आपलें हें साहस यशस्वी होईल. ' असाहि आशीर्वाद त्याच्या तोंडून सहज बाहेर पडला. खाडिलकर कौतुकानें त्याच्याकडे पाहत होते व त्याचें बोलणें ऐकत होते. त्यांनी तें कॅलेंडर श्रद्धेनें स्वीकारलें व नंतर अनेक वर्षे लोटलीं तरी तें दत्ताचें चित्र घरांत जपून ठेवलें होतें. १९३१मध्यें त्यांनीं सांगलीस मळा ख़रेदी करून त्यामध्यें दत्ताचें लहानसें देऊळ बांधण्याचा निश्चय केला, तेव्हां त्या चित्राचें कोडें उलगडलें : ' या चित्राला एक दिडकीहि पडली नसल्यामुळें त्याचें ऋण फेडलें पाहिजे; देऊळ बांधून दत्ताची मूर्ति स्थापन केल्यानें तें ऋण फिटणार आहे. ' अशी खाडिलकरांची भावना होती.

## त्यांचा दत्त स्पर्शास्पर्शातीत

दत्ताचें देऊळ बांधलें, मूर्तीची स्थापना केली. दत्त हें कडक सोंवळें दैवत. त्याला फक्त ब्राह्मणांनींच स्पर्श करावा व इतर जातींचा स्पर्श न होऊं देण्याकरतां बंदोबस्त केला पाहिजे, असा स्थापनेच्या वेळीं सांगलीच्या शास्त्री–भिक्षुकांनीं हट्ट धरला. ही मूर्ति सर्वांना मोकळी राहावी, स्पर्शास्पर्श–विचाराचें थोतांड तिला बाधूं नये असा खाडिलकरांचा आग्रह होता. खाडिलकरांचा आग्रह मोडून काढण्यासाठीं भिक्षुकांनीं स्थापनेच्या कार्यापासून परावृत्त होण्याचीहि भीति दाखविली; परंतु खाडिलकरांचा आग्रह त्या भीतीनें लटपटला नाहीं, तेव्हां ह्या मूर्तीची यथाविधि स्थापना झाली. पुढें मूर्तीला कोणींहि स्पर्श करावा ही खाडिलकरांची भावना अंमलांत येऊं लागली. शास्त्री–भिक्षुकांनीं 'या प्रकारामुळें दत्ताचा कोप होईल व भयानक आपत्ती सोसाव्या लागतील' अशा भविष्याचाहि आघात खाडिलकरांच्या मनोगतावर करून पाहिला; परन्तु खाडिलकरांच्या मनोगतावर त्याचा लवमात्र परिणाम झाला नाहीं. १९४०नंतरच्या सात वर्षांत सून, मुलगा, बायको व नातू अशा चार जणांच्या मृत्यूचें दारुण दुःख खाडिलकरांना सोसावें लागलें. ही दुःखपरंपरा दत्तस्थापनेनंतर सात आठ वर्षांनीं सुरू झाली असली तरी 'ही दत्ताच्या कोपाचीं फळें असलीं पाहिजेत', वगैरे आशयाचा अभिप्राय इकडून तिकडून खाडिलकरांच्या कानांवर येऊं लागला; तथापि खाडिलकरांचा दत्त पूर्वीप्रमाणेंच स्पर्शास्पर्शातीतच राहिला. 'काय वाटेल तें झालें तरी मी आपल्या विवेकसिद्ध मनोगताशीं द्रोह करणार नाहीं' अशा अर्थाची भाषा खाडिलकर शंकितांच्या समाधानार्थ उच्चारीत असत.

## स्पर्धा म्हणजे गुण व्यक्त करण्याची संधि

निःस्पृहता व स्वावलंबन या गुणांचा खोल विचार करूं गेल्यास ते गुण वरून दिसतात तसे साधे व स्थूल स्वरूपाचे नाहींत याचा बोध होण्याला उशीर लागत नाहीं. खाडिलकरांनीं लहानशा पगारावर केसरींत राहून देशसेवेचें खडतर व्रत अंगीकारिलें हें त्यांच्या निःस्पृहतेचें सहज लक्षांत येणारें लक्षण आहे. केसरी प्रथम सुटला तेव्हां त्यांनीं नाटकांच्या बळानें आपला प्रपंच सांवरून धरला. आधीं केसरी आणि नंतर लोकमान्य यांच्याकडे कायमची पाठ फिरविल्यावर त्यांनीं 'नवा काळ' काढला हें त्यांच्या आत्मविश्वासपर स्वावलंबनाचें प्रसिद्ध लक्षण आहे. अगदीं अलीकडे खाडिलकरांनीं 'नवा काळ'-साठीं आलेली कोणाही सामान्य माणसाच्या तोंडाला चटकन् पाणी सुटेल अशी धनाढ्य मागणी झटक्यासरशीं झिडकारली, ही त्यांच्या निःस्पृहतेची आणखी एक दणदणीत खूण सांगतां येईल; परंतु खाडिलकरांची निःस्पृहता अगदीं लहान व्यवहारांत सुद्धां दिसून येत असे. कोठें व्याख्यानाला जायचें असलें तर, ते आपल्याला व्याख्यानस्थळीं नेण्याकरितां कोणीं यावें अशी इच्छा धरीत नसत. तें स्थळ लांब असल्यास वाहनानें जावें लागे; पण खाडिलकर वाहनाचा खर्च शक्य तोंवर स्वतः करीत; सभेच्या योजकांवर तो पडूं नये असा त्यांचा कटाक्ष असे. व्याख्यानाला उशीर करायचा नाहीं असाहि त्यांचा नियम होता. व्याख्यानासाठीं खाडिलकर बहुधा पांचदहा मिनिटें वेळेच्या आधींच व्याख्यान–स्थळीं हजर व्हावयाचे. पैशाप्रमाणें मानाविषयींहि ते निःस्पृहता बाळगून वागत. याचा अर्थ असा नव्हे कीं कोणी बुद्धिपुरस्सर त्यांना अवमानायला धज-










त्यास त्याची ते उपेक्षा करीत. आपल्याला जो प्रकार अवमानाचा वाटला तो दुसऱ्याच्या असमंजसपणानें घडत असल्यास ते त्याचा विचार करीत नसत; पण तो प्रकार बुद्धिपूर्वक चालला आहे अशी त्यांची खात्री पटल्यास त्यांचा स्वाभिमान जागृत होत असे. तरी सुद्धां त्या अवमानाचें स्मरण असूनहि खाडिलकर आपल्या मनामध्यें त्याचा दंश ठेवीत नसत. तुल्य कर्तृत्वाच्या माणसाच्या उत्कर्षाचा मत्सर त्यांनीं कधींच केला नाहीं. मुंबईंत 'नवशक्ति' हें मराठी दैनिक काढण्याची योजना श्री. सदानंद यांनीं केली तेव्हां, हें कमी किंमतीचें दैनिक 'नवा काळ'च्या खपाआड येईल हें दिसत असतांहि खाडिलकरांनीं त्याविषयीं योग्य सल्लामसलतीच्या बाबतींत विमुखता स्वीकारली नाहीं. 'काँग्रेस-पक्षाचें एक नवें पत्र निघणार असून त्यांत आपल्यांतल्या चारचौघांची सोय होणार आहे; काँग्रेसच्या प्रचारालाहि मदत होईल.' अशा भावनेनें ते त्या वेळीं वागले. 'नवशक्ती'कडे 'नवा काळ'च्या संपादक-वर्गांतलीं दोन तीन जुनीं माणसें जाण्याचा संभव उत्पन्न झाला तरी सुद्धां त्यांच्या सहानुभूतींत अंतर पडलें नाहीं. 'नवा काळ'ला मारण्याकरतां 'नवशक्ति' निघत आहे, असें कोणी म्हटल्यास 'जगांत कोणी कोणाला मारूं शकत नाहीं; जो तो आपआपल्या अवगुणानेंच मरतो. स्पर्धा ही आपले गुण व्यक्त करण्याची संधि आहे, म्हणून तिच्याविषयीं माणसानें सादर असावें. स्पर्धा असल्यामुळेंच लोकांची प्रगति चालू आहे. स्पर्धेत प्रत्येकानें आपले गुण वाढविले तर त्याला मागें पडण्याची भीति नसते' अशा उत्तरानें ते त्याचें समाधान करीत.

## तत्त्वज्ञान हें शीलशुद्धीचें साधन

खाडिलकर लोकसेवेंत असतांच आध्यात्मिक उन्नतीचाहि पंथ आक्रमीत होते. टिळकांच्या थोरवीला आपल्या संसर्गानें धक्का लागूं नये म्हणून ते आध्यात्मिक गुणांची जोपासना करीत होते. पुढें काँग्रेसच्या कामाला आध्यात्मिक उन्नतीच्या तत्त्वांचें वळण म. गांधींनीं लावल्यावर त्यांनीं त्या तत्त्वांचा सक्रिय अभ्यास चालविला होता. महाभारत, रामायण, हे राष्ट्रीय ग्रंथ या नात्यानें केसरी—कचेरींतल्या प्रत्येक संपादकानें ते निदान एकदां तरी योग्य प्रकारें वाचून काढावे, ही टिळकांची आकांक्षा खाडिलकर व दत्तोपंत लिमये या दोघांनीं स्वतःपुरती सफळ केली होती. 'नवा काळ' दैनिक प्रथमावस्थेंतील धोक्यांतून बाहेर पडून त्याला निर्विघ्न स्थिरत्व आल्यावर खाडिलकरांनीं ज्ञानेश्वरी, उपनिषदें, रुद्र, पुरुषसूक्त व त्याकरतां भाष्यासह चारी वेदहि वाचून काढले. त्यांतील एकाद्या वचनाच्या किंवा विषयाच्या अध्ययनांत व मननांत ते दिवसच्या दिवस घालवीत असत. नवें नाटक लिहिण्यापूर्वीं त्यांचें नाटकाच्या कथानकाचेंहि चिंतन अशाच रीतीनें चाले. 'सवतीमत्सर' लिहिण्यापूर्वीं कैकेयीच्या मत्सराची उपपत्ति लावण्याकरतां त्यांनीं मार्क्सवादाचीं मालमत्तेच्या लोभासंबंधाचीं कांहीं पुस्तकें वाचलीं होतीं. 'सावित्री' नाटकाच्या वेळीं त्यांनीं मृत्युविषयक तत्त्वज्ञानाचे ग्रंथ मननपूर्वक वाचले होते. त्यांच्या मनोरचनेंतील तत्त्वज्ञानाचें प्रेम केसरींतलि अनेक अग्रलेखांतून प्रकट झालेलें आहे. तत्त्वज्ञानाचा व्यासंग व त्याचा विचार हें त्यांच्या बौद्धिक सुखाचें नव्हे, तर आध्यात्मिक उन्नतीचें, अर्थात् शीलशुद्धीचें साधन होतें. जो सिद्धान्त मनांत ठसेल तो आपल्या आचरणांत आणावयाचा, अशी त्यांची पद्धति होती. ही पद्धति दुसऱ्यानें अनुभवाच्या द्वारें ओळखावी, आपण तिच्याविषयीं बोलूं नये, असा त्यांचा दंडक होता. अशा रीतीनें खाडिलकरांच्या व्यक्तिमत्त्वाची छाननी केल्यास ते लोकांत निष्कारण गैरसमज असलेले एक थोर चारित्र्याचे आदर्श पुरुष होते, याविषयीं पूर्वग्रहशून्यांची खात्री सहज पटेल.

---

चुकीची दुरुस्ती— 'वारकरी पंथ आणि महानुभाव पंथ' या लेखांत पान १२६ वर २५ व्या ओळींत "संत सारावे आरते।" याऐवजीं "संत पूजावे आरते।" असें वाचावें.












प्रा. स. वा. कोगेकर

# अमेरिकेंतील अध्यक्षीय निवडणूक

१९३२ सालापासून लागोपाठ चार वेळां अमेरिकेच्या अध्यक्षीय निवडणुकींत विजयी झालेले प्रे. रूझवेल्ट यांच्या मृत्यूनंतर यंदां प्रथमच अध्यक्ष-पदासाठीं पुनः एकदां चतुर्वार्षिक निवडणूक होणार आहे. निवडणूक येत्या २ नोव्हेंबर रोजीं व्हावयाची असून तिची पूर्वतयारी मार्च महिन्या-पासून चालू आहे. कोठलीहि निवडणूक म्हटली कीं तिच्यावरोवर प्रचार, तक्रारी-उत्तरें, दौरे, व्याख्यानें यांची धामधूम असावयाचीच. अमेरिकेंत इतर सर्व गोष्टींवरोवर या बाबतींतहि अतिरेक होण्याचीच शक्यता अधिक. त्यांतून अध्यक्षाची जागा केवळ मानाचीच नसून मोठ्या अधिकाराचीहि असल्या-मुळें या निवडणुकीला विशेष महत्त्व असतें. राज्य-प्रमुख, सरसेनाधिपति आणि मुख्य प्रधान या तीनहि जबाबदाऱ्या अमेरिकेच्या अध्यक्षावर टाकलेल्या असल्यामुळें त्याच्याइतकी सत्ता असलेला दुसरा अधिकारी जगांत इतरत्र क्वचितच आढळतो. कायद्याची अंमलबजावणी, परराष्ट्रांशीं संबंध, संरक्षणव्यवस्था इत्यादि निरनिराळ्या महत्त्वाच्या बाबतींत अध्यक्षाला विस्तृत अधिकार दिलेले असल्यामुळें आणि ते वापरण्यासाठीं नेमावयाचा दुय्यम अधिकारी-वर्ग मोठ्या प्रमाणावर लागत असल्यामुळें अध्यक्षाच्या हातीं साहजिकच हजारों नेमणुका करण्याची सत्ता असतें. कांहीं बाबतींत विधिमंडळाच्या वरिष्ठ सभेला खुष ठेवलें कीं या सत्तेच्या उपयोगानें अध्यक्षाला आपल्या पक्षाच्या पाठीराख्यांना आणि स्वतःच्या मित्रपरिवाराला अक्षरशः हजारोंनीं नोकऱ्या देतां येतात आणि एका अंशीं निवडणुकींतील मदतीबद्दल सक्रिय कृतज्ञता व्यक्त करतां येते ! या सर्व कारणां-मुळें दर चार वर्षांनीं होणाऱ्या अध्यक्षीय निवड-णुकीच्या निमितानें देशांतील सर्व प्रकारच्या प्रवृत्ती, आकांक्षा, अपेक्षा, तसेच हितसंबंध व हेवे-दावे, यांचें एक प्रचंड मंथन होऊन त्यांतून अध्यक्षाच्या धोरणावर छाप पाडणाऱ्या प्रभावी शक्तींची उत्पत्ति होत असते.

### परराष्ट्रीय धोरणास अग्रस्थान

यंदांच्या निवडणुकीचीं दोन-तीन वैशिष्ट्यें डोळ्यांत भरण्यासारखीं आहेतः—एक म्हणजे निवड-णुकीच्या प्रचारांत परराष्ट्रीय धोरणास मिळालेला अग्रस्थान. गेलीं दीडशें वर्षे अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण कमी-अधिक प्रमाणांत 'अलिप्ततावादी' (Isolationist) होतें. त्यामुळें निवडणुकीच्या मोहिमेंतील शस्त्रास्त्रांत मुख्य भरणा घरगुती प्रश्नांचा आणि मतभेदांचाच असे. दुसऱ्या महायुद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत झालेल्या १९४४ सालच्या निवड-णुकींत देखील घरगुती प्रश्नांभोंवतींच प्रचार केंद्रित झालेला होता. आर्थिक व्यवस्था, नीग्रोंचे हक्क, घटनेशीं एकनिष्ठा इत्यादि मुद्देच त्या वेळीं प्रामुख्यानें चर्चिले गेले. परंतु गेल्या चार वर्षांत जागतिक संबंधांच्या दृष्टीनें अमेरिकेच्या धोरणांत आणि विचारांत एक क्रांतीच घडून आलेली आहे. महायुद्धाच्या खाईत अलिप्ततावाद पार वितळून गेला आणि रशियाच्या वाढत्या सत्तेशीं तोंड देणारी एकमेव शक्ति म्हणून अमेरिकेला जागतिक राज-कारणाच्या आखाड्यांत उडी घ्यावी लागली युरो-पच्या राजकारणाकडे इतकीं वर्षे त्रयस्थाच्या भूमि-केवरून पाहणारी अमेरिका आतां पश्चिम-युरोपियन राष्ट्रांकडे आपली ॲटलांटिक महासागराकडील तट-बंदी म्हणून पाहूं लागली असून तिची डागडुजी करण्यासाठीं आपल्या सर्व आर्थिक, राजनैतिक

आणि लष्करी साधनांनिशीं सज्ज झाली आहे येवढेंच नव्हे, तर अंतर्गत अभिवृद्धीच्या कमाल मर्यादा जवळजवळ गांठल्या गेल्या असल्यामुळें परराष्ट्रांशीं आर्थिक संबंध ठेवणें आज अमेरिकेला पूर्वीपेक्षांहि अधिक मोलाचें झालें आहे. आणि त्याला अनुलक्षून अमेरिकेच्या परराष्ट्रिय धोरणाची आंखणी चालू आहे. रशियाचें वजन आंतरराष्ट्रीय व्यवहारांत वाढूं दिल्यास अमेरिकेंतील आजची भांडवलदारीची अर्थव्यवस्था यापुढें टिकणें शक्य नाहीं ही गोष्ट स्पष्ट असल्यामुळें, आजच्या अर्थव्यवस्थेंत ज्यांचे हितसंबंध विशेषत्वानें गुंतलेले आहेत त्यांचा प्रयत्न साहजिकच रशियाला शह देण्याच्या दृष्टीनें होत राहणार, याचें प्रत्यंतर निवडणुकीच्या धामधुमींत चांगलेंच येत आहे. मार्शल–योजना, ट्रूमन–तत्त्व, बर्लिनची व्यवस्था इत्यादि बाबतींत बड्या भांडवलदारांचें एकमत झालेलें असून दोन्ही प्रमुख पक्षांवर त्याची छाप पडलेली आहे. त्यांतल्या त्यांत कट्टर आणि धनवानांचा कैवारी असा जो रिपब्लिकन पक्ष त्यानें तर निवडणुकीच्या प्रचारांत रशियाचा बागुलबुवा फारच मोठ्या प्रमाणांत निर्माण केला असून अमेरिकन जनतेचें स्वातंत्र्य ॲटम–बॉंबच टिकवूं शकेल अशी आत्यंतिक विचारसरणि रूढ करण्याचा प्रयत्न चालविला आहे. रशियांतील पंचमस्तंभीयांच्या देशद्रोही कारवाया, कम्युनिस्टांची हेरगिरी, अमेरिकेच्या नीतीशीं विसंगत वर्तन इत्यादि मथळ्यांखालीं खोट्यानाट्या वाटेल त्या कंड्या पिकविण्याचें कार्य या पक्षाच्या हुकमतीखालील वृत्तपत्रांनीं चालविलें आहे, याबद्दल कित्येक अमेरिकन प्रागतिकांनींहि असमाधान व्यक्त केलें आहे. परराष्ट्रीय धोरणावर अध्यक्षीय निवडणुकींतील लोकमत निर्माण करण्याचा प्रयत्न या खेपेइतका पूर्वी कधींहि झालेला नाहीं.

## वॉलेस यांचा तृतीय पक्ष

पण हा प्रयत्न जितका रशिया–विरोधाच्या भूमिकेवरून चालू आहे, तितकीच त्याची प्रतिक्रिया देखील तीव्रतेनें होऊं लागली आहे. माजी उपाध्यक्ष वॉलेस यांनीं जागतिक शांततेच्या दृष्टीनें रशियाशीं मित्रत्वाचे संबंध राखले पाहिजेत असा आग्रह धरला असून आपल्या डेमोक्रॅटिक पक्षांत त्याला पाठिंबा मिळत नाहीं असें पाहतांच तिसऱ्या एका पक्षाची स्थापनाहि त्यांनीं केली आहे. या पुरोगामी (Progressive) पक्षाच्या आगमनामुळें देखील यंदांची निवडणूक वैशिष्ट्यपूर्ण होणार आहे. आतांपर्यंतच्या अमेरिकेच्या राजकीय इतिहासांत तृतीय पक्ष चारपांच वेळां तरी स्थापन करण्यांत आले होते. परंतु प्रचलित असलेल्या प्रमुख दोन पक्षांपैकीं एकाद्यास बाजूस सारून त्याची जागा घेण्याइतपत सामर्थ्य मात्र त्यांपैकीं एकालाहि संपादितां आलें नाहीं. चालू राजकारणांत एकादें नवीन तत्त्व गोंवून घेण्यासाठीं जोरदारपणें केलेल्या प्रयत्नांतूनच अशा तृतीय पक्षांची उत्पत्ति होई. कालांतरानें त्या पक्षानें पुरस्कारिलेल्या तत्त्वांचा समावेश इतर पक्षांच्या कार्यक्रमांत होई व नव्या पक्षाचें अवतार–कार्य एक प्रकारें समाप्त होई. परंतु वॉलेस यांच्या नेतृत्वाखालीं निर्माण झालेल्या पक्षाची बासलात मात्र इतक्या सहजासहजीं लागेल असें वाटत नाहीं. कारण, दिवसेंदिवस तीव्र होत जाणाऱ्या व मौलिक मतभेदांच्या संघर्षांतून हा पक्ष पुढें आलेला आहे. प्रे. रुझवेल्ट यांच्या नेतृत्वाखालीं डेमोक्रॅटिक पक्षांत जी पुरोगामी विचारसरणीची मंडळी एकत्र आली त्यांच्यांतील असंतोषांतून हा पक्ष जन्मास आला आहे. या असंतोषाचें कारण रिपब्लिकन व डेमोक्रॅटिक या दोन्ही परंपरागत पक्षांचें धोरण विषमतेला अधिकाधिक पोषक असल्याचें दिसून येत आहे, हें होय. प्रे. रुझवेल्ट यांचा वैचारिक वारसा आत्मसात् करण्याची खटपट प्रे. ट्रूमन व त्यांचे सहकारी यांनीं न केल्यामुळेंच ही दुफळी निर्माण झाली. हळू हळू या पक्षाभोंवतीं देशांतील पुरोगामी विचारसरणीची सर्व मंडळी जमतील व त्यांतून आधुनिक कालाचें प्रतिबिंब दाखविणारा एक राष्ट्रीय पक्ष निर्माण होईल असा कांहीं निरीक्षकांचा अंदाज आहे. ही घटना घडून येतांना अर्थातच डेमोक्रॅटिक रिपब्लिकन पक्षांतील नाफेर–मंडळी अधिकाधिक जवळ येऊन दोघांचा मिळून एक बहुधनवादी पक्ष निर्माण होईल असा तर्क सहज करतां येतो.

## दक्षिणी संस्थानांचा पक्ष

निवडणुकीचें तिसरें वैशिष्ट्य म्हणजे अधिकारारूढ पक्षांत पडलेलें आणखीहि एक खिंडार. डेमोक्रॅटिक

पक्षाला दक्षिणेकडील संस्थानांचा पाठिंबा नेहमींच मिळत असे. परंतु यंदां त्या बाबतींतहि शंका निर्माण झाली आहे, याचें कारण ट्रूमन यांनीं जाहीर केलेला नागरिक हक्कांसंबंधींचा कार्यक्रम. दक्षिणेकडील संस्थानें कृषिप्रधान आणि नीग्रोंच्या गुलामगिरीवर जगणारीं. जरी १८६५ सालच्या यादवींत त्यांचा पराभव होऊन नीग्रोंची गुलामगिरी तात्त्विक दृष्ट्या नष्ट झाली, तरी प्रत्यक्षांत त्यांच्यावर या ना त्या प्रकारें अनेक निर्बंध लादण्यांत आलेले आहेतच. राजकीय हक्कांपासून तर नीग्रोंना सदैवच दूर ठेवण्यांत आलें आहे ! त्यांच्यावर डोईकरस्त लाद, त्यांच्यासाठीं शैक्षणिक अटीच ठेव, अशा हरएक प्रकारें त्यांना सतावून त्यांचें नागरिक–स्वातंत्र्य मर्यादित करण्यांत येतें. ही गोष्ट सहज शक्य होण्याचें कारण घटनेंत या बाबतींतील अधिकार घटक संस्थानांना दिलेले आहेत हें होय. अर्थातच मध्यवर्ती सत्ता शक्य तितक्या कमी क्षेत्रावर मर्यादित करण्याकडे दक्षिणेकडील संस्थानांचा कल असणार आणि डेमोक्रॅटिक पक्षाच्या पूर्वायुष्यांत त्या पक्षाचें अधिकृत धोरणहि या विचारांना सुसंगतच होतें. परन्तु १९२९ सालचें अरिष्ट आलें आणि सर्वच उलथापालथ झाली. आर्थिक मंदीचा परिणाम दक्षिणेकडील शेतीवर अवलंबून असणाऱ्या जनतेवर फारच अनिष्ट झाला. पण त्या वेळीं रिपब्लिकन पक्षाचा अध्यक्ष होता, त्याचे हातून कांहीं उपाय–योजना झाली नाहीं. नंतर १९३२ सालीं डेमोक्रॅटिक पक्षाचे रूझवेल्ट अध्यक्ष झाले आणि त्यांनीं मध्यवर्ती सत्तेचा उपयोग करून शेतकऱ्यांस हात दिला. पण त्यांनीं आपली दृष्टि येवढ्यापुरतीच संकुचित ठेवली नाहीं. हळूहळू नागरिक–संरक्षणाच्या प्रश्नाकडेहि त्यांनीं लक्ष वळविलें. प्रतिस्पर्धी रिपब्लिकन पक्ष तर नेहमींच नागरिक–हक्कांची बाजू घेई; कारण, त्यांच्यांत औद्योगिक क्षेत्रांत पुढें आलेल्या उत्तरेकडील संस्थानांचें वजन फार. तेव्हां प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यासाठीं अलीकडे डेमोक्रॅटिक पक्षालाहि नागरिक–हक्कांच्या संरक्षणाचा प्रश्न हातीं घ्यावा लागला. त्यांतच रूझवेल्ट यांच्या महान् व्यक्तिमत्त्वानें खेंचून आणलेल्या पुरोगामी मंडळींची जोड त्या पक्षाला मिळाली. पण या सर्व प्रकारांमुळें दक्षिणेकडील गौरवर्णस्वाच्या कल्पनेला जोराचा धक्का बसून त्यांनीं आपली विरोधी आघाडी उभारली. आतांपर्यंत ही आघाडी पक्षांत राहूनच सरकारी धोरणावर दडपण आणीत असे. पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं हें पाहून या निवडणुकीच्या प्रसंगीं तिच्या नेत्यांनींहि पक्षत्याग केला असून आतां आपला एक चौथा पक्ष स्थापन केला आहे व इतर तिन्ही पक्षांप्रमाणें आपलेहि स्वतंत्र उमेदवार अध्यक्षपदासाठीं व उपाध्यक्षपदासाठीं उभे केले आहेत.

## प्रे. ट्रूमन यांच्यापुढील अडचणी

डेमोक्रॅटिक पक्षांत झालेल्या या विभागणीमुळें तो पक्ष कमकुवत न झाला तरच नवल ! त्यांतूनच प्रे. ट्रूमन यांच्यासारख्या सामान्य व्यक्तीकडे अध्यक्षपद गेल्यामुळें (प्रे. ट्रूमन हे गेल्या निवडणुकींत उपाध्यक्ष म्हणून निवडून आले होते. प्रे. रुझवेल्ट यांचा १९४५ सालीं अंत झाल्यामुळेंच केवळ घटनेच्या नियमाप्रमाणें त्यांना अध्यक्षपद मिळालें.) व त्यांनीं आतांपर्यंत केलेल्या लहानमोठ्या चुकांमुळें तो पक्ष नाउमेद झालेला आहे आणि त्यांच्या धरसोडीच्या धोरणामुळें त्या पक्षाला कित्येक पहिल्या प्रतीच्या पाठीराख्यांना मुकावें लागलें आहे. इतकें असूनहि ज्या कांहीं गोष्टींचा प्रे. ट्रूमननीं आपल्या कुवतीप्रमाणें पाठपुरावा केला त्यांबाबत प्रत्यक्ष कार्य करून दाखविण्याची संधीच विधिमंडळाच्या असहकारामुळें त्यांना मिळूं शकली नाहीं. उदाहरणार्थ, वाढत्या महागाईला आळा घालण्यासाठीं त्यांनीं आटोकाट प्रयत्न केले. परंतु १९४६ सालीं निवडून आलेल्या विधिमंडळांत* डेमोक्रॅटिक पक्षाचें बहुमत जाऊन तेथें रिपब्लिकन पक्ष शिरजोर झाल्यामुळें अध्यक्ष व विधिमंडळ यांच्यातील संबंध दुरावले. त्यांतच रिपब्लिकन पक्षाचें लक्ष आगामी निवडणुकीवर असल्यामुळें डेमोक्रॅटिक अध्यक्षांची बाजू शक्य तितकी लंगडी पाडण्याचा त्यानें चंगच बांधला होता. शिवाय रिपब्लिकन पक्षांत उद्योगपती, भांडवलदार वगैरेंचा भरणा अधिक असल्यामुळें किंमतींच्या नियंत्रणाबाबत त्या पक्षाचा दृष्टिकोन अध्यक्षांच्या

* येथील टीप या लेखाच्या शेवटीं दिली आहे.








दृष्टिकोनाहून भिन्न होता. तीच गत मजुरांस करून द्यावयाच्या सुखसोयींबाबतहि. त्यांच्यासाठीं घरें बांधण्याच्या योजनेला रिपब्लिकन पक्षानें नुसती तोंडी सहानुभूति दाखविली, पण प्रत्यक्ष पैसा मंजूर करण्याचा प्रश्न निघाला तेव्हां मात्र विरोध केला. अध्यक्ष व विधिमंडळ यांच्यांतील ही रस्सीखेंच सर्वच आघाड्यांवर सारखी चालू असती, तर अध्यक्षांच्या बाजूला जनतेची सहानुभूति वळविणें फारसें कठिण झालें नसतें; परंतु सक्तीची लष्कर–भरती, रशिया–विरोधी परराष्ट्रीय धोरण, मार्शल–योजना, इत्यादि बाबतींत दोन्ही पक्षांनीं एकमुखी धोरण स्वीकारलें. कारण, डेमोक्रॅटिक पक्षांतील वडी भांडवलदार मंडळी आणि विरोधी पक्षांतील त्याच रंगाची मंडळी यांनीं या बाबतींत मात्र हातमिळवणी केली. त्याचा परिणामहि ट्रूमन–पक्षालाच प्रतिकूल झाला. कारण, त्यामुळें त्याला स्वतःच्याच गोटांतल्या पुरोगामी मंडळींचा रोष पत्करावा लागला! या सर्व गुंतागुंतींतून मार्ग काढण्यासाठीं अध्यक्षीय निवडणुकींत ट्रूमन यांच्याऐवजीं डेमोक्रॅटिक पक्षातर्फें दुसराच कोणी लायक उमेदवार निवडावा असा प्रचार सुरू झाला. पण त्यांतहि शेवटीं निराशाच झाली. एक तर स्वतः ट्रूमन यांनीं आपण उभे राहूंच असें स्पष्ट केलें. दुसरी अडचण आली ती त्यांच्या बदलीं कोणाला निवडावें याची. दुसऱ्या महायुद्धांत नांव झालेले जनरल आयसेनहॉवर यांना हा मान द्यावा अशी कारवाई सुरू झाली. जनरल आयसेनहॉवर यांची लोकप्रियता विलक्षणच मोठी असल्यामुळें त्यांच्याशीं स्पर्धेत टिकेल असा दुसरा माणूस उभा राहण्यासारखा नव्हता. तरी आयसेनहॉवर यांजकडे धांव घेण्यांत डेमोक्रॅटिक पक्षाच्या पुढाऱ्यांनीं दोन गोष्टी अगदीं स्पष्ट केल्या. एक म्हणजे कांहीं करून आपल्या हातची सत्ता टिकवावयाची आणि दुसरी म्हणजे आयसेनहॉवर यांचीं स्वतःचीं मतें कांहींहि असलीं तरी त्यांस डेमोक्रॅटिक पक्षांत स्थान द्यावयाचें! पण आयसेनहॉवरनींच नकार दिल्यामुळें तो प्रश्नच मिटला.

### आतांपर्यंतचा राजकारणांतील विस्कळितपणा

आतांपर्यंतचें अमेरिकेंतील राजकारण हें असें चालू आहे. दोन विरोधी पक्ष असले तरी त्यांच्यांतील विरोध तात्त्विक भूमिकेवर आधारलेला नाहीं. भौगोलिक, सामाजिक, आर्थिक, तात्त्विक, ऐतिहासिक व केवळ वैयक्तिक अशा विविध प्रकारच्या बंधनांनीं एकत्र आलेल्या लोकांचा समावेश प्रत्येक पक्षांत झालेला आहे. रिपब्लिकन पक्ष अमुक एका मुद्द्यावर अमुक एक पवित्रा घेईल असें म्हणतां यावयाचें नाहीं. किंबहुना कित्येक वेळां पक्षाचा कागदी कार्यक्रम आणि प्रत्यक्ष आचरणांत आणलेलें धोरण यांचा मेळ घालणेंहि कठिण होऊन जातें. त्या त्या वेळीं ज्या ज्या गोष्टी सोयीच्या वाटतील त्या त्या करण्यांत विशेष खंत बाळगली जात नाहीं. अर्थात् लिंकन, थिओडोर रूझवेल्ट, फ्रँक्लिन रूझवेल्ट वगैरे पुढाऱ्यांनीं आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या जोरावर विशिष्ट पक्षांना विशिष्ट तत्त्वांशीं जखडून ठेवलें होतें, हें खरें; परंतु त्यांच्या अधिकारसंन्यासानंतर त्या तत्त्वांचा त्याच पक्षांकडून पाठपुरावा झाला असें मात्र दिसत नाहीं.

ही स्थिति इतके दिवस चालूं शकली याचें कारण अमेरिकेच्या जीवनांतच सांपडतें. नवा देश, आर्थिक अभिवृद्धीसाठीं अनियंत्रित संधि आणि परदेशांतून भिन्नभिन्न भाषा, संस्कृती व इतिहास यांच्या संस्कारांचें गांठोडें घेऊन आलेले विविध–धर्मीय, विविध–भाषिक व विविध–वांशिक लोक इत्यादि गोष्टींचा परिणाम अमेरिकन जीवनांत एक प्रकारचा धाडसीपणा आणि व्यक्तिविशिष्ट विचारसरणि फैलाविण्यांत झाला. राजकारण हा या जीवनांतला एक गौण भाग होता. जोंपर्यंत प्रत्येकाचा विकास स्वतंत्रपणें, विशिष्ट प्रदेशांत होऊं शकत असे, तोंपर्यंत राजकारणांतील विस्कळितपणा जनतेच्या हिताआड फारसा येऊं शकला नाहीं. परंतु यापुढें ही स्थिति टिकणें अशक्य आहे. राष्ट्रीय दळणवळण, कायदे, वृत्तपत्रें व इतर प्रचारसाधनें यांची वाढ, त्याचप्रमाणें मजूर, कारखानदार, शेतकरी, व्यापारी व नोकरपेशांतील मंडळी यांचे राष्ट्रीय विस्ताराचे संघ इत्यादींमुळें परस्परांतील संबंधांचा परिणाम व्यक्तींच्या जीवनावर पूर्वींपेक्षां आज कितीतरी अधिक होऊं लागला आहे! त्याचबरोबर भांडवलशाहींतून निर्माण होणारी








मक्तेदारी आज सबंध अमेरिकाभर आपल्या मध्यवर्ती निर्णयाचा पगडा बसवूं लागली आहे, त्यामुळें राजकारणांतहि पूर्वीचा विस्कळितपणा जाऊन या नव्या पार्श्वभूमीशीं सुसंवादी अशी व्यवस्था निर्माण होणें अपरिहार्य आहे. त्याच दृष्टीनें मि. वॉलेस यांच्या पुरोगामी पक्षाकडे आज पाहिलें जात आहे.

## मध्यवर्ति सरकारच्या नियंत्रणाचा प्रश्न

रिपाब्लिकन पक्ष हा त्या दृष्टीनें डेमोक्रॅटिक पक्षापेक्षां अधिक एकजिनसी आहे. प्रे. रुझवेल्ट यांच्या दीर्घ अध्यक्षीय अमदानींत आर्थिक क्षेत्रांत पूर्वीचीच व्यक्तिनिष्ठ व्यवस्था चालू ठेवण्याचा आग्रह रिपाब्लिकन पक्षानें धरला होता. याचा अर्थ इतकाच कीं त्या व्यवस्थेंत हितसंबंध असणाऱ्यांनीं रिपाब्लिकन पक्षाला पाठिंबा दिला. आणि या प्रकारचा पाठिंबा रिपाब्लिकन पक्ष आतांपर्यंत नेहमींच मिळवीत आलेला आहे. तसेंच दक्षिणेकडील गुलामी संस्थानांचें लोढणें त्या पक्षाच्या गळ्यांत नसल्यामुळें नागरिक–हक्कांसंबंधींची त्याची भूमिका अधिक स्पष्ट आहे; परंतु प्रत्यक्ष आचरणांत गौर–वर्चस्वाला फारसें दुखवावयाचें नाहीं, असें त्याचें आतांपर्यंतचें धोरण असल्यामुळें, या बाबतींतील सुधारणा नेमस्तपणेंच घडून येत आहेत. एका बाबतींत मात्र रिपाब्लिकन पक्षानें कणखर धोरण अवलंबिलें होतें आणि तीं म्हणजे मध्यवर्ति सरकारच्या वर्चस्वाची. उद्योगधंदे व व्यापार यांत पुढारलेल्या देशाला दळणवळण, वाहतूक, करयोजना, कायदे इत्यादि विषयांत एकमुखी नियंत्रणाची गरज असते; नाहीं तर आर्थिक घडामोडींत पदोपदीं प्रादेशिक सरकारांना अडथळे निर्माण करतां येतात. त्यामुळें संस्थानांच्या सार्वभौमत्वाचें स्तोम न माजवितां मध्यवर्ती सत्ता सामर्थ्यवान् केली पाहिजे असा रिपाब्लिकन पक्षाचा कटाक्ष होता; परंतु अलीकडे या बाबतींतहि डेमोक्रॅटिक पक्षच आघाडीवर आहे. याचें एक नुकतेंच घडलेलें उदाहरण आढळून येतें, तें असें:—समुद्र–किनाऱ्यालगतच्या पाण्याखालीं भूमिगत तेलाचे सांठे असल्याचें कांहीं ठिकाणीं आढळून आलें आहे. या सांठ्यांचा विनियोग करण्याचा अधिकार मध्यवर्ति सरकारकडे असावा कीं स्थानिक (घटक) सरकारकडे असावा याबद्दल वाद चालू आहे. तेलाच्या कंपन्यांच्या मतें हा अधिकार त्या त्या संस्थानी सरकारकडे असावा असें आहे व त्याचें कारणहि उघड आहे. संस्थानी सरकारवर वजन आणून आपल्या फायद्याचे मक्ते मिळविणें जितकें कमी खर्चाचें व त्रासाचें आहे तितकेंच अधिक खर्चाचें व अधिक बिकट, तेंच मक्ते मध्यवर्ति सरकारकडून मिळविणें होईल अशी त्यांना भीति वाटते. कारण, मध्यवर्ति सरकारवर दडपणें आणणाऱ्या संस्था फार, पण मक्ते घेतांना मिळणाऱ्या सवलती मात्र मर्यादित. कंपन्यांचें हें मागणें रिपाब्लिकन पक्षाला एकदम मान्य झालें असून आपल्या निवडणूक–जाहीरनाम्यांत त्यानें त्याप्रमाणें आश्वासनहि दिलें आहे. डेमोक्रॅटिक पक्षाकडूनहि या प्रकारचें आश्वासन मिळविण्याची खटपट कंपन्यांनीं केली व ती साधली म्हणजे कोणताहि उमेदवार यशस्वी झाला तरी त्यांना चिंता वाटण्याचें कारण राहणार नाहीं ! पण पूर्वापार संस्थानी अधिकारांकडे सहानुभूतिपूर्वक पाहणाऱ्या डेमोक्रॅटिक पक्षानें ही विनंति मान्य केली नाहीं. अश्या रीतीनें मध्यवर्ति सरकार आणि संस्थानी सरकारें यांच्या संबंधांच्या बाबतींतहि दोन्ही पक्षांचें सुसंगत धोरण आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

## ‘ टॅफ्ट–हार्टले ’–कायदा

या दोन्ही पक्षांतील मतभेद अलीकडच्या काळांत तरी आर्थिक व्यवस्थेविषयींच्या धोरणांतच विशेषत्वानें दिसून येतात असें म्हटलें पाहिजे. ‘टॅफ्ट–हार्टले–कायदा ’ या नांवानें प्रसिद्धि पावलेला मजूर–संघटनांवर नियंत्रण घालणारा एक कायदा अलीकडे रिपाब्लिकन पक्षानें आपल्या विधिमंडळांतील मताधिक्यानें पास करून घेतला असून त्यावरून त्याच्या आर्थिक धोरणावर चांगलाच प्रकाश पडतो. मजूर–संघटनांच्या पुढाऱ्यांकडून आपण कम्युनिस्ट नसल्याचें प्रतिज्ञापत्रक घेणें, मजुरांच्या सामुदायिक करारांवर नियंत्रणें लादणें, संपांविरुद्ध न्यायालयांकडून बंदी–हुकूम मिळविणें, विशिष्ट कारखान्यांतलि मजुरांवर विशिष्ट संघटनेंतच सभासदत्व मिळविण्याची सक्ती न करूं देणें इत्यादि उद्देशांनीं हा कायदा करण्यांत आला असून त्यामुळें मजूरवर्गांत बराच असंतोष पसरलेला आहे. हा कायदा जेव्हां प्रे. ट्रूमन यांजकडे मंजुरीसाठीं गेला, तेव्हां त्यांनीं आपला








नकाराचा अधिकार वापरून मंजुरी दिली नाहीं. तरी लगेच तोच कायदा पुनः २/३ बहुमतानें मंजूर करून विधिमंडळानें अध्यक्षीय नकार धुडकावून लावला आणि कायद्याची अंमलबजावणी करणें भाग पाडलें. हा कायदा आपण रद्द करूं अशी ग्वाही डेमोक्रॅटिक पक्षानें आपल्या निवडणूक-जाहीरनाम्यांत दिली आहे, तर यासंबंधीं 'परिस्थितीप्रमाणें फेरबदल' करण्यापलीकडे दुसरें कांहींच होणार नाहीं, असें रिपब्लिकन पक्षानें जाहीर केलें आहे.

आर्थिक धोरणांतील अश्या भांडवलधार्जिण्या बाबींवर पांघरूण घालण्यासाठीं रिपब्लिकन पक्षानें मजूर-संघटनांत कम्युनिस्टांचें वर्चस्व होत असल्याचा गवगवा सुरू केला आहे. प्रे. ट्रूमनचें मजूर-विषयक धोरण म्हणजे कम्युनिझमला आमंत्रणच आहे, असा उलटा प्रचारहि त्यांनीं चालविला असून त्याच्या जोरावर अमेरिकेंत पसरलेल्या कम्युनिझमच्या भीतीचा उपयोग आपल्या बाजूनें करून घेण्याचा प्रयत्न चालू आहे.

या विवेचनावरून अमेरिकेंतील दोन प्रमुख पक्षांपुरती निवडणूक-मोहिमेच्या पार्श्वभूमीची कल्पना येईल. डेमोक्रॅटिक पक्षांतील आजची फूट, सतत सोळा वर्षें तो अधिकारावर राहिल्यामुळें त्याच्याबद्दल वाटणारी उदासीनता आणि प्रे. ट्रूमन यांचें लघु व्यक्तिमत्त्व या तीन गोष्टींचा फायदा रिपब्लिकन पक्षाला सहजच मिळवितां येणार असल्यामुळें येत्या निवडणुकींत रिपब्लिकन उमेदवार ड्यूई यांचा विजय होईल हें जवळजवळ ठरल्यासारखेंच समजलें जातें.

## वॉलेस यांचें प्रभावी व्यक्तिमत्त्व

असें जरी असलें तरी नव्यानेंच निघालेल्या वॉलेस-पक्षाची या निवडणुकींत नसली तरी १९५२ सालच्या निवडणुकींत विशेष धास्ती बाळगली पाहिजे असा रिपब्लिकन पक्षांतील पुढाऱ्यांचाहि समज आहे. वॉलेस यांचा कार्यक्रम इतर दोन्ही पक्षांपेक्षां अधिक पद्धतशीर आणि सुसंगत आहे. त्यांना मिळत असलेला पाठिंबा सर्व देशभर पसरलेल्या पुरोगामी विचारांच्या व्यक्तींकडून व संस्थांकडून येत असल्याचें दिसतें. राजकीय दृष्ट्या दलित असलेले नीग्रो, ज्यू इत्यादि अल्पसंख्य लोक आणि आर्थिक आघाडीवरील मजूर, कमी पगाराचे नोकर इत्यादि असंतुष्ट जनता यांचाहि पाठिंबा त्यांना मिळत आहे. स्वतः वॉलेस यांचें व्यक्तिमत्त्व प्रभावी असून त्यांची बेडर वृत्ति तशीच स्पष्ट वाणी सर्वांच्या परिचयाची झाली आहे. नागरिक-हक्क, वर्णद्वेषाचें उच्चाटन, आर्थिक समानता, सामाजिक सुरक्षितता आणि जागतिक शांतता हीं त्यांच्या कार्यक्रमाचीं सूत्रें आहेत. मार्शल-योजना, ट्रूमन-तत्त्व, रशिया-विरोध आणि पश्चिम युरोपची संरक्षक संघटना हीं त्यांस अमान्य आहेत. संयुक्त राष्ट्र संघटनेला पूर्णपणें पाठिंबा देऊन तिच्यामार्फत युरोपला मदत देण्यांत यावी असा त्यांचा आग्रह आहे. स्टॅलिनला त्यांनीं लिहिलेल्या अनावृत पत्राला रशियाकडून आलेला प्रतिसाद आशादायी असल्यामुळें रशियाशीं युद्ध अटळ आहे, अश्या समजुतीनें अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण आंखणें त्यांना पसंत नाहीं. अंतर्गत धोरणांत प्रे. रुझवेल्ट यांनीं घालून दिलेला धडा नेटानें पुढें चालवावा असें त्यांचें म्हणणें असून, मोठमोठ्या बँका, पतपेढ्या, रेल्वे, वैमानिक वाहतूक अशांसारख्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण करण्यांत यावें अशी त्यांची मागणी आहे. अमेरिकेच्या राजकारणांत आतांपर्यंत इतक्या स्पष्टपणें आर्थिक क्षेत्रांत करावयाच्या पुनर्रचनेचा उल्लेख कोणींहि केलेला नव्हता, तो केल्याबद्दल वॉलेस यांच्यावर सर्व नफेर-श्रेष्ठींनीं गहजब केला असून ते कम्युनिस्टांच्या हातचें बाहुलें बनले आहेत असा गैरसमजहि त्यांच्याबद्दल पसरविण्याचा प्रयत्न चालविला आहे. त्यांच्या पुरोगामी पक्षाला अमेरिकेंतील कम्युनिस्ट-पक्षानें पाठिंबा देण्याचें ठरविल्यामुळें तर फारच काहूर माजलें आहे. वॉलेस-पक्षाला यंदांच्या निवडणुकींत यशाची मुळींच आशा नसली तरी, सुमारें ३५ लक्ष मतें त्यांना मिळतील अशी अटकळ करण्यांत आली आहे.

## अमेरिकन मजूर-चळवळीचें अप्रगत स्वरूप

वॉलेस-पक्षाकडे अमेरिकेंतील अधिकृत मजूर-संघटना फारशा सहानुभूतीनें पाहत नाहींत. कारण, तात्कालिक फायद्याच्या दृष्टीनें त्यांना वॉलेस-पक्ष ही एक आपत्तीच वाटते. त्यांची विचारसरणि अशी आहेः-- रिपब्लिकन पक्ष तर उघड उघड मजूर-विरोधी, त्यामुळें त्याला पाठिंबा देणें शक्य नाहीं. तेव्हां डेमोक्रॅटिक पक्षच असा आहे कीं त्याचे हात शक्य








तितकें बळकट करून, होईल तेवढी आपली बाजू सांवरावयाची. पण वॉलेस–पक्षानें डेमोक्रॅटिक पक्षांतच दुही माजविल्यामुळें त्याचा फायदा रिपब्लिकन पक्षाला मिळून तोच विजयी होणार. तेव्हां वॉलेस–पक्ष मजुरांना सोयीचा नाहीं! तात्कालिक फायद्याच्या दृष्टीनें ही विचारसरणि सरळ दिसली, तरी तीमुळें आजचें मरण उद्यांवर टाकलें, येवढेंच होणार. शिवाय डेमोक्रॅटिक पक्षाला या खेपेस तरी विजयाची आशा नाहींच ही गोष्ट जरी सर्वमान्य असली तरी वॉलेसला पाठिंबा देऊन रिपब्लिकन पक्षाचें वैर कशाला ओढवून घ्या, हा विचारहि मजूर–संघटनांना त्रास देतो. अर्थात् अमेरिकेंतील मजूर–चळवळीचें अप्रगत स्वरूपच यामुळें स्पष्ट होतें!

अध्यक्षपदासाठीं एकूण चार उमेदवार उभे असून त्यांपैकीं तीन अमेरिकन जनतेच्या चांगलेच परिचयाचे आहेत. उपाध्यक्ष–पदासाठीं मात्र रिपब्लिकन पक्ष सोडून इतरांनीं विशेष प्रामुख्यानें माहिती असलेल्या व्यक्ती निवडलेल्या नाहींत. डेमोक्रॅटिक पक्षातर्फें प्रे. ट्रूमन यांच्याबरोबर सीनेटर बार्कले, रिपब्लिकन पक्षातर्फें (न्यू यॉर्क संस्थानचे) गव्हर्नर ड्यूई यांच्याबरोबर कॅलिफोर्निया संस्थानचे गव्हर्नर वॉरन, प्रोग्रेसिव्ह पक्षातर्फें मि. वॉलेस यांच्याबरोबर सीनेटर ग्लेन टेलर, याप्रमाणें उपाध्यक्षीय उमेदवार ठरले आहेत. दक्षिणेंतील सात संस्थानांच्या डेमोक्रॅटिक पक्षाच्या सभासदांनीं आपल्यातर्फें दक्षिण कॅरोलिना संस्थानचे गव्हर्नर थर्मंड यांना अध्यक्षपदासाठीं व मिसिसिपीचे गव्हर्नर राइट यांना उपाध्यक्षपदासाठीं उमेदवार म्हणून मुकर केलें आहे. ड्यूई यांची ओळख अमेरिकन जनतेला दोन प्रकारें आहे. एक म्हणजे त्यांच्या नेतृत्वाखालीं न्यू यॉर्क संस्थानचा कारभार अत्यंत कार्यक्षमतेनें चालविण्यांत आला आहे; आणि दुसरा म्हणजे गेल्या अध्यक्षीय निवडणुकींत प्रे. रूझवेल्ट यांच्याविरुद्ध ड्यूई हेच रिपब्लिकन पक्षाचे उमेदवार होते. त्यांचे साथी वॉरन यांचें नांव रिपब्लिकन पक्षाच्या अध्यक्षीय उमेदवारांच्या यादींत होतें; परंतु पक्षाच्या सभेंत त्यांना पुरेसा पाठिंबा मिळाला नाहीं. त्यांचा लौकिक उदारमतवादी असा असून ड्यूई यांची निवड अध्यक्षपदीं झाल्यास त्यांना वॉरन यांची मदत मोलाची वाटेल असें बोललें जातें.

## वरिष्ठ सभेचें अध्यक्षांवर नियंत्रण

दोन नोव्हेंबरला अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्याबरोबरच विधिमंडळाच्या कनिष्ठ सभेची व वरिष्ठ सभेच्या बत्तीस सभासदांचीहि निवडणूक होणार आहे. अध्यक्षीय निवडणुकींत ड्यूई यांना यश येईल व त्याबरोबरच कनिष्ठ सभेंतहि त्यांचा रिपब्लिकन पक्ष यशस्वी होईल असें गृहीत धरलें जातें. परंतु वरिष्ठ सभेंत मात्र ड्यूई यांच्या पक्षाला बहुमत मिळेलच असें नाहीं. या सभेंत प्रत्येक घटक–संस्थानाचे प्रत्येकीं दोन याप्रमाणें एकंदर ९६ सभासद असतात. या सभेचें विसर्जन कधींच होत नाहीं; फक्त दर दोन वर्षांनीं तिच्यांतील एकतृतीयांश सभासदांची फेरनिवड होते. आज रिपब्लिकन पक्षाला त्यांत बहुमत असलें, तरी तें अगदींच अल्प आहे. त्याचे ५१ व डेमोक्रॅटिक पक्षाचे ४५ अशी सभासदांची विभागणी झालेली आहे. आतां होणाऱ्या सभासदांच्या निवडणुकींत रिपब्लिकन पक्षाचे १८ व डेमोक्रॅटिक पक्षाचे १४ सभासद आहेत. येत्या निवडणुकींत डेमोक्रॅटिक पक्षाला ११ जागा खात्रीनें मिळतील असें गृहीत धरण्यांत येत आहे; पण रिपब्लिकन पक्षाला मात्र आपल्या ६ ते ९ जागा टिकविणें कठिण होणार आहे. जर का डेमोक्रॅटिक पक्षाला सध्यापेक्षां चारच जागा अधिक मिळाल्या, तर वरिष्ठ सभेंत त्याला बहुमत मिळेल व त्या बहुमताच्या जोरावर रिपब्लिकन अध्यक्षांवर अनेक प्रकारें नियंत्रण ठेवण्याचा अधिकार डेमोक्रॅटिक पक्षाला मिळून आज ट्रूमन यांची जी स्थिति आहे तिचा कांहींसा अनुभव ड्यूई यांनाहि घेतां येईल! वरिष्ठ सभेला महत्त्वाच्या नेमणुका, परराष्ट्रांशीं संबंध वगैरे बाबतींत अध्यक्षाच्या बरोबरीनें अधिकार असल्यामुळें तिला रिपब्लिकन पक्षाच्या धोरणांत आपल्या मताप्रमाणें बदल घडवून आणतां येईल. अध्यक्षाची जागा जरी गेली तरी या प्रकारेंहि आपलें आसन सांवरतां आलें तरी हरकत नाहीं अशा बुद्धीनें डेमोक्रॅटिक–पक्षीय सभासदांची जोराची खटपट चालू आहे. या खटपटींत सी. आय्.ओ. (कॉंग्रेस ऑफ इंडस्ट्रियल ऑर्गनायझेशन्स) या प्रमुख मजूर–संघटनेचाहि पाठिंबा त्यांना मिळणार आहे.








## निवडणूक-मंडळाची निवड

नोव्हेंबर २ रोजीं होणाऱ्या अध्यक्षीय निवडणुकीस घटना—कायद्याप्रमाणें अध्यक्षीय निवडणूक असें म्हणतां येत नाहीं. कारण, त्या दिवशीं अध्यक्षाची निवड करणारें एक निवडणूक—मंडळ निवडावयाचें असतें. या निवडणूक-मंडळांत प्रत्येक संस्थानातर्फे त्याच्या विधिमंडळाच्या दोन्ही सभांतील प्रतिनिधींच्या संख्येइतके सभासद असतात. एकंदर सभासदांची संख्या ५३१ असून २६६ मतें मिळणारा उमेदवार यशस्वी म्हणून जाहीर केला जातो. ही निवडणूक पुढें डिसेंबर महिन्यांत होते, तिचा निकाल ६ जानेवारीला लागतो व नवा अध्यक्ष २० जानेवारीला आपल्या पदावर आरूढ होतो. असें जरी असलें तरी २ नोव्हेंबरला 'निवडणूक-मंडळासाठीं' होणाऱ्या निवडणुकीपूर्वींच प्रत्येक पक्षाचा अध्यक्षीय उमेदवार जाहीर झालेला असल्यामुळें ज्या पक्षाचें निवडणूक—मंडळांत बहुमत होईल त्या पक्षाचा उमेदवार निवडून येणारच असें मानतां येतें. कारण, निवडणूक-मंडळांतला प्रतिनिधि विशिष्ट पक्षाचाहि सभासद असतोच व म्हणून तो त्या पक्षाच्या उमेदवारास मत देण्यास बांधलेलाच असतो. या निवडणूक—मंडळाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक संस्थानांत ज्या पक्षाला बहुमत मिळेल त्या पक्षाला त्या संस्थानच्या निवडणूकमंडळावरील सर्वच्या सर्व जागा मिळतात. त्यामुळें एकंदर मतमोजणींत जरी थोडेंच बहुमत असलें तरी निवडणूक—मंडळाच्या मतदानांत तें किती तरी फुगून दिसतें ! उदाहरणार्थ, आपण असें समजूं या कीं प्रत्येक संस्थानांत ५१ टक्केच मतें मिळून ड्यूईच्या पक्षाची सरशी झाली तरी, निवडणूक—मंडळावरील मात्र सर्वच्या सर्व जागा त्यांना मिळून त्यांची एकमतानें अध्यक्षपदीं निवड झाली असें होईल ! व इतर पक्षांच्या उमेदवारांना एकहि मत मिळालें नाहीं असाहि त्याचा अर्थ होईल; पण वास्तविक पाहतां ४९ टक्के मतदान त्यांच्या बाजूनें होतें !

जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें ड्यूई यांची सरशी म्हणजे अमेरिका व रशिया यांचे संबंध अधिकच दुरावण्याची भीति. गेल्या चार वर्षांत जरी दोन्ही पक्षांना संमत होईल अशा परराष्ट्रीय धोरणाची आंखणी केली गेली असली तरी त्यांतहि डावा—उजवा हा भेद आहेच. डेमोक्रॅटिक पक्षांतील प्रागतिक मताचें जें कांहीं दडपण अप्रत्यक्षपणें इतके दिवस अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणावर पडत होतें तेंहि यापुढें नाहींसें होईल. अंतर्गत राजकारणांत तर पक्षभेद जास्तच तीव्र होऊन वॅलेस यांच्या पुरोगामी पक्षाचा पाठिंबा ज्या प्रमाणांत वाढेल, त्या प्रमाणांत कम्युनिझमच्या बागुलबोवाची भीति अधिक दाखविण्यांत येऊन नागरिक—स्वातंत्र्यावर गदा आणण्याची प्रवृत्ति रिपब्लिकन सरकारांत वाढण्याची शक्यताहि स्पष्ट दिसते.

---

('पृष्ठ १६० ओळ ३० रकाना उजवा' करतां टीप.)

* अमेरिकेचा अध्यक्ष चार चार वर्षांकरतां निवडतात. विधिमंडळाच्या निवडणुकी मात्र दर
दोन वर्षांनीं होतात. म्हणजे अध्यक्षाची मुदत संपण्यापूर्वींच मध्यंतरीं विधिमंडळाची एक निवडणूक होते.
यांप्रमाणें क्रम चालतो.
पुनः अध्यक्षाच्या निवडणुकीबरोबरच विधिमंडळाचीहि नवीन निवडणूकः होते. तेव्हां दोहोंमध्यें सहकार्याची
अध्यक्ष व विधिमंडळांतील बहुसंख्य सभासद एकाच पक्षाचे असतात. विधिमंडळांतील मताधिक्य
भूमिका असणें स्वाभाविक आहे. परंतु मध्यंतरींच्या निवडणुकींत विधिमंडळानें कायदे करण्यावरच त्याच्या
नाहींसें झाल्यास अध्यक्षाची स्थिति केविलवाणी होते. कारण, विधिमंडळाकडेच असल्यामुळें
अंमलबजावणीच्या योजना अवलंबून असतात. पैसा मंजूर करण्याची सत्ताहि विधिमंडळाच्या वरिष्ठ सभेचे फक्त एकतृती-
अध्यक्षाच्या सत्तेवर आपोआपच बंधन पडतें. नाहीं म्हणावयास उभे करावे लागतात, त्यामुळें एका निवडणुकीनें
यांश सभासदच दर दोन वर्षांनीं फेरनिवडणुकीसाठीं राज्यकारभारविषयक विशेष अधिकार अस-
तेथील मताधिक्यांत फरक पडेलच असें नाहीं. वरिष्ठ विधिसभेला याहि बाबतींत अध्यक्षांना विरो-
त्यामुळें ही तरतूद अध्यक्षाला उपयुक्तच होते. परंतु सध्यांची स्थिति मात्र
धीच आहे. कारण, विधिमंडळाच्या दोन्ही सभांत रिपब्लिकन पक्षाचेंच मताधिक्य आहे!









अनुक्रमणिका

श्री. बा. मो. कानिटकर

# अभ्युदयाच्या मार्गावर

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या पहिल्या वर्षगांठीच्या दिवशीं पाठविलेल्या संदेशांत सरदार वल्लभभाई पटेल म्हणाले होतेः—

" आज या स्वातंत्र्यदिनाच्या पहिल्या जयंतीस आपण प्रगतीचा मार्ग चालूं लागलों आहों. आपणांस आजूबाजूस थोडेसें लक्ष देण्यास सवड होऊं लागली आहे. लवकरच आपण अभ्युदयाच्या मार्गावर दौड करूं लागूं. "

आणि सरदार पटेलांचा भावी काळाचा विश्वास कारणीं असून सत्यावर अधिष्ठित झालेला आहे, असें आपल्या ध्यानीं येईल. अभ्युदयाची निर्दोष व सर्वंकष व्याख्या जरी न करतां आली तरी जीवनाला आवश्यक त्या गरजा भागविण्याचें सामर्थ्य आपल्यांत येणें हा राष्ट्राच्या दृष्टीनें अभ्युदयाचा व्यवहार्य अर्थ होऊं शकेल. ही दृष्टि ठेवून गेल्या वर्षांत भारतानें कशीं पावलें टाकलीं हें पाहणेंच अभ्युदयाचें गमक ठरणार आहे.

गेल्या अखिल–भारतीय शास्त्रीय सभेच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं उपयुक्त संशोधनाचा पुरस्कार केल्यापासून भारतांतील शास्त्रीय संशोधन, औद्योगिक उत्पादन, शेतकी आणि तत्संबंधींचें कार्य यांत हीच दृष्टि प्रामुख्यानें ठेवलेली आढळते.

**अन्नधान्यः—**

बहुतेक सर्व देशभर अन्नधान्याचें नियंत्रण काढून घेण्यांत आलें. मोठ्या शहरांत त्याची विशेष आवश्यकता असल्यानें तें कायम ठेवलें इतकेंच. बाहेरच्या देशांतून अन्नधान्याचा पुरवठा होईल अशी खटपट करण्यांत आली. त्या प्रयत्नांत यश आलें. परंतु हा कांहीं स्वदेशाच्या स्वयंपूर्णतेचा पाया नव्हे. प्रतिवर्षी सुमारें नऊ कोटी टन धान्य कमी पडतें यासाठीं उत्पादन वाढविणें, नवा भूभाग वहित—लागवडित करणें, पाट बंधाऱ्यांनीं आणि खतांचा पुरवठा करून उत्पादनाचें प्रमाण वाढविणें या गोष्टी मूलभूत होत.

इ. स. १९४७–४८ या वर्षी तांदूळ, ज्वारी, बाजरी, मका, गहूं, हरबरा, बार्ली इत्यादि प्रमुख धान्यांचें उत्पादन ४,०४,१९,००० टन झालें. इ. स. १९४६–४७ या सालीं तेंच ३,९४,२३,००० टन होतें. म्हणजे स्वतंत्र भारतानें अन्नधान्याची पैदास सुमारें दहालाख टनांनीं वाढविली, हें सहज ध्यानीं येईल. सुमारें ४५,००० एकर जमीन नव्यानेंच लावगडीखालीं आणण्यांत आली. मैला, शेण वगैरेंपासून खतें तयार करण्याचें काम सुमारें २०,५४२ ग्रामकेंद्रांत सुरू असून साडेबारा लाख टन कॅम्पोस्ट तयार करण्यांत येऊं लागला आहे.

बाहेरच्या देशांतून जुलैच्या आठ तारखेपर्यंत १७,००,००० टन धान्य आयात करण्यांत आलें. इ. स. १९४७ मध्यें ११,००,००० टन, तर इ. स. १९४६ मध्यें अवघें ७,००,००० टन धान्यच परदेशांतून मिळूं शकलें होतें. या आंकड्यांवरून गेल्या वर्षांतील प्रगतीचा अंदाज येऊं शकतो.

**कापड व सूतः**—अन्नाइतकेंच वस्त्र आवश्यक आहे. यासंबंधांत इ. स. १९४८ च्या जून ते ऑगस्ट या काळांत उत्पादन शेंकडा १० ते १५ टक्के वाढलें आहे. या धंद्यांत आज शंभर कोटी रुपयांचें भांडवल गुंतलेलें असून सहा लाख लोक काम करीत आहेत. सुमारें २०,००० माग व दहा कोटी चात्या सूत काढून कापड विणीत आहेत. या प्रचंड उद्योगांतून प्रतिवर्षी ४७०० दशलक्ष वार कापड








उत्पन्न होत असतें. इ. स. १९४४–४५पासून, या उत्पादनांत युद्धकार्यामुळें जी घट पडली होती ती भरून येण्याच्या मार्गावर आहे.

या प्रगतीच्या आड मुख्यतः व्यापाऱ्यांचा दुष्ट स्वार्थच आला. वि–नियंत्रणानंतर या दुष्ट प्रवृत्तींचे दुष्परिणाम सर्वत्र दिसून आले. हातमागाच्या व्यवसायांत तर फारच खोट आली. या सर्वांचा परिणाम पुनः नियंत्रणें बसविण्यांत होणार आहे, हें सर्वांस माहीतच आहे. हा प्रवास निश्चितच प्रगतीचा नव्हे, असें दुःखानें कबूल करणें भाग आहे.

**दळणवळण**—देशाची भरभराट दळणवळणांच्या तत्पर साधनांवर पुष्कळशी अवलंबून असते. या सर्व प्रश्नाकडे व रेल्वे, मोटार, साधे रस्ते, नवे रस्ते, वीज–रस्ते इत्यादींचें एकत्र व सुसूत्र संचलन करण्यासाठीं सरकारनें इ. स. १९४८च्या प्रारंभीं एक कमिटी नेमली. दगडी कोळसा हा उद्योगधंद्यांचा प्राण होय. त्याची वाहतूक झटपट होण्याकडे त्या कमिटीनें सक्रिय लक्ष दिलें. त्याचप्रमाणें अन्नधान्य, कापड वगैरेंची वाहतूकहि कमींतकमी वेळांत घडण्याचे प्रयत्न करण्यांत आले. इ. स. १९४७च्या ऑक्टोबरपासून इ. स. १९४८च्या मार्चअखेर शेंकडा तीस टक्के वाहतूक वाढलेली आहे. यांत अर्थातच अन्नधान्याला विशेष प्राधान्य आहे. लष्करी हालचालींचाहि पुष्कळ भर या कमिटीच्या कार्यावर अर्थात् पडला.

रस्त्यांची वाढ या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरविण्यांत आलें. नागपूरला एक परिषद् भरविण्यांत आली होती. तिच्यांत १०–१५ वर्षांची जी योजना आंखण्यांत आली होती ती आतां मूर्त स्वरूपांत येण्यास प्रारंभ झाला आहे. सुमारें ११,२०० मैलांचे रस्तें भारतीय महत्त्वाचे मानण्यांत आले असून त्यांची निगा मध्यवर्ती सरकारनें अंगावर घेतली आहे.

रस्त्यांत जे नदीनाले येतात त्यांवर पूल बांधण्याचें काम अत्यंत महत्त्वाचें आणि अगत्याचें असतें. मध्यवर्ती सरकारनें चार प्रदीर्घ पुलांच्या योजना गेल्या वर्षी अंगावर घेऊन कामास सुरुवात केली आहे. ओरिसांत कटजुरी आणि क्वारवाई यांचे दरम्यान व बिहारमध्यें पुम्पून आणि बराकर येथें असे चार पूल बांधण्यांत यावयाचे असून त्या कामीं सत्तर लक्ष रु. आतांपर्यंत खर्च झाले आहेत. दुसरे पस्तीस महत्त्वाचे पूल बांधण्याचें काम येत्या वर्षांत अंगावर घेण्यांत येणार असून या योजनेला एकंदर साडेतीन कोटींच्या वर खर्च येईल असा अंदाज आहे.

सुमारें १५० मैलांच नवे रस्ते आणि ५५० मैलांच्या जुन्या रस्त्यांची डागडुजी हीं कामें अनुक्रमें ८५ लक्ष रुपये आणि एक कोटि नव्वद लक्ष रुपये खर्चून चालू वर्षांत पूर्ण करण्यांत येतील.

## जलतरण आणि वायुविहार

विजगापट्टण येथील गोदींत सागरी व महासागरी दर्यावर्दी नौका बांधण्याच्या कामास सुरुवात करण्यांत येऊन सुमारें ८००० टनांची पहिली सागरनौका **जलउषा** पंतप्रधान पंडित जवाहरलालजींच्या हस्तें मार्च १९४८मध्यें पाण्यांत संचार करूं लागली. व्यापारी व इतर नौकाबंधनाचें कामहि सुरू झालेलें आहे.

विमानानें वाहतूक करण्याकरतां सात कोटी रुपयांचें अधिकृत भांडवल असलेली (पैकीं दोन कोटी भांडवल वसूल झालेलें आहे.) ऑल–इंडिया इंटरनॅशनल, लिमिटेड, नांवाची निमसरकारी संस्था (कंपनी) काढण्यांत आली असून गेल्या जूनच्या आठव्या तारखेपासून मुंबई–लंडन–वाहतुकीस त्या कंपनीनें सुरुवात केली आहे. आज दर आठवड्यास विमान जातें व लवकरच आठवड्यांतून दोनदां विमानांची सोय करण्यांत येईल. गेल्या वर्षी अधिकारी, इतर व्यक्ती इत्यादि सुमारें ४६००० लोकांनीं विमानांतून प्रवास केला. इ. स. १९४७च्या नोव्हेंबरच्या १७व्या तारखेपर्यंत काश्मीरच्या लष्यालाच ६०,००,००० पौंड माल विमानमार्गें पुरविण्यांत आला. हा ६,२०,००० मैलांचा प्रवास विमानांनीं सुमारें ४,००० तासांत उरकला. याचें गणितच करायचें म्हटलें तर दर माणशीं चाळीस रत्तल ओझें घेतलेलीं ३०,००० माणसें अवघ्या बावीस दिवसांत पंचवीस वेळां पृथ्वीप्रदक्षिणा करून आलीं असें म्हणावें लागेल.

आज भारतांत सत्तावीस विमानमार्ग आहेत. आधीं ते फक्त अठरा होते. या मार्गावरून










रोज सतरा विमानें सफरी करतात व आठवड्याला सफर करणारीं सत्तर विमानें या मार्गांनीं जा–ये करतात. जानेवारी–एप्रिल या काळांत या कंपन्यांच्या २३४ विमानहांक्यांनीं (पायलट) १६७ विमानांतून आपल्या १६८ सहकाऱ्यांच्या साह्यानें १,२४,७५३ उतारू, २५७३ टन वजनाचें टपाल व इतर सामान यांची ४८,५८,८९३ मैल वाहतूक केली. याप्रमाणें अन्तर्गत विमानप्रवासाची परिस्थिति आहे. सुमारें सव्वीस एअरोड्रोम होते. त्यांत चौदांची नवी भर पडलेली आहे. विमान–कारखान्यांचाहि विचार चालू असून परदेशांतूनहि विमानें आणण्यांत येत आहेत. वैमानिक विद्येचें शिक्षण देण्यासाठीं अलाहाबादला एक केन्द्र काढण्यांत आलें असून त्यांतून २०० वैमानिक (मुलकी) ३०० साहाय्यक व ३०० स्थानिक तज्ज्ञ पहिल्या तीन वर्षांत तयार करण्यांत येतील.

## पोस्ट आणि इतर दळणवळण

इ. स. १९४७च्या ऑगस्टमध्यें १६,९९४ ग्रामीण व ३५४८ शहरी पोस्ट-ऑफिसें होतीं, तीं गेल्या वर्षी १८,४३८ ग्रामीण व ३७७५ शहरी (दि. १–७–४८पर्यंत) अशीं झालीं. टपालाची विमानानें वाहतूक जास्त प्रमाणावर चालू झाली व त्यासाठीं कित्येक नवीं केन्द्रें उघडण्यांत आलीं.

साधारण २००० लोकवस्तीच्या खेडेगांवांतहि एक पोस्ट असावें असें ठरविण्यांत आलें व त्याप्रीत्यर्थ वार्षिक प्रत्येकीं ७५० रुपयांपर्यंत घट सोसावी असें ठरलें. एक अभिनव उपक्रम म्हणजे फिरतें पोस्ट हा होय. नागपूर–विभागांत वर्ध्याजवळच्या अडतीस गांवांना उपयोगी पडणारें एक पोस्ट उघडण्यांत आलें आहे. हें पोस्ट एका मोटारीवर बसविलें आहे. या पोस्टाकडे सुमारें चारशे मैलांचें क्षेत्र देण्यांत आलेलें आहे. पोस्टाचीं सर्व कामें या पोस्टांत होतात. हा विभाग दोन दिवसांत हिंडून पूर्ण होतो. हा प्रयत्न यशस्वी झाल्यास याची नक्कल इतरत्रहि करण्याचें ठरलें आहे.

टेलिफोनचा वापर अधिकाधिक होऊं लागला आहे. एप्रिल १५ पर्यंत सुमारें २५५ एक्स्चेंज ऑफिसेस अस्तित्वांत असून १,१५,३३१ टेलिफोन–यंत्रें वापरांत होतीं. इ. स. १९४७मध्यें १,१२,३२४ टेलिफोन–यंत्रें वापरांत होतीं. सध्यां दरमहा सरासरीनें ४,००,००० "ट्रंक"–कॉल घेण्यांत येतात.

परदेशी तारा व बिनतारी संदेश पाठविण्यास प्रोत्साहन देण्यांत आलें. रेडिओ–टेलिफोनला सुरुवात झाली असून लवकरच जपानशींहि या पद्धतीचें स्वतंत्र दळणवळण सुरू होईल.

सरकारनें टेलिफोन स्वीकार करणारीं व बोलणें बाहेर नेणारीं स्वयंचलित यंत्रें तयार करण्याचा कारखाना काढला असून, त्यांतून हीं दूरध्वनियंत्रें लवकरच बाहेर पडूं लागतील.

मुंबई–दिल्ली–कलकत्ता–मद्रास यांत तत्परतेनें संदेश पोंचविण्यासाठीं पन्नास लक्ष रुपये खर्चून बिनतारीची व्यवस्था करण्याची योजना सिद्ध झाली आहे.

रेडिओच्या प्रभावी उपयोगाकडे पूर्ण लक्ष असल्यानें, पाटणा, अमृतसर, गौहत्ती, नागपुर इत्यादि शहरीं क्षेपण–केंद्रें (ब्रॉडकास्टिंग स्टेशन्स) स्थापण्यांत आलीं. पांच प्रमुख केंद्रांत विशेष शक्तीचीं यंत्रें वापरण्यांत येणार असून या योजनेला दोन वर्षें तरी लागतील असें वाटतें. मार्च १९४८अखेर ऑल–इंडिया–रेडिओनें ३९७ तासांत सुमारें २,००,००० बातम्या क्षेपित केल्या. निर्वासितांच्या साह्याला या साधनांमुळें शीघ्रता लाभली. इ. स. १९३७मध्यें रेडिओचे ग्राहक, परवानेदार ५०,६५० होते. इ.स. १९४७मध्यें त्यांची संख्या २,३०,०२५-वर गेली. रेडिओ–केंद्रांचे अधिकारी तयार करण्याची शाळा जुलै १९ रोजीं सुरू झाली.

## शिक्षण

स्वातंत्र्यांत प्रत्येक देशबंधु कमीतकमी साक्षर झालाच पाहिजे, हें तत्त्व सर्वांनाच मान्य होणारें आहे. सर्व शिक्षण मातृभाषेंतूनच मिळण्याची सोय, गुणांचा विकास करणारें खरें व उपयुक्त शिक्षण, हें देणारे शिक्षक व विद्यापीठें इत्यादीकडे सरकारचें पूर्ण लक्ष आहे व त्या दृष्टीनें प्रयत्नांना सुरुवातहि झाली आहे. तीन वर्षांत पन्नास टक्के तरी लोक साक्षर झालेच पाहिजेत अशी योजना आंखलेली आहे. व्यावसायिक शिक्षण–विशेषतः उच्च प्रतीचें टेक्निकल एज्युकेशन लोकांना देण्यासाठीं








खर्च मंजूर करण्यांत आला आहे. असलें काम करणाऱ्या संस्थांना मदत तसेंच कर्जहि देण्यांत आलें आहे.

## उद्योगधंदे व इतर प्रगति

'जलउषा' नौकाबंधनाप्रमाणेंच बंगलोरच्या हिंदुस्थान–एअरक्रॅफ्ट–फॅक्टरींत आतांपर्यंत फक्त तयार भाग जोडण्याचें व साधण्याचेंच कार्य होत असे. आतां ते भाग तेथेंच निर्माण करून जोडण्याचें काम करण्याची अवस्था त्या कारखान्यास आली आहे. पुढच्या दोन वर्षांत तीस विमानें बांधण्यांत येण्याची उमेद वाटते. भाग जोडून आणखी वीस विमानें त्या कारखान्यांत तयार होतील.

भारताला लागणाऱ्या वार्षिक ३,००,००० सायकलींपैकीं ६२,००० उत्पन्न होऊं लागल्या आहेत. एक लाख शिवण्याचीं यंत्रें लागतात, पैकीं १५००च आज येथें तयार होतात. आणि हरिकेन–कंदिलांची चौथा हिस्सा मागणीच आज पुरी होऊं शकते. विभाग जोडून मोटारी तयार करण्याचे कारखाने सात ठिकाणीं आहेत. असले दोन नवे कारखाने (एक मुंबईस व एक कलकत्यास), या वर्षी सुरू झाले. (उत्पादनाच्या कामास सुरुवात व्हायला अजून वेळ आहे.)

## शास्त्रीय संशोधन

इ. स. १९४२मध्यें स्थापन झालेल्या कौन्सिल ऑफ रिसर्च या संस्थेला सरकारी खात्यांत स्थान दिलें असून एक नवी सरकारी व बिनसरकारी सभासदांची सल्लागार–समिति स्थापन करण्यांत आली आहे. पुण्याजवळच्या नॅशनल केमिकल लॅबोरेटरी या संस्थेसारख्या अकरा संशोधन–संस्था लवकरच स्थापन होणार आहेत. पैकीं पांच संस्थांच्या सर्व योजना सिद्ध झाल्या असून कांहींचे कोनशिलासमारंभहि साजरे झाले.

मानवी जीविताला उपयुक्त ठरणाऱ्या संशोधनाला त्यांत प्राधान्य दिलें आहे. विशुद्ध संशोधनहि तेथें होईलच; पण उपयुक्त संशोधनाकडे अधिक कटाक्ष असेल.

अणुशक्ति–संशोधनासाठीं खास केन्द्र कलकत्यास उघडण्यांत येत आहे. त्या संशोधनाचें कार्य अंगावर घेणारे तज्ज्ञ तयार करण्याचें काम प्रा. भाभा यांचेकडे सोपविण्यांत आलें आहे. बारा शास्त्रज्ञ हें शिक्षण घेत आहेत.

शुद्ध पदार्थ, औषधें, रसायनें, हेवि केमिकल्स, वैजिक पदार्थ, जळणें व अल्कोहोल, खतें, प्लॅस्टिक, चामडीं, घरकामाचे व बांधकामाचे पदार्थ (सिमेंट, तार इत्यादि) आणि रेडिओ व त्याचे भाग तयार करण्याकडे लक्ष देण्यांत येणार आहे. इ. स. १९४७नंतर इकडे विशेष लक्ष देण्यास सुरुवात झाली आहे. पेनिसिलीनसारखीं रोगप्रतिबंधक, इन्सुलीन, ॲड्रिनलीन यांसारखीं ग्रांथिक औषधेंहि तयार करण्याची योजना कार्यप्रवण झाली आहे.

या कार्याला कारखानदार, भांडवलवाले व व्यावसायिक यांचेंहि साह्य मिळविण्यांत आलें आहे. परदेशांत असलें कार्य खासगी व्यावसायिक संघच तज्ज्ञांकरवीं करून घेत असतात. कित्येक जागतिक कीर्तीचे शास्त्रज्ञ अश्या खासगी कंपन्यांच्या शास्त्रीय विभागांत काम करतात.

या दृष्टीनें सरकारी व खासगी प्रयत्नांची एकता करण्यांत येऊन अहमदाबादला सूत व कापड यांचें संशोधन–केन्द्र स्थापण्यांत आलें आहे. या संस्थेच्या भांडवलापैकीं ४८ लाख रु. कारखानदारांनीं दिले असून १९ लाख रु. सरकारनें दिलेले आहेत. त्याचप्रमाणें दोन लाख रुपये खर्चून मद्रासला कमावलेल्या कातड्यांसंबंधी संशोधन करणारी संस्था स्थापण्यांत आली आहे.

या प्रगतीला विशेष जोर येण्याचें कारण या शाखेचें महत्त्व ओळखून ही शाखा खुद्द पंतप्रधानांनीं आपल्या खास अधिकाराखालीं घेऊन तिच्या कारभाराकडे जातीनें लक्ष दिलें हेंच होय.

## इतर

भारतीयांच्या आरोग्यासाठीं निरनिराळे प्रयत्न सुरू झाले आहेत. क्षयरोग–प्रतिबंधक–संशोधन–केन्द्रासारखीं केन्द्रें स्थापण्याकडे व लोकांना स्वच्छतेचें व आरोग्याचें मूलभूत शिक्षण देण्याकडे गेल्या वर्षांत विशेष लक्ष देण्यांत आलें. शरीरांत टोंचण्याच्या लसी व औषधें तयार करण्यांत दीडपटीनें वाढ झाली










असून उपचार-केन्द्रांची संख्या अडीचपट वाढविण्यांत आली आहे. यंदाच्या अंदाजपत्रकांत सव्वीस लक्ष रुपये या कामाकरतां खर्चण्यास देण्यांत आले आहेत.

मोठमोठ्या धरणांच्या योजना वगैरेंना सुरुवात झालेली असून दामोदर-खिंडीच्या प्रचंड योजनेकडे जगाचें लक्ष वेधलें आहे.

९-९-४८.

---

एकविसाव्या वर्षी इंग्लंडमध्यें बॅरिस्टरीचा अभ्यास करीत असतांना, महात्मा गांधी यांनीं १८९१ सालीं लंडन व्हेजिटेरिअन सोसायटीच्या 'व्हेजिटेरिअन' (शाकाहारी) नांवाच्या मासिकांत नऊ लेख लिहिले होते, ते नुकतेच पुनर्मुद्रित झाले असून एका ग्रंथाच्या रूपानें २ ऑक्टोबर १९४८ रोजीं लंडन येथील इंडिया-हाऊसच्या पुस्तकालयांत ठेवलेले आहेत. ज्या वेळीं गांधीजींनीं आपले मूळ लेख लिहिले त्या वेळचे संपादक डॉ. जोशिआ ओल्डफील्ड यांनीं 'व्हेजिटेरिअन न्यूज'च्या १९४८च्या ग्रीष्म-अंकांत आपल्या या जुन्या सहकाऱ्याविषयीं कांहीं मार्मिक आठवणी देऊन एक लेख लिहिला आहे. या लेखांत ते म्हणतात, "ते शाकाहारी संघाच्या समितीचे एक सभासद होते. सभांतून खूप कडाक्याचे वाद होत; पण त्यांत ते बोलत नसत वा कसलाहि भाग घेत नसत. त्यामुळें त्यांच्याकडे कोणाचें लक्ष जात नसे. पण लवकरच तात्त्विक व मूलगामी असे प्रश्न उत्पन्न झाले. त्या वेळेला मात्र त्यांच्या भिडस्त व संकोची बहिरंगाखालीं असलेला मूळ स्वभाव उमटून प्रकट झालेला दिसला. आम्ही दोघेहि मोठ्या गुण्यागोविंदानें एकत्र काम करीत होतों. आम्हांला वाटे कीं, आपण ज्या योगानें जगाचें बरें होऊन जगांत एकोपा नांदेल, असेंच कांहीं काम आपण करीत राहावें. गांधीजींची वृत्ति मला ठाऊक होती; त्यामुळें गांधीजींच्या मृत्यूमुळें मला दुःखाचा धक्का बसला नाहीं. आजच्या या रम्य संध्याकाळीं हा लेख लिहीत असतांना कल्पना करा कीं माझ्याजवळ गांधीजी बसले आहेत; आणि मीं जर त्यांना म्हटलें "गांधी, पुढच्या आठवड्यांत तुम्हांला कोणीतरी गोळी घालून ठार मारणार आहे. मग?" तर माझी खात्री आहे कीं, गांधीजींनीं उत्तर दिलें असतें "बरं आहे; त्यामुळेंहि कांहीं चांगलेंच होणार असेल, अशा मृत्यूचे मी स्वागतच करीन. कारण, मानवजातीच्या सेवेचा तोहि एक मार्ग आहे. जी एकादी गोष्ट माझ्या समजुतीनें बरोबर आहे ती व्हावी असें मला वाटतें. 'मी तरी काय, परमेश्वराच्या इच्छेचें एक वाहन किंवा साधन आहे,' असेंच मी मानतों व त्या वाहनाचा वा साधनाचा नाहक नाश होऊं नये अशी मी प्रार्थना करीन."








वर्ष दुसरें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

डॉ. पुरोहित फार्मसी : आयडियल फर्निचर वर्क्स : आर्य महौषधालय : गजानन जनार्दन बोडस : धूतपापेश्वर पनवेल लि० : युनिवर्सल परफ्यूमरी वर्क्स : रॉय आणि कंपनी : सेंट्रल ग्लास फॅक्टरी : आयुर्वेद रसशाळा लि : कैसरी इंडस्ट्रियल्स लि. : साठे बिस्किट कंपनी : अब्दुल हुसेन अल्लाबक्षजी : धि सेंट्रल पॉटरीज लि. : विष्णू फार्मसी : दि सह्याद्रि विमाकंपनी लि :

















अनुक्रमणिका

कैसरीचे बालेंदु

मुलांचे—
दंतरोग, रिकेटस्
वगैरे विकारांवर उत्तम टॉनिक

कैसरी इंडस्ट्रियल्स लि. अहमदनगर

---

अन्नटंचाईच्या काळांत पौष्टिक अन्न पुरेसें मिळत नाहीं

## साठे बिस्किटें, चॉकोलेट व कोको

ती उणीव भरून काढतील

कारखाना—साठे बिस्किट कंपनी—चॉकोलेट वर्क्स, पुणें २.

---

बायोटोना
मुलांना
निरोगी, सशक्त आणि
तेजस्वी बनविते.
रॉय आणि कं.
प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २.

बालकांचें आयुष्य आणि शक्ति वाढविण्याकरितां 'बायोटोना' हें एक अतिशय उत्तम टॉनिक आहे. ह्यानें दांतांची काळजी घेतली जाऊन ज्ञानतंतु पण घट्ट होतात. या टॉनिकनें बालकांचा उत्साह व जोम द्विगुणित होतो. किंमत रु. २—०—०

रॉय आणि कंपनी, होमिओपाथस्.
प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २.

---

## प्रशम

स्मरणशक्ति आणि मानसिक शांतता
वाढविणारें औषध
माहिती-पत्रक खालील पत्त्यावर मिळेल.

आयुर्वेद रसशाळा पुणें लि., पुणें ४.







---

## जाहिरातीचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळां | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानांपेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | १५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | १२० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥''×५।''

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २.

अनुक्रमणिका








# वर्गणीदारास सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक '५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(३) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(४) 'नवभारत'च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत'**,
२९१ शनवार पेठ, पुणें २.

---

# एजन्सीबाबत खुलासा

'नवभारत' हें एक उच्च दर्जाचें, वैशिष्टयपूर्ण मासिक मराठींत आहे, असा अभिप्राय अनेक वृत्तपत्रांनीं दिलेला आहे. अशा तऱ्हेच्या मासिकाचा प्रसार जास्तींत जास्त व्हावा यासाठीं ठिकठिकाणीं एजन्टस् नेमण्याची योजना आम्हीं तयार केलेली आहे. एजन्सीचे साधारण नियम पुढें देत आहे. तपशीलवार नियमांची मागणी कचेरीकडे केल्यास ते पाठविले जातील.

(१) विक्रेत्यानें कमींत कमी चार अंक घ्यावेत. अंक न खपल्यास परत घेतले जाणार नाहींत.

(२) डिपॉझिट म्हणून कमींत कमी दहा रुपये आमचेकडे जमा ठेवावेत.

(३) पंचवीस अंकांपेक्षां जास्त मागणी असल्यास एजंटास एक प्रत दिली जाते.

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२९१ शनवार पेठ, पुणें २.









नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष